# मराठी साहावें पुस्तक

## MARATHI SIXTH READER



HUMPHREY MILFORD
OXFORD UNIVERSITY PRESS
BOMBAY

191[illegible]

Price 6 Annas

किंमत ६ आणे

THE DEPARTMENT OF PUBLIC INSTRUCTION
CENTRAL PROVINCES

विद्याखातें, मध्यप्रदेश

# मराठी साहावें पुस्तक

## MARATHI SIXTH READER






HUMPHREY MILFORD
OXFORD UNIVERSITY PRESS
BOMBAY

# अनुक्रमणिका



# मराठी साहावें पुस्तक



## धडा १

### सम्राटांचें स्वागत *

झाली वर्षशतावधी जनमनां बाधा जिची दुःसहा,
गेली ती विलयास आज रजनी निःशेष गेली पहा,
भाग्याचा उदयास ये दिनमणी! झाली प्रभूची कृपा,
आम्ही आज पहातसों म्हणुनि ह्या मूर्धाभिषिक्ता नृपा. १

गातां ऐकतसों घरोघर कथा रामादिकांच्या जनीं
राज्यारोहणवर्णनेंहि रुचिरें वर्णून गेले मुनी;
**राया!** आजचि ह्यापरी तुजसमा मूर्धाभिषिक्ता नृपा
पाहे आर्यमही; अशीच म्हणतों व्हावी पुढेंही कृपा. २

या या **पंचम जार्जराय!** सुभगे ये **राजराजेश्वरी!**
येतां आज तुम्हां विलोकुनि इथें हर्षा उरेना उरीं;
ज्या प्रेमें इतका प्रवास करुनि आलां तुम्ही भारतीं
त्या प्रेमेंच तुम्हांस ही भरत-भू ओंवाळिते आरती! ३

आजीनेंच तुझ्या न केवळ तुझ्या तातेंहि विश्वस्तुतें
प्रेमाचें सुदिलें प्रजाजनमनोभूमीमधें रोप तें;
स्वांगें शिंपडितां सदार सचिव क्ष्मापा! तुला पाहुनी
राया! आर्यमही चिरंतन तुझी झाल्यें म्हणे मी ऋणी! ४

---

* आपले भाग्यशाली सम्राट **पंचम जार्ज** यांनीं कृपाळू होऊन इ. स. १९११ सालीं हिंदभूमीस दर्शन दिलें त्या वेळीं प्रजाजनांनीं केलेलें स्वागत.

प्रेमाचे ध्वज रोविले, उभविल्या हर्षोत्सवाच्या गुढ्या,
व्हाया पायघड्या पथांत पडल्या सद्भावनांच्या उड्या;
या, ह्या आर्यजनीं सुवर्णभुवनीं या राजराजेश्वरा!
आहे हें घर आपलें समजुनी संचार येथें करा.

राजा विष्णुसमान मान जिकडे झाला सदा पावता
आजी होउनियां तुझीच बसली आहे जिथें देवता!
येतां पाहुनियां सभार्य तिकडे सम्राण्नृपा त्वत्समा
वाटे ह्या भुवनीं रमाधव सवें घेऊनि आला रमा!

श्रीरामा जनकात्मजा, द्रुपदजा त्या धर्मराजा जशी,
सान्निध्यें सुखवोनि संतत तुला ही त्वत्प्रियाही तशी;
लोकीं ह्या म्हणवोनि लोकजननी हो वाढवीती सदा
सौभाग्यासह आपल्या नरवरा तूझी यशःसंपदा.

हिंदू हो अथवा अविंध नृप, जो जोपा जनांची करी
त्याला कंठमणी म्हणोनि हृदयीं ही आर्यमाता धरी;
निष्ठा रामयुधिष्ठिरीं अकबरीं ठेवोनियां सारखी
झाली वागविती समान सकळां ही सज्जनांची सखी.

डोळे घालुनियां असेल बसली जी त्वत्पथीं मावली
आईची न सरी जरी नृपवरा ही त्या तुझ्या पावली;
राया! हो न तिची तुला प्रतिपदीं ह्या दूरदेशीं स्मृती
औत्सुक्यें म्हणुनी सदा तव हितीं राहील ही जागती.

जा, संचार करा सुखें नरवरा, सर्वत्र ह्या भारतीं
लोकांच्या तव दर्शनास्तव उभ्या आहेत झुंडी पथीं;
या या भेटुनिया तयां, विदितही त्यांना करा स्वाननें
“गेला भेद विरोन एकवटलीं राजाप्रजांचीं मनें!”

राया ! दर्शन देउनी सुखविलीं चित्तें जनांचीं जशीं
केली स्वागमनेंहि पावन तुम्हीं ही पुण्यभूमी तशी;
आहे आपण हा धडा नृपवरा घालोनियां जो दिला,
तो ठेवोनि पुढें प्रजाहि तुमची जोडो यशा निर्मला. ११

तूं आलास तुझी तशीच इकडे आंग्ल प्रजा ही वळो,
वर्णद्वेष जळो ! अहंकृति गळो, संदेहबाधा टळो !
प्रेमें प्रेम वळो, विरोध वितळो, बंधूस बंधू मिळो !
निष्ठा अव्यभिचारिणी प्रभुपदीं सर्वत्रही आढळो ! १२

**गं. रा. मोगरे** ( विविधज्ञानविस्तार )

---

## धडा २
## वेरुळाजवळचीं लेणीं

मुसलमान लोकांनीं स्वाऱ्या करून येथें आपला अंमल बसविण्या-पूर्वीं हिंदुस्थान देशाची स्थिति फार चांगली होती असें ज्या अनेक गोष्टींवरून दिसतें, त्यांपैकींच डोंगरांतील खडक कोरून तयार केलेलीं प्रचंड देवळें हीं होत. अशीं देवळें दक्षिणेंत फार आहेत. त्यांस **लेणीं** असें म्हणतात. हीं अप्रसिद्ध व निवाऱ्याच्या ठिकाणीं असल्यामुळें त्यांस हिंदुधर्मद्वेष्टे क्रूर व अज्ञान अशा मुसलमान अंमलदारांपासून, व वारा, पाऊस, ऊन ह्यांपासूनही फारसा त्रास झाला नाहीं; तेणेंकरून तीं आजपर्यंत टिकलीं आहेत.

साधारण लोकांत दंतकथा अशी आहे कीं हीं देवळें पांडवांनीं अज्ञातवासांत असतां कोरलीं; व यावरून त्यांस "पांडवकृत्यें" असेंही एक नांव पडलें आहे. पण एकतर या दंतकथेस पुराणांत मुळींच आधार नाहीं. शिवाय हीं देवळें जशीं हिंदूंचीं तशींच बौद्धांचींही आहेत. ह्यावरून तीं निरनिराळ्या काळीं भिन्न भिन्न धर्माच्या लोकांनीं कोरलीं असावीं असें

सिद्ध होतें. ह्याप्रकारचीं लेणीं घारापुरी, कान्हेरी, कारलें, नासिक, अजंठा व वेरूळ इत्यादि ठिकाणीं बहुत आहेत. सर्वांत वेरुळाजवळचीं लेणीं फार मोठीं व सुरेख आहेत. म्हणून त्यांचें संक्षिप्त वर्णन खालीं दिलेलें आहे.

निजामसरकारच्या राज्यांत औरंगाबाद परगण्यांत दौलताबाद म्हणून एक लहानसें शहर आहे. त्यास पूर्वीं देवगिरी किंवा देवगड असें म्हणत असत, व एका काळीं तें महाराष्ट्रांतील यादव राजांची राजधानी असून फार भरभराटींत होतें. दौलताबादचा किल्ला अद्यापही फार बळकट व अभेद्य किल्ला म्हणून प्रसिद्ध आहे. ह्या दौलताबादेजवळच वेरूळ म्हणून एक लहानसें गांव आहे. महाराष्ट्रराज्यसंस्थापक **श्रीशिवाजी** महाराज यांच्या पूर्वजांकडे याच वेरूळ गांवाची पाटीलकी होती, या दृष्टीनेंही हें खेडें चिरस्मरणीय आहे. येथून पूर्वेच्या बाजूस सुमारें अर्ध्या कोसावर एक अर्धचंद्राकृति डोंगर आहे. ह्या डोंगराचा प्रसार दक्षिणोत्तर आहे व त्याचीं टोकें मध्यापेक्षां विशेष उंच आहेत. याच डोंगरांत हीं प्रसिद्ध लेणीं कोरलेलीं आहेत. हीं सर्व सारख्या अंतरावर नाहींत, व सारख्या उंचीवरही नाहींत. खोदणाऱ्यांस भिंतीसारखा खडक जेथें जेथें सांपडला तेथें तेथें त्यांनीं देवळें कोरलीं.

ह्या इमारती फार भव्य पण भयाण असून त्या पाहून मन थक्क व उदास होतें. ह्या देवळांची संख्या, त्यांची शोभा व कांहींची विस्तीर्णता व उंची, कांहींकांतलें अनेक प्रकारचें नक्षीचें काम, त्यांवरील नानाप्रकारची व चमत्कारिक वेलबुट्टी, त्यांच्या खांबावरचें उत्तम प्रकारचें खोदींव काम, अनेक प्रकारचीं भिंतीवर कोरलेलीं चित्रें, व मोठ्या विशाल मूर्ति इत्यादि सर्व विषय दृष्टीस पडले म्हणजे पाहणाऱ्याच्या चित्तास मोठें आश्चर्य वाटतें, व मन व्यग्र होतें.

डोंगराच्या उत्तरेच्या टोकास " पारसनाथाची सभा " या नांवाचें लेणें आहे, व दक्षिण टोकास जें लेणें आहे त्यास " घेडवाडा " असें म्हणतात.

हें ठिकाण विटाळाचें समजून कित्येक लोक तें पहाण्यास जात नाहींत; पण तें लेणें पाहण्यासारखें सुरेख आहे. **पारसनाथाची सभा, इंद्रसभा** वगैरे कित्येक लेणीं फारच भव्य व उत्कृष्ट आहेत; पण त्या सर्वांचें वर्णन स्थलसंकोचामुळें करतां येत नाहीं. म्हणून त्या सर्वांत अप्रतिम असें जें "**कैलास**" देवालय आहे, त्याचें मात्र अल्प वर्णन खालीं दिलें आहे:—

हें देऊळ भोंवताल्हून खडक फोडून, मध्यें कोरून तयार केलें आहे. ह्याचें प्रवेशद्वार फारच भव्य व सुंदर आहे. त्याच्या दोन्ही बाजूंस बहुत नक्षी व कोरींव काम आहे. दरवाजाच्या दोन्हीकडे देवड्या असून वर मोठें दालन आहे. ही नगारखान्याची जागा असावी असें वाटतें. ह्या नगारखान्याचे पुढले खांब फार शोभायमान आहेत. दरवाजांतून आंत जातांना दोहों बाजूंस बहुत कोरींव काम आहे. त्यामध्यें उजव्या बाजूस अष्टभुजा भवानीची व डाव्या बाजूस गणपतीची मूर्ति आहे.

आंत गेलें म्हणजे मोठें विस्तीर्ण पटांगण लागतें. हें सर्व खडक फोडीत आणून केलें आहे; व त्या पटांगणांत मध्यें खडक राखून त्यांतून कांहींसें शंकाकृति असें मोठें देवालय कोरिलें आहे. ह्याचें काम फारच विलक्षण आहे. हें मुख्य देऊळ व दरवाजावरचा मजला हीं मध्यें खडक राखूनच केलेल्या एका पुलानें जोडिलीं आहेत. ह्या पुलाखालीं दरवाजा-समोर कमळावर बसलेल्या भवानीचा एक पुतळा आहे; त्याच्या दोन्ही बाजूंस दोन हत्ती आहेत व त्यांनीं आपल्या सोंडा उचलून धरून देवीच्या वर एकमेकींस लावल्या आहेत. दरवाज्याच्या आंत जातांना दोन्ही बाजूंस हत्ती आहेत, ते छिन्नभिन्न झालेले आहेत. हत्तीच्या दोन्ही बाजूंस दालनें आहेत, त्यांत डाव्या बाजूचीं विशेष सुरेख आहेत; व त्यांत पुष्कळ कोरींव काम आहे. पटांगणांत गेलें म्हणजे दोन्ही बाजूंस दोन सुटे खांब आहेत. या खांबांच्या शिखरांवरही कोरींव काम केलेलें असावें असें वाटतें;

परंतु हल्लीं तीं शिखरें मोडून गेलीं आहेत. त्या शिखरांवर एकेक सिंहाचें चित्र असावें असें डाव्या हाताच्या खांबावर जो कांहीं मोडका भाग राहिला आहे, त्यावरून अनुमान होतें.

वर सांगितलेल्या पुलाच्या मध्यभागीं नंदीचें चतुष्कोण देऊळ आहे. नंदीच्या देवळांतून निघून पुढें गेलें म्हणजे मुख्य देवळाचें पुढलें उघडें दालन लागतें. तें पुलापेक्षां उंच आहे; व फारच सुंदर आहे. ह्या दालनास दोन छानदार खांब आहेत, व त्या खांबांवर पुढल्या बाजूस दोन सिंह आहेत; व आंतल्या अंगास दुसरीं चित्रें आहेत. ह्या उघड्या दालनांतून मुख्य देवळाच्या मुख्य सभामंडपांत जावयाचा जो दरवाजा आहे तो फारच सुरेख असून त्याच्या दोन्ही बाजूंस मोठमोठीं चित्रें कोरलीं आहेत. मुख्य देवळाचा चौथरा सुमारें एक मजला उंच आहे. त्याच्या दोहों बाजूंस बाहेरच्या अंगावर एकीकडे रामरावणाची व एकीकडे कौरवपांडवांची अशा लढाया कोरल्या आहेत. व या चित्रांच्या मध्यें हत्ती, सिंह, वाघ वगैरे प्राण्यांचे मुखवटे कोरून, व तेच खांब ठेवून त्यांवर मुख्य देऊळ उभारिलें आहे असें दाखविलें आहे.

उघड्या दालनांतून सभामंडपांत जावें. मंडपांत दोहों बाजूंस खांबांच्या दोन ओळी आहेत. सभामंडपाचें मधलें दालन चौकोनी आहे, व त्याचे एकंदर खांब सोळा आहेत. ह्या मंडपाच्या शेवटच्या बाजूस गाभारा आहे, व त्यांत शिवाचें लिंग आहे. गाभाऱ्याच्या दोहों बाजूंचें कोरींव काम प्रेक्षणीय आहे. सभामंडपाच्या मध्यभागीं उभें राहिलें असतां दोहों बाजूंस दोन दारें आहेत, व त्यांच्या बाहेर दोन उघडीं दालनें आहेत. पैकीं उजव्या हाताकडील दालन व पटांगणांतला उजव्या हाताकडचा सोपा ह्यांच्यामध्यें पूर्वीं पूल होता, तो सुमारें शंभर वर्षांपूर्वीं पडला.

मुख्य गाभाऱ्याच्या तिन्ही बाजूंस मोकळा चौथरा आहे, व त्यावर दोहों बाजूंस दोन, आणि मागें तीन अशीं पांच देवळें आहेत. त्यांवरीलही कोरींव काम व नक्षी फार सुंदर आहे; पण देवळांत मूर्तीच नाहींत !

पटांगणांत मुख्य देवळाच्या सभोंवतीं मोठमोठे सोपे आहेत; ही इमारत बहुतेक भागास दुमजली आहे. या सोप्यांतही उत्कृष्ट कोरींव कामाचे अनेक नमुने पहावयास सांपडतील. उत्तरेकडील सोप्याच्या शेवटासही गाभारा असून त्यांत शिवाचें लिंग आहे. दक्षिणेकडचा सोपा तिमजली असून त्यांतही अनेक मूर्ति आहेत. वर जो पूल पडला आहे म्हणून सांगितलें, तो ह्याच सोप्यास जाण्याचा मार्ग असे. आतां येथें शिडी लाविल्यावांचून जातां येत नाहीं. औरंगझेब बादशहानें व इतर मुसलमानांनीं या देवळाची बहुत खराबी केली, व पुष्कळ मूर्ति छिन्नभिन्न करून टाकल्या आहेत!

अगदीं बाहेरून पाहिलें म्हणजे हें देऊळ अगदीं सरासरी भिकार दिसतें. परंतु आंत जाऊन तेथलें मुळापासून शिखरापर्यंत कोरींव कामानें भरलेलें मुख्य देऊळ व भोंवतालचे सोपे, सुटे खांब, हत्ती, व दुसरीं हजारों चित्रें हें सर्व जेव्हां दृष्टीस पडतें, तेव्हां फारच चमत्कार वाटतो. ह्या एवढ्या अफाट कामाचा नकाशा पूर्वी मनांत आणून तें ज्यांनीं तयार केलें असेल ते लोक किती कल्पक, सामर्थ्यवान् व दृढनिश्चयी असले पाहिजेत बरें? एक इंग्रज ग्रंथकार म्हणतो कीं, या स्थलाचें वर्णन करून पुरावयाचें नाहीं. त्याची वास्तविक कल्पना मनांत यावयास तें स्वतः डोळ्यांनींच पाहिलें पाहिजे!

कांहीं कालापूर्वी या देवळांची फार अनास्था होती. तेथें वाटेल त्यानें येऊन वाटेल तशी घाण करावी, केरकचरा टाकावा, असा प्रकार होता. हल्लीं निजाम सरकारांनीं येथें झाडलोट दुरुस्ती वगैरेची चांगली व्यवस्था केली आहे; यामुळें हें स्थळ पाहावयास येणारांची मोठी सोय झाली आहे.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांच्या ‘ अनेकविद्यामूलतत्व-
संग्रहा’वरून थोडा फेरफार करून.

---

## धडा ३

# स्फुट उपदेशपर ओंव्या

( दासबोध )

पृथ्वीमध्यें लोक सकळ । एक संपन्न, एक दुर्बळ, ।
एक निर्मळ एक ओंगळ, । काय निमित्तें ? ॥ १ ॥
कित्येक राजे नांदती, । कित्येक दरिद्र भोगती, ।
किती एकांची उत्तम स्थिति । कित्येक अधमाधम. ॥ २ ॥
हे सकळ गुणापाशीं गति । सगुण भाग्यश्री भोगिती ।
अवगुणास दरिद्र प्राप्ती । यदर्थीं संदेह नाहीं. ॥ ३ ॥
जाणता तो कार्य करी । नेणता कांहींच न करी ।
जाणता तो पोट भरी । नेणता भीक मागे. ॥ ४ ॥
रूप लावण्य अभ्यासितां नये । सहज गुणास न चले उपाय ।
कांहीं तरी धरावी सोय । आगंतुक गुणाची ॥ ५ ॥
जोंवरी चंदन झिजेना । तंव तो सुगंध कळेना ।
चंदन आणि वृक्ष नाना । सगट होती ॥ ६ ॥
आधीं कष्ट मग सुफळ । कष्टचि नाहीं तें निर्फळ ।
साक्षेपेंवीण केवळ । वृथा पुष्ट. ॥ ७ ॥
करंट्यास आळस आवडे । यत्न कदापि नावडे ।
त्याची वासना वावडे । अधर्मीं सदा. ॥ ८ ॥
सदा भ्रमिष्ट, निदसुरा । उगेंचि बोले सैरावैरा ।
कोणी एकाच्या अंतरा । मानेचिना ॥ ९ ॥
आळसें शरीर पाळिलें । परंतु पोटावीण गेलें ।
सुडकें मिळेनासें झालें । पांघरायासी ॥ १० ॥
झिजल्यावांचोनि कीर्ति कैची ? । मान्यता नव्हे कीं फुकाची ।
जिकडे तिकडे होते छी छी । अवलक्षणें ! ॥ ११ ॥

विद्या नाहीं, बुद्धि नाहीं, । विवेक नाहीं, साक्षेप नाहीं, ।
कुशलता नाहीं, व्याप नाहीं, । म्हणोनि प्राणी करंटा. ॥ १२ ॥
ऐका सदैवपणाचें लक्षण । रिकामा जाऊं नेदी क्षण ।
प्रपंचव्यवसायाचें ज्ञान । बरें पाहे ॥ १३ ॥
जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ।
जो स्वयेंचि कष्टत गेला । तोचि भला ॥ १४ ॥
ऐकिल्यावीण कळलें । शिकविल्यावीण शहाणपण आलें ।
हें देखिलें ना ऐकिलें । भूमंडळीं. ॥ १५ ॥
अवघाचि काळ सजे । तरी अवघेचि होती राजे ।
कांहीं सजे कांहीं न सजे । ऐसें आहे. ॥ १६ ॥
सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील त्याचें ।
परी येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे. ॥ १७ ॥
क्रियेवीण शब्दज्ञान । तेंची श्वानाचें वमन ।
भले तेथें अवलोकन । कदापि न करिती. ॥ १८ ॥
बोलण्यासारिखें चालणें । स्वयें करून बोलणें ।
तयाचीं वचनें प्रमाणें । मानिती जनीं. ॥ १९ ॥
जितुकें कांहीं आपणास ठावें । तितुकें हळूहळू शिकवावें ।
शाहाणे करोनि सोडावे । बहुत जन. ॥ २० ॥
बहुत जनासि चाळवी । नाना मंडळें हालवी ।
ऐसी हे **समर्थ** पदवी । विवेकें होते ॥ २१ ॥

रामदास

---

## धडा ४

# कीटकसृष्टि

### मुंग्या

"**लहानपण दे गा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥**—तुकाराम

मुंगी हा किडा अत्यंत लहान म्हणून त्याला साखर मिळते असें वरील अभंगांत दर्शवून, साधुवर्य तुकाराम यांनीं नम्रतेचा धडा घालून देण्यास

त्याचा उपयोग केला आहे. पण खरें पाहिलें तर मुंगीचें हें भाग्य तिच्या लहानपणावर अवलंबून नसून तिच्या दांडग्या उद्योगप्रियतेवर व आटोकाट शहाणपणावर अवलंबून असतें. हें कसें तें या धड्यांत दाखवावयाचें आहे.

घरांत एखादा गोड पदार्थ जेथें ठेवला असेल तेथें मुंग्यांची रवण सारखी लागलेली असते हें सर्वांस ठाऊक असेल. ह्या मुंग्या कोठून येतात हें पाहण्यासाठीं आपण जर त्यांचा माग काढीत गेलों, तर घरांत बहुधा भिंतीच्या बुडाशीं असलेलें एखादें लहानसें बीळ दृष्टीस पडेल. पण हें बीळ उकरून पाहणें गैरसोईचें असल्यामुळें आपण घराबाहेर परसांत किंवा रानांत त्यांची जेथें रवण लागली असेल तिच्या मार्गानें जावें, म्हणजे अखेरीस एका लहानशा मातीच्या टेकडीपाशीं आपण येऊं. या टेकडीस **वारूळ** असें म्हणतात. या वारुळांतून हजारों मुंग्या सारख्या आंत बाहेर जात येत आहेत असें नजरेस येईल.

वारूळ पाहिलें म्हणजे प्रथम आपणास त्याचें फारसें कौतुक वाटत नाहीं. हा एक बारीकसारीक काटकुड्यांचा व मातीचा चमत्कारिक ढीग आहे, अशी आपली कल्पना होते. पण या ढिगांतला मातीचा प्रत्येक कण व प्रत्येक काडी ह्या चिमुकल्या जीवानें स्वत: आणून वारुळाची रचना केली आहे, हा विचार मनांत आला म्हणजे मन आश्चर्यानें थक्क होतें ! पण एवढ्यानेंच भागत नाहीं. बारकाईनें पाहिलें म्हणजे असें दिसून येतें कीं, हा वेडावांकडा दिसणारा ढीग म्हणजे या चिमुकल्या जीवांनीं आपल्याकरितां बांधलेलें एक प्रचंड व अत्यंत व्यवस्थित शहर आहे !

या शहरांत त्यांतील रहिवाशांना राहण्याकरितां बांधलेलीं सुंदर व स्वच्छ घरें असतात; त्या घरांत मोठे दिवाणखाने, लहान लहान खोल्या, पडव्या, वगैरे सर्व सोयी असतात. वेगवेगळ्या घरांना जोडणारे लहान-मोठे रस्ते असतात; व एखाद्या मुंबईसारख्या शहरांतील रस्त्यांनीं जशी

माणसांची रहदारी सारखी चालू असते, तद्वतच या चिमुकल्या प्राण्यांनीं गजबजलेल्या वारूळरूपी शहरांत दिसून येते.

या प्राण्यांच्या हालचालीकडे नजर पोंचविण्यासाठीं वारुळाची एखादी बाजू उघडून पाहणें जरूर आहे. पण असें करतांना थोडी काळजी घेणें जरूर आहे. नाहीं तर ही मुंग्यांची सेना आपल्यावर तुटून पडण्याचा संभव आहे. आपल्या जमावांतील मुंग्यांखेरीज इतरांस आपल्या घरांत न येऊं देण्याविषयीं मुंग्या अत्यंत दक्ष असतात. एका वारुळांतील सर्व मुंग्या एकमेकांना चांगलें ओळखतात. त्यांतील कांहीं मुंग्या जरी चुकीनें दुसरीकडे गेल्या, तरी त्या पुनः आपलें घर शोधून काढितात; व मध्यंतरीं दोन तीन महिने लोटले असले तरी वारुळांतील मुंग्या या आपल्या चुकलेल्या बांधवांना ओळखून त्यांचें स्वागत करतात. पण जर का परक्या वारुळांतील मुंग्या आपल्या वारुळांत प्रवेश करूं लागल्या तर मात्र त्यांच्यावर जोराचा हल्ला करून या त्यांना मारून तरी टाकतात किंवा हांकलून लावतात.

पण या वारुळांत करीत तरी काय असतात, हें आपण थोडा वेळ पाहूं या. प्रथमदर्शनीं येथें सर्व घोंटाळा व बजबजपुरी आहेसें वाटतें. झाडावरून खालीं, वर, जमिनीवर, चहूंबाजूंनीं मुंग्या सैरावैरा धांवत आहेत, व यांच्या धांवण्यांत कांहीं शिस्त नाहीं, असा भास होतो. पण वस्तुस्थिति तशी नसते. यांपैकीं कांहीं थोड्या मुंग्या चैन करीत इकडे तिकडे बागडत असतील. पण बाकीच्या सर्व महत्वाचीं कामें करण्यांत गुंतलेल्या असतात. रानांतील निरनिराळ्या मार्गांनीं वारुळाकडे किंवा उलट वारुळाकडून रानाकडे त्यांतील कित्येक मुंग्या येत जात असतात; व परत येणाऱ्या मुंग्यांपैकीं कांहीं लहानसहान काड्या, पानांचे तुकडे, मातीचे कण वगैरे पदार्थ आणून वारूळ वाढविणें अगर त्याची दुरुस्ती करणें वगैरे कामें करीत असतात; कांहींजणी ( यांना

पाहिजे तर आपण " शिकारी मुंग्या " असें म्हणूं ) एक भली मोठी अळी मारून तिला ओढून आणीत असतात; या शिकारींत जर एखादी मुंगी जखमी झाली असेल तर तिची एखादी परोपकारी मैत्रीण तिला उचलून घराकडे नेत असते; दुसरे कांहीं थवे रस्त्यांची साफसूफ व दुरुस्ती करून त्यांचा मार्ग सुखकर करीत असतात. हा सर्व प्रकार चालू असतां मुंग्या मधून मधून थांबून एकमेकींशीं थोडें संभाषणही करतात असें दिसतें. त्यांची बोलण्याची तऱ्हा मोठी विलक्षण असते. त्या आपल्या मिशांनीं एकमेकींस हळूहळू स्पर्श करतात, व त्यायोगानें परस्परांचें मनोगत परस्परांना व्यक्त होतें. एखादा पदार्थ फार जड असल्यामुळें आपणास उचलणार नाहीं असें दिसलें, तर मुंगी आपल्या मैत्रिणींस बोलावून आणते, व मग सर्वजणी मिळून तो पदार्थ उचलून नेतात.

मुंग्यांचें मुख्य भक्ष्य म्हटलें म्हणजे किडे, मध, व कित्येक जातींच्या झाडांमधून निघणारा एक प्रकारचा द्रव हें होय. पण कांहीं जातींच्या मुंग्या एक फार चमत्कारिक तऱ्हेचें खाद्य मिळवितात. झाडांच्या पानावर उपजीविका करणारा " पानऊ " म्हणून एक लहान किडा आहे. याची वाढ एवढ्या झपाट्यानें होते कीं एखादी पानऊ जर एका झाडावर पडली तर थोड्याच वेळांत सर्व झाड अगदीं किडामय होऊन जातें व त्याच्या पानांचा फडशा पडतो. शेतकरी लोक यालाच " चिकटा " पडला असें म्हणतात, व केव्हां केव्हां सर्व पिकाची त्यानें नासाडी होते. या पानउवांच्या पाठीवर मागील बाजूस दोन शिंगें असतात. त्या शिंगांच्या मुळाशीं असलेल्या गांठींतून एक प्रकारचें गुळचट पाणी बाहेर येतें, त्यावरच त्यांच्या संततीची उपजीविका होत असते. पण मुंग्या कसल्या वस्ताद ! हा गोड रस बाहेर पडतांच तो त्या पानउवांच्या पिलांस न पिऊं देतां मुंग्या आपणच पितात ! इतकेंच नव्हे तर गवळी जशी गाईची धार काढतो, तद्वत् ह्या आपल्या गाईची धार काढून त्याचें गोड

दूध मिळविण्याचीही तजवीज मुंग्या करितात. ज्या पानावर पानऊ असेल तेथें जाऊन मुंगी आपल्या मिशांनीं उवेच्या पोटाला शिंगाजवळच्या भागास हळूहळू कुरवाळते. अशा कुरवाळण्यानें ती ऊ सुखावते, व गवळ्याच्या हातानें गाईस पान्हा फुटून ती जशी दूध देते, तशी ही ऊदेखील आपल्या गोड दुधाचा पान्हा घालते, व मग मुंगी तें पिते. एकीचें दूध पिऊन झाल्यावर दुसरीचें, याप्रमाणें पोट भरेपर्यंत क्रम चालतो. बहुतेक मुंग्या याप्रमाणें दूध मिळविण्याकरितां झाडांवर जातात. पण कांहीं मुंग्या झाडावर न जातां हें दूध मिळविण्यासाठीं पानउवांस धरून आपल्या घरांतच कोंडून ठेवतात व तेथेंच त्यांच्या खाण्यापिण्याची तजवीज करितात. कित्येक वेळां तर पानउवांना ज्या झाडाची आवड, त्याच्याच मुळाशीं मुंग्या आपलीं वारुळें बांधतात! वारुळांतील कांहीं मुंग्या या दूध मिळविण्याच्या कामावर खास नेमलेल्या असतात. पानउवांचें संरक्षण करणें, त्यांचीं अंडीं जपून ठेवणें, व त्यांतून बाहेर पडलेल्या किड्यांच्या भक्ष्याची तजवीज करून पुढील दुधाच्या पुरवठ्याची तजवीज करणें वगैरे कामें हे मुंग्यांतील गुराखी बिनचूक करीत असतात.

---

## धडा ५

# मुंग्या

### भाग २ रा

प्रत्येक वारुळांत तीन प्रकारच्या मुंग्या असतात; **स्त्री जातीच्या मुंग्या, पुरुष जातीच्या मुंग्या,** व **कामकरी मुंग्या.** पैकीं स्त्री जातीच्या मुंगीला "राणी मुंगी" असें म्हणतात. राणी मुंगी व पुरुषजातीची मुंगी या कामकरी मुंग्यांपेक्षां मोठ्या असतात. त्यांना तारुण्यावस्थेंत पंख फुटतात, व त्या वेळीं त्या हवेंत उडतात. कामकरी मुंग्यांना

मात्र कधीं पंख येत नाहींत; व त्यांना संततिही होत नाहीं. संतति फक्त राणी मुंगीलाच होते. व तिचें मुख्य काम अंडीं घालणें हेंच असतें.

राणी मुंग्यांची व नरांची संख्या कामकरी मुंग्यांच्या मानानें फारच लहान असते. एकदां पंखें आलीं म्हणजे नर जो उडून जातो तो बहुधा वारुळांत परत येत नाहीं. मग वारुळांत साम्राज्य काय तें या थोडया-शा राणीमुंग्या व हजारों कामकरी मुंग्या यांचेंच असतें. या कामकरी मुंग्यांना खरोखरच हें नांव शोभतें. यांना बिचाऱ्यांना पोट भरण्याखे-रीज स्वत:चें असें कांहीं काम नसतें. पण या अगदीं निरपेक्षपणें राणीमुंगी व तिची संतति यांची झटून सेवा करीत असतात.

त्यांचें आपल्या राणीवर प्रेमच तसें असतें. पंख आल्यावर राणी मुंगी जी बाहेर उडून जाते ती गर्भवती होऊनच परत येते. परत आल्याबरोबर ती आपले पंख उपटून टाकते, व पुन: वारुळाबाहेर जात नाहीं. राणी मुंगी याप्रमाणें परत आली म्हणजे पुढें मुंग्या अर्थात् जास्त होणार, व त्यांच्याकरितां जागा जास्त पाहिजे, असा विचार करून कामकरी मुंग्या वारूळ मोठें करण्याच्या नादास लागतात. एकदां अंडीं घातलीं कीं, राणी मुंगी त्यांची बिलकुल काळजी घेत नाहीं. अंड्यांची योग्य काळजी घेणें, त्यांस योग्य ती उष्णता लागावी म्हणून त्यांना एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेणें, तसेंच अंड्यां-तून निघालेल्या अळ्यांच्या* खाण्यापिण्याची तजवीज करणें, पुढें कोशां-तून बाहेर पडतांना त्यांस मदत करणें, हीं सर्व कामें कामकरी मुंग्यांनाच करावीं लागतात. राणी मुंगी जीं अंडीं घालते तीं सर्व

---

* येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, बहुतेक सर्व किड्यांप्रमाणें मुंग्यांनाही अंडावस्था, कीटावस्था, कोशावस्था, व पूर्णावस्था या चार अवस्थांतून जावें लागतें. चौथ्या पुस्तकांतील रेशमी किडयावरील धडयांत या अवस्थांचें थोडेंसें वर्णन आलें असल्यामुळें येथें त्याचा विशेष उल्लेख केला नाहीं.

सारखींच दिसतात. पण त्यांतून निघणाऱ्या मुंग्या मात्र, राणी, नर व कामकरी या तिन्ही जातींच्या असतात. पुढें कोणत्या अंड्यांतून कोणत्या प्रकारच्या मुंग्या निघणार, त्याची आगाऊ कल्पना या प्राण्यांना होते असें दिसतें. कारण अंडयांची शुश्रूषा करणाऱ्या कामकरी मुंग्या त्यांना वेगवेगळ्या घरांत ठेऊन त्यांची जोपासनाही वेगवेगळ्या प्रकारें करितात.

वारुळांतील एखादी मुंगी जर कांहीं कारणानें जखमी अगर आजारी झाली, तर इतर मुंग्या तिची चांगली शुश्रूषा करितात. पण तिचा रोग किंवा जखम जर असाध्य असेल, तर तिची बिलकुल पर्वा न करितां तिला वारुळाबाहेर ओढून खुशाल मरूं देतात. तसेंच काम करीत असतां जर एखादी मुंगी मातीमध्यें पुरली गेली, तर बाकीच्या मुंग्या अगोदर तिला मातींतून बाहेर काढितात. याप्रमाणें मित्रांविषयीं जरी त्या कनवाळूपणा दाखवितात, तरी शत्रूविषयीं त्यांचा द्वेषही अनावर असतो. एकदा शत्रु त्यांच्या तावडींत सांपडला, व एकदा कां त्यांनीं त्याला आपल्या जबडयांत पकडलें कीं, मान गेली तरी बेहत्तर, त्या त्याला सोडावयाच्या म्हणून नाहींत. लाल मुंगळ्यांच्या बावतींत ही गोष्ट पुष्कळांच्या नजरेस आली असेल. ते जर अंगास डसले, तर त्यांना तोडून काढलें तरी ते आपला चावा सोडीत नाहींत. या त्यांच्या गुणाचा उपयोग ब्राझिल देशांतले इंडियन लोक जखम शिवण्याचे कामीं करून घेतात. जखमेच्या दोन्ही कडा जवळ आणून त्या मुंग्यांच्या तोंडांत द्यावयाच्या व मग डोकें तेवढें ठेवून बाकीचा भाग तोडून टाकावयाचा, म्हणजे एक टांका मारल्यासारखें होतें. जखम जशी लहानमोठी असेल तसे कमी अधिक मुंग्यांचे टांके द्यावे लागतात !

मुंग्यांच्या अनेक प्रकारच्या जाती आहेत, व भिन्न जातींच्या माणसांप्रमाणें त्या एकमेकींहून अगदीं भिन्न असतात. कांहीं मुंग्या

दुसऱ्या वारुळांवर हल्ला करून त्यांतील अंडीं, अळ्या, व कोश आणून आपल्या वारुळांत भरतात. उद्देश हा कीं, ह्यांतून निघणाऱ्या मुंग्या पुढें आपल्या वारुळांत कामास उपयोगी पडाव्या. पूर्वीं कांहीं लोक दुसऱ्या देशांतील लोकांना पकडून आपले गुलाम करीत, त्यांतलाच हा प्रकार आहे. म्हणून यांना **गुलाम पकडणाऱ्या मुंग्या** असें नांव देण्यांत येतें. शेतकरी ज्याप्रमाणें धान्य पेरतो त्याप्रमाणें कांहीं मुंग्या एक प्रकारचें धान्य ( याला “मुंग्यांचे तांदूळ ” म्हणतात ) पेरून त्यांवर आपला निर्वाह करितात. यांना **शेतकरी मुंग्या** असें म्हणतात. दक्षिण अमेरिकेंत एक जातीच्या मुंग्या झाडांचीं पानें काढून तीं आपल्या डोकीवर छत्रीसारखीं धरून नेऊन त्यांनीं आपलीं वारुळें सजवितात. यांना तद्देशीय लोक **छत्रीच्या मुंग्या** असें नांव देतात. कांहीं मुंग्या तर केवळ शिकार करून आपलें पोट भरतात. याही दक्षिण अमेरिकेंतच सांपडतात. एकजुटीनें बाहेर पडून वाटेंत सांपडतील त्या कृमिकीटकांवर हल्ला करून त्यांना खात सुटणें हेंच यांचें काम. पण सर्वांत मौजेची गोष्ट ही कीं, या शिकारी मुंग्यांपैकीं कांहींना डोळे असतात, तर कांहीं अगदीं आंधळ्या असतात, व आपल्याकरितां तयार केलेल्या जमिनीखालच्या रस्त्यांतून त्या जात येत असतात.

या आश्चर्यकारक प्राण्याच्या शहाणपणाविषयीं आणखी कित्येक गोष्टी सांगतां येतील. पण विस्तार फार झाल्यानें येथें थांबणें भाग आहे.

**गणेश कृष्ण आगाशे कृत** “कीटक सृष्टि” या पुस्तकावरून संक्षेपानें.

---

## धडा ६
# साधुवर्य एकनाथ

महाराष्ट्रांत मुसलमानी अंमल जोरांत होता, त्या काळीं जे मोठे साधु व कवि होऊन गेले त्यांत **एकनाथ** हे सर्वांत श्रेष्ठ होत. त्यांचें अल्प चरित्र खालीं दिलें आहे.

एकनाथाचा पणजा **भानुदास** हा श्रीक्षेत्र **पैठण**चा राहणारा. **प्रतिष्ठान** अथवा **पैठण** हें शककर्ता **शालिवाहन** राजाच्या राजधानीचें शहर होतें; व तेव्हांपासून संस्कृतविद्येचें माहेरघर अशी त्याची प्रख्याति झालेली असून लोक त्याला "दक्षिणेंतील काशी" असें म्हणत.

भानुदास हा अत्यंत सच्छील व धार्मिक गृहस्थ होता. हा कापडाचा व्यापार करी. पण याची मुख्य प्रसिद्धि त्यानें केलेल्या एका महत्वाच्या कामगिरीनें झाली आहे. असें म्हणतात कीं, **पंढरपूरच्या विठोबा**ची मूर्ति **विजयनगर**चा राजा **कृष्णराय** यानें **अनागोंदी** येथें नेऊन तेथें तिची स्थापना केली. आपलें उपास्य दैवत नाहींसें झाल्यानें पंढरपूरच्या भक्तमंडळीस अत्यंत वाईट वाटलें. तेव्हां भानुदासानें अनागोंदीस जाऊन राजाचें मन वळवून त्या मूर्ति परत पंढरीस आणल्या. पंढरपूरच्या महत्वाचें बरेंचसें श्रेय याप्रमाणें भानुदासाकडे जातें.

भानुदासाच्या मुलाचें नांव **चक्रपाणी**. चक्रपाणीचा मुलगा **सूर्यनारायण** व सूर्यनारायणाचा मुलगा **एकनाथ**. याचा जन्म शके १४५० म्हणजे ( इ. स. १५२८ ) च्या सुमारास झाला. एकनाथ फार लहान असतांनाच त्याचे आईबाप वारले व या मुलाचा प्रतिपाळ करण्याचें काम त्याचा आजा चक्रपाणी याजवर पडलें.

एकनाथ मोठा बुद्धिमान् व प्रेमळ मुलगा होता. त्यानें लहानपणापासून हरिकीर्तन मोठया आनंदानें ऐकावें. सहाव्या वर्षी त्याची मुंज झाली, व तेव्हांपासून लवकरच त्यानें वेदांचें उत्कृष्ट अध्ययन करून आपल्या गुरूकडून शाबासकी मिळविली. पण लवकरच त्याला परमार्थाची इतकी गोडी लागली कीं, आपणास मार्गदर्शक असा कोणी तरी योग्य गुरु मिळावा असे विचार रात्रंदिवस त्याच्या मनांत घोळूं लागले. "**देवगड** अथवा **दौलताबाद** येथें **जनार्दनपंत देशपांडे** या नांवाचे गृहस्थ फार मोठे सत्पुरुष आहेत व त्यांच्याकडे गेल्यास तुला ईश्वरप्राप्तिचा

योग्य मार्ग सांपडेल" असा कोणी त्याला सल्ला दिल्यावरून, हा बारा वर्षांचा मुलगा, आपल्या आजाआजींनाही न विचारतां, एकदम जो घरांतून बाहेर पडला तो तडक देवगडपर्यंत गेला; व तेथें त्यानें जनार्दनपंताच्या पायांवर डोकें ठेवलें!

प्रपंच योग्य तऱ्हेनें करून परमार्थाचीही प्राप्ति करून घेणारे असे जे फार थोडे महात्मे या जगांत मधून मधून होतात त्यांतच जनार्दनपंतांची गणना केली पाहिजे. हे मोठे मुत्सद्दी, शूर योद्धे व फारच उच्च दर्जाचे साधु होते. बाहामनी पातशाहीचे हे नौकर होते, व वाढतां वाढतां ते दौलताबादचे मुख्य किल्लेदार झाले होते. हे दत्तोपासक होते, व यांना आपल्या उपास्यदेवतेचा साक्षात्कारही झाला होता असें सांगतात. अशा थोर विभूतीच्या शिष्यत्वाचा लाभ एकनाथास झाला, हें त्याचें महद्भाग्य होय. एकनाथानें सुमारें सहा वर्षेपर्यंत आपल्या गुरूची अत्यंत मनोभावानें सेवाचाकरी करून त्यांचा अनुग्रह संपादन केला. त्याच्या या वेळच्या चरित्राविषयीं दोन फार बोधप्रद आख्यायिका सांगतात:—

( १ ) एकदां जनार्दनस्वामी ध्यानपूजनांत निमग्न असतां दौलताबादवर शत्रूचा हल्ला आला. स्वामींकडे वर्दी देण्याकरितां सेवक आले, तों स्वामी ध्यानस्थ असून दाराबाहेर एकनाथ बसलेला त्यांना आढळला. एकनाथानें पाहिलें कीं गुरूच्या ध्यानाचा भंग करावा तरी पंचाईत, व न करावा तरी तिकडूनही अडचण! त्यानें पटकन् जनार्दनस्वामींचा लढाईच्या वेळीं घालण्याचा सर्व पोशाक अंगावर चढविला, व अश्वारूढ होऊन तो बाहेर पडला. झालें; खुद्द जनार्दन स्वामी आले या समजुतीनें लोकांत आवेश चढला, व लढाई जोराची होऊन शत्रूची दाणादाण झाली, व परचक्र परतलें! खुद्द एकनाथही या प्रसंगीं खूब शौर्यानें लढला. लढाई संपल्यावर एकनाथानें स्वामींचा पोषाख

पुन: जेथल्या तेथें ठेवला व आपल्या कामास लागला. जनार्दनस्वामींस याची दादच नव्हती. पण जेव्हां पुढें सर्व हकीकत कळली तेव्हां त्यांना आपल्या शिष्याची जी धन्यता वाटली असेल ती वर्णन करून सांगणें अशक्य आहे.

( २ ) दुसरी गोष्ट एकनाथाच्या एकाग्रतेची आहे. जनार्दनपंतांनीं त्याजकडे हिशेबाचें काम सोंपविलें होतें. एके दिवशीं संध्याकाळीं हिशेबाचा ताळेबंद तयार करतां करतां त्याला एका अडक्याची चूक लागली. ती शोधून काढल्याखेरीज त्याला चैन पडेना. रात्रीं दिव्याला भरण घालून स्वारी ती चूक काढण्याकरितां म्हणून जी बसली, ती अडीच प्रहर रात्र उलटून गेली तरी बसलेलीच! तीन प्रहर रात्र झाली तेव्हां जनार्दनस्वामी उठले, व पहातात तों एकनाथ जागाच असून कसल्याशा विचारांत व्यग्र आहे. इतक्यांत हिशेब जमला; एकनाथाला इतका हर्ष झाला कीं त्यानें आनंदानें टाळी पिटली. जनार्दनस्वामीस कौतुक वाटून त्यांनीं विचारलें "एकनाथ, तुला एवढा हर्ष कसला झाला ?" एकनाथानें सर्व हकीकत सांगितली. त्यावर स्वामी म्हणाले " नाथा ! तुला अडक्याची चूक सांपडली तर इतका आनंद झाला आहे, तर मग संसाराची चूक सांपडल्यास किती आनंद होईल बरें ? बाळा, असाच जर ईशचरणीं लक्ष लावशील तर काय होणार नाहीं ? "

पुढें लवकरच जनार्दनस्वामींची एकनाथावर पूर्ण कृपा होऊन ज्या उद्देशानें तो घरदार सोडून बाहेर पडला होता तो साध्य झाला. त्याला गुरुकृपेनें श्रीदत्ताचें दर्शनही झालें असें म्हणतात. तथापि वैराग्य व भक्ति अंत:करणांत कायमची बाणण्यासाठीं कांहीं दिवस कडकडीत तपश्चर्या करणें जरूर आहे असें जनार्दनस्वामींस वाटल्यावरून, त्यांनीं नाथांस तसें करण्यास सांगितलें. व त्याप्रमाणें नाथांनीं भक्तिपुर:सर तपश्चर्या करण्यांत कांहीं काळ घालविला. मग गुरूची आज्ञा

घेऊन त्यांनीं सुमारें दोन अडीच वर्षें तीर्थयात्रा केली, व हिंदुस्थानांतील बहुतेक पवित्र स्थलांचें दर्शन घेतलें.

इकडे एकनाथ याप्रमाणें ईशभक्तींत तल्लीन होऊन परमार्थसाधनांतच काळ घालवीत असतां, तिकडे त्याचीं वृद्ध आजा आजी मात्र अत्यंत कष्टानें काळ कंठीत होतीं. आपल्या कुळाचा एकुलता एक आधार, व अत्यंत प्रेमळ व बुद्धिमान् असा आपला नातू ज्या दिवशीं नाहींसा झाला, त्या दिवशींच्या त्यांच्या अवस्थेचें वर्णन करणें अशक्य आहे. त्यांनीं रडून आकांत केला. सर्व पैठणभर शोध केला; तो कोठें बुडून तर मेला नाहीं ना, अशी भीति वाटून त्यांनीं सर्व विहिरी, तलाव, नदी वगैरे तपासून पाहिलीं. चोहोंकडे माणसें शोधार्थ पाठविलीं; पण पत्ता नाहीं ! अशा स्थितींत बिचाऱ्यांना दहा अकरा वर्षें कंठावीं लागलीं. शेवटीं त्यांच्या शेजारच्या एका पुराणिकानें मोठ्या हुशारीनें शोध काढीत एकनाथाचा पत्ता लाविला; पण या वेळीं तो गुरूच्या आज्ञेनें तीर्थयात्रेस गेला आहे असें कळलें. तेव्हां तो पुराणिक जनार्दनस्वामींकडे गेला, व त्यानें हात जोडून त्यांस विनंति केली कीं, "एकनाथासाठीं त्याचीं आजाआजी तळमळत आहेत, तर तो तीर्थयात्रा करून परत पैठणास आला म्हणजे फिरून दूर न जातां घरींच राहून, व लग्न वगैरे करून त्यानें भानुदासाचा निर्मळ वंश पुढें चालवावा, अशी जर आपण त्यास आज्ञा केली तर महदुपकार होतील." स्वामींनाही त्या वृद्ध दांपत्याची कींव आली, व एकनाथ आतां प्रपंच करण्यास पात्र झाला आहे असें वाटून, आतां घरींच राहून गृहस्थाश्रम पत्करावा, अशा अर्थाचें त्यांनीं एकनाथास एक पत्र लिहिलें, व तें त्या पुराणिकाजवळ दिलें. तें पत्र घेऊन ब्राह्मण परत येतांच त्या वृद्धांस किती आनंद झाला असेल, याची कल्पनाच करावी. त्यांना जीवदान मिळाल्याप्रमाणें झालें व एकनाथ केव्हां येतो, याची ते

आतुरतेनें वाट पाहूं लागले. सुदैवानें तो सोन्याचा दिवस उगवण्यास वेळही फार लागला नाहीं. तीर्थयात्रा करीत करीत नाथ एकदां स्वतःच्या गांवींच उतरले. त्यांनीं होऊन आपली ओळख देण्याचा प्रयत्न तर केला नाहींच; पण भिक्षावृत्तीनें आपला उदरनिर्वाह करण्याचा क्रम ठेविला. तथापि एक दिवस पुराणिकानें नाथांस ओळखिलें, व मग त्या वृद्ध जोडप्यास घेऊन तो एकनाथाकडे गेला. भेट होतांच चक्रपाणीनें नाथांच्या गळ्यास मिठी मारली! व "बापा, एकनाथा, आम्हां म्हाताऱ्यांना सोडून कसा रे तूं गेलास ?" असें म्हणून अश्रु गाळण्यास सुरवात केली. पुष्कळ काळ वियोग झालेल्या प्रिय जनांच्या भेटीचा आनंद कांहीं अजब असतो! त्या आनंदाचा उमाळा अमळ ओसरल्यावर चक्रपाणीनें नाथांस त्यांच्या गुरूचें पत्र दाखविलें. तें नाथांनीं मस्तकीं धारण करून गुर्वाज्ञेप्रमाणें त्याच ठिकाणीं मुक्काम केला. पत्र हातीं आलें त्याच जागेवर नाथांनीं पुढें आपलें घर बांधलें. हें घर पैठणास अद्याप आहे.

---

## धडा ७

# साधुवर्य एकनाथ

### भाग २ रा

लवकरच नाथांचा विवाह होऊन ते गृहस्थ बनले. त्यांना पत्नीही त्यांच्याच तोडीची सुस्वभावी व प्रेमळ अशी मिळाल्यामुळें त्यांचा संसार सर्वतोपरी स्पृहणीय असा झाला. कांहीं दिवस नातवाचें संसारसुख पाहून तीं वृद्ध आजाआजी इहलोक सोडून गेलीं; व प्रपंचाचा सर्व भार एकनाथ व **गिरिजाबाई** यांजवर पडला. पण जनार्दनस्वामींच्या तालमींत तयार झालेल्या नाथांनीं संसार इतका उत्तम चालविला कीं, प्रपंच साधून परमार्थाचा लाभ कसा करून घ्यावा याविषयीं नाथांचें चरित्र

म्हणजे एक उत्तम आदर्श होऊन बसलें आहे. त्यांचा नित्यक्रम असा असे. पहांटे उठून प्रातःस्मरण वगैरे झाल्यावर प्रातःस्नानास गंगेवर जावें, व सूर्योदयापूर्वी संध्यावंदनादि विधि सारावे. नंतर घरीं येऊन पूजा अर्चा यथास्थित करून गीताभागवतादि ग्रंथांचें पारायण करावें. मध्याह्नसमयीं पुनः गंगेवर स्नान करून, नैवेद्य वैश्वदेव आटपून, व अतीत अभ्यागतांचा समाचार घेऊन, सर्वांसह भोजनास बसावें. तिसरे प्रहरीं विठोबाच्या देवळांत गीता, भागवत वगैरे ग्रंथांवर पुराण सांगावें; संध्याकाळींही गंगेवर संध्याविधि आटोपून घरीं आल्यावर देवाची आरती वगैरे करून फराळ करावा, व तदनंतर मध्यरात्रीपर्यंत कीर्तन, वेदांतपर चर्चा किंवा वाचन यांत काळ घालवावा.

सर्वांभूतीं ईश्वर भरला आहे अशी त्यांची भावना झाली असल्यामुळें खऱ्या भूतदयेचें त्यांच्या ठिकाणीं पूर्ण वास्तव्य होतें. याविषयीं अनेक मौजेच्या आख्यायिका सांगतात. त्यांपैकीं एक दोन येथें देतों: एके दिवशीं नाथ मध्यान्हस्नानासाठीं गंगेवर चालले होते. वाटेंत एक महाराचें पोर आईमागून धांवत होतें. आई केव्हांच पुढें निघून गेली, व प्रखर उन्हानें तापलेल्या वाळवंटांतून धांवतांना त्या पोराचा प्राण कासावीस होऊं लागला. अशा स्थितींत तें मूल पाहतांच नाथांच्या अंतःकरणाला कळवळा आला, व तें मूल अंत्यजाचें आहे हा विचार मनांत न आणतां त्यांनीं त्याला चटकन् उचलून कडेवर घेतलें व महारवाड्यांत नेलें; तेथें मुलानें आपलें घर ओळखलें; इतक्यांत आईही आली. मूल आईबापांच्या स्वाधीन करून त्याला नीट जपावयास सांगून नाथ पुनः गंगेवर गेले! एकदा तर नाथांनीं पाण्यावांचून तडफडणाऱ्या एका गाढवास जीवदान दिलें. त्या वेळीं ते रामेश्वराच्या यात्रेस काशीहून भागीरथीची कावड घेऊन चालले होते. रामेश्वरानजीकच एक गाढव वाळवंटांत पाण्याविना तळमळत पडलें होतें. नाथांनीं

लगेच आपल्या कावडींतील गंगा त्या गाढवाच्या तोंडांत सोडून त्याची तृषा शांत केली. त्याबरोबर हुशारी येऊन तें गाढव टुणूकन् उडी मारून निघून गेलें ! बरोबरच्या लोकांस हा प्रकार आवडला नाहीं. ते म्हणाले " हें काय ? तुम्ही भागीरथीचें पाणी फुकट दवडलें, व आतां यात्रा निष्फळ झाली ! " नाथ म्हणाले, " वेडयांनों, तुम्ही चुकत आहां. **ही कावड रामेश्वराला खास पोंचली !** परमेश्वर सर्वांभूतीं आहे हें वारंवार ऐकून तुम्ही योग्य प्रसंगीं तें कसें विसरतां ? " कविवर्य **मोरोपंत** या प्रसंगाला अनुलक्षून म्हणतात—

"पाणी एकोपंत द्रवुनि विकल तृषित रासभा पाजी ।
'तें लक्षविप्रभोजनसम झालें' म्हणति साधु बापा जी ॥"

लहान मोठा, उच्च व नीच हा भेद परमेश्वराच्या घरीं नाहीं, हें तत्व त्यांच्या हृदयावर पक्कें ठसलें होतें; व त्याप्रमाणें ते आचरणही करीत. एकदां त्यांचे घरीं वडिलांचें श्राद्ध होतें. त्याकरितां जो स्वयंपाक चालला होता त्याचा सुगंध नाथांच्या दारावरून जाणाऱ्या चारपांच महारांना आला. तेव्हां " वाहवा, असें सुग्रास अन्न आम्हाला केव्हां तरी मिळेल कां ? " असे उद्गार त्यांच्या तोंडून बाहेर पडले. हें त्यांचें भाषण नाथांच्या कानीं पडतांच त्यांचें हृदय द्रवलें; व त्यांनीं लगेच त्या महारांना भोजन देण्याचा बेत ठरवून केलेलें सर्व अन्न महारांची एक मोठी पंगत करून त्यांना वाढून टाकिलें. अर्थात् अंत्यजांना आधीं जेवण घातलें हा भ्रष्टपणा झाला असें पैठणच्या कर्मठ व अडाणी ब्राह्मणांना वाटलें; व एकनाथासारख्या भ्रष्ट मनुष्याच्या हातचें अन्न आपण ग्रहण करणार नाहीं असें त्यांनीं सांगितलें. पण दयार्द्र अंतःकरणानें क्षुधितांस केलेल्या अन्नदानानें संतुष्ट होऊन खुद्द एकनाथाचे पितर येऊन पानावर बसले व त्यामुळें श्राद्ध यथासांग पार पडलें, अशी याविषयीं कथा सांगतात.

पण कर्मठपणाच्या सोंवळ्या ओंवळ्याला बाजूला सारून भूतदयेचा जो स्तुत्य धडा नाथ घालून देत होते, त्यामुळें कांहीं लोक त्यांचा

अत्यंत द्वेष करूं लागले. त्यांनीं नानाप्रकारें एकनाथाचा छळ करण्यास सुरवात केली. पण नाथ आपल्या छळकांवर कधीं रागावलेही नाहींत, व त्यांनीं आपला मार्ग सोडलाही नाहीं. शांतीची तर ते केवळ मूर्तीच होते ! एकदा एक यवन नाथ स्नान करून येत असतां त्यांचे अंगावर थुंकला. हूं कां चूं न करितां परत गंगेवर जाऊन त्यांनीं फिरून स्नान केलें. पण परत येत असतां फिरून यवन अंगावर थुंकला. यांनीं फिरून स्नान केलें. असा प्रकार संध्याकाळपर्यंत चालून एकशें आठ स्नानें झालीं, तरी नाथांच्या तोंडून ब्र निघाला नाहीं. तेव्हां मात्र तो यवन ओशाळला, व त्यानें नाथांच्या पायावर डोई ठेवून त्यांची क्षमा मागितली. दुसरे एके वेळीं, एकनाथाला राग आणशील तर तुला दोनशें रुपये देऊं, असें एका गरजू ब्राह्मणाला गांवांतील कुटाळ लोकांनीं सांगितलें. तेव्हां त्यानें नाथांस त्रास देण्याची पराकाष्ठा केली, तरी त्यांना राग येईना. शेवटीं त्यानें एकदां सर्व मंडळी भोजनास बसलेली असून गिरिजाबाई वाढीत असतां पटकन् तिच्या पाठीवर उडी मारली ! त्यासरसे नाथ गिरिजाबाईस म्हणाले, "हं संभाळ हो, ब्राह्मण पडेल बिडेल एखादा !" गिरिजाबाई तरी नाथांची धर्मपत्नीच होती. त्या माउलीनें हंसत हंसत उत्तर केलें, "आहे मला हरिपंडितांला पाठीवर घेऊन काम करण्याची संवय ! मी या माझ्या दुसऱ्या बाळाला अगदीं पाडावयाची नाहीं." या विलक्षण शांतीनें मात्र त्या ब्राह्मणाला लाजून मेल्यासारखें झालें, व त्यानें नाथांची माफी मागितली; व आपण त्यांना केवळ २०० रुपयांकरितां इतका त्रास दिला याबद्दल खेद प्रदर्शित केला. तेव्हां नाथ म्हणाले, "अहो, हें मला तुम्हीं आधीं कां नाहीं सांगितलें ? मला हें माहीत असतें तर मी तुमच्यासाठीं रागावलों असतों !"

---

१ एकनाथाचा मुलगा.

विद्वान् व कर्मठ ब्राह्मणांना एकनाथांचा फार राग येण्याचें आणखी एक कारण होतें. ते मराठींत ग्रंथरचना करीत, व त्या वेळच्या विद्वान् शास्त्री पंडितांना संस्कृत भाषेंतील ( विशेषेंकरून **वेद** व **उपनिषदें** ) ग्रंथांचा अर्थ मराठींत करणें हें धर्मभ्रष्टतेचें लक्षण आहे असें वाटे. या बाबतींत तीनशें वर्षांपूर्वी **मुकुंदराज** व **ज्ञानदेव** यांनीं स्तुत्य धैर्य दाखवून मराठींत ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली होती. पण मध्यंतरीं मुसलमानांच्या स्वाऱ्यांनीं देशांत जी अस्वस्थता माजली, तिनें ही परंपरा थोडीशी मागें पडली होती. खुद्द ज्ञानदेवांचा सुप्रसिद्ध ग्रंथ "**ज्ञानेश्वरी**" हाही लोपून गेल्यासारखाच झाला होता. नाथांनीं ज्ञानेश्वरीची जुनी प्रत शोधून काढून, व तींत लेखनाच्या वगैरे ज्या चुका होत्या त्या सुधारून तिचा उद्धार केला. हे त्यांचे मराठी भाषेवर अत्यंत मोठे उपकार झाले आहेत. खुद्द नाथांनींही अनेक मराठी ग्रंथ लिहून भाषेची फार उत्कृष्ट सेवा केली. त्यांतल्यात्यांत '**भावार्थ रामायण**,' '**एकनाथी भागवत**' व '**रुक्मिणीस्वयंवर**' हे ग्रंथ फार लोकप्रिय आहेत. त्यांची रचना फारच सोपी, रसाळ व हृदयंगम आहे. एकनाथी भागवत ही **श्रीमद्भागवत** या संस्कृत ग्रंथामधील वेदांतपर अशा एकादशस्कंधावरील टीका आहे, व नाथांचा सर्वांत महत्वाचा ग्रंथ हाच होय. याचा थोडा भाग तयार झाल्यावर त्यांच्या एका शिष्यानें काशीस जाऊन तो वाचण्यास सुरवात केली. तेव्हां तेथील एका संस्कृताभिमानी संन्याशास फार राग आला; व हा मोठा अपराध झाला असें समजून नाथांची चौकशी करण्याकरितां त्यांना काशीस बोलावण्यांत आलें. पण नाथांनीं तेथें जाऊन जेव्हां त्या ग्रंथाचें रहस्य त्या स्वामींना समजावून दिलें तेव्हां त्यांचा राग शांत होऊन उलट ते नाथांवर फार प्रसन्न झाले; व तो ग्रंथ काशींतच पूर्ण करावा अशी त्यांनीं नाथांस आज्ञा दिली. नाथांनीं त्याप्रमाणें काशीक्षेत्रींच त्याची समाप्ति केली.

एकनाथाच्या प्रेमळ भक्तीनें प्रसन्न होऊन खुद्द **श्री विठोबा** "श्रीखंडया" या नांवाच्या ब्राह्मणाचा वेष घेऊन त्यांच्या घरीं शागीर्दाचें काम करीत राहिला होता, अशी एक दंतकथा आहे. तो कांहीं एक वेतन घेत नसे असें म्हणतात. नाथांनीं असें कां म्हणून विचारतां तो म्हणे "मला पैसा काय करावयाचा आहे ? माझें लग्न करून द्या म्हणजे झालें." पुढें, "एकनाथाच्या घरीं मी श्रीखंडया या नांवानें असतों, तेथें माझें तुला दर्शन होईल" असा श्रीविठ्ठलानें एका ब्राह्मणास दृष्टांत दिला. तेव्हां तो ब्राह्मण एकनाथाच्या घरीं श्रीखंडयाला शोधीत आला. पण पहातात तों काय ? श्रीखंडयाचा पत्ता नाहीं ! मग नाथांना फार वाईट वाटलें; व श्रीखंडयाचें प्रत्यक्ष लग्न आपल्या हातून झालें नाहीं तर निदान त्याचें वर्णन तरी करावें, अशा हेतूनें त्यांनीं **रुक्मिणीस्वयंवर** हा ग्रंथ रचून श्रीकृष्णाच्या विवाहाचें वर्णन केलें, अशी आख्यायिका सांगतात.

अशा रीतीनें भगवद्भक्ति व परोपकार यांत आपल्या आयुष्याचा सद्व्यय करून व आपल्या उदात्त चारित्र्यानें हजारों लोकांस उत्कृष्ट धडा घालून देऊन हा लोकोत्तर महात्मा ( शके १५३१ ) इ. स. १६०९ सालीं इहलोक सोडून गेला. नाथांनीं समाधि घेऊन आज तीनशेंवर वर्षें होऊन गेलीं आहेत. पण त्यांचे अलौकिक ग्रंथ अद्याप त्यांचा उपदेश आपल्यास रसाळ वाणीनें देत आहेत. त्यांचें अध्ययन, मनन करून इहपरलोकीं धन्य होण्याचा यत्न करणें हें आपणा सर्वांचें काम आहे.

**लक्ष्मण रामचंद्र पांगारकर** यांच्या
" एकनाथ चरित्र " याचे आधारें.

---

## धडा ८
## स्वदेशप्रेम
### श्लोक

सृष्टी तुला वाहुनी धन्य माते ! अशी रूपसंपन्न तूं निस्तुला !
तूं कामधेनू, तशी कल्पवल्ली, सदा लोभला लोक सारा तुला;

ह्या वैभवाला तुझ्या पाहुनीयां मला स्फूर्ति नृत्यार्थ होई जरी
सामर्थ्य नामीं तुझ्या **आर्यभूमी** ! तसें पाहिलें मीं न कोठें तरी ! १
माते ! महात्मे तुझे, तत्ववेत्ते तुझे, शूर योद्धे तुझे, सत्कवी,
श्रेणी जयांची सदा माझिया गे, मना आपुल्या पूजनीं वांकवी;
यांचीं यशें ज्या नव्या सद्गुणांना मला अर्पिती ध्येय तें गे जरी,
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्य-भूमी ! तसें पाहिलें मी न कोठें तरी ! २
तूझ्या महोदार सारस्वताच्या महासागरींचा जरी मीन मी !
झालों, तरी गे तृषा मन्मनाची कधींही कधींही न होणें कमी !
माते ! गुरुस्थान अंतीं जगाचें तुझें यांत शंका न कांहीं जरी,
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी ! तसें पाहिलें मी न कोठें तरी ! ३
वारा तुझ्या स्पर्शनें शुद्ध झाला ! मला लाधला भाग्य हें केवढें !
माते ! स्वयें देशि जें अन्नपाणी सुधा बापुडी कायशी त्यापुढें !
तूं बाळगीशी मला स्कंधिं अंकीं सुखाची खरी हीच सीमा जरी,
सामर्थ्य नामीं तुझ्या आर्यभूमी ! तसें पाहिलें मी न कोठें तरी ! ४

**ना. वा. टिळक**

---

### धडा ९

## एकाद्याचें नशीब

कांहीं गोड फुलें सदा विहरती स्वर्गांगनांच्या शिरीं,
कांहीं ठेवितसे कुणी रसिकहि स्वच्छंद हृन्मंदिरीं;
कांहीं जाउनि बैसती प्रभुपदीं—पापापदा वारि तें,
एकादें फुटकें नशीब म्हणुनी प्रेतास शृंगारितें ! १
कोणी पर्वत आपुल्या शिरिं धरी हैमप्रभा शीतला,
कोणाच्या उदरामधून निघती मोठ्या नद्या निर्मला;
कोणाला वनदेवता वरितसे मोदांत जी वाहते !
एकाद्या मधुनी परंतु जळती ज्वालानदी वाहते ! २

झाडें जोडुनि पत्रयुग्म फुटलें मेघाप्रती याचती,
स्वच्छंदें जलबिंदु तोंच सगळ्या पानांवरी नाचती;
सारीं पालवती, फुलें विहरती, शोभा वरी लोळते,
एकाद्यावर मात्र वीज पडुनी त्या जाळते पोळते ! ३
चाले खेळ असा जगांत; बहुधा सौख्यांत सारे जरी,
एकादा पडतो तसाच चुकुनी दुःखार्णवीं यापरी;
पाही कोण अशा हताश हृदया ? जो तो असे आपला !
देवा ! तूं तरि टाक अश्रु वरुनी, त्यासाठिं तो तापला ! ४

**गोविंदाग्रज** ( रा. ग. गडकरी )

---

## धडा १०

# व्यापार व अदलाबदल

मुलांनो, तुम्ही " आंधळा व पांगळा मनुष्य " ही गोष्ट वाचलीच असेल; व तिजवरून तुमच्या लक्षांत असेलच कीं, आंधळ्या मनुष्यानें पांगळ्याला आपल्या खांद्यावर वाहून नेलें; व पांगळ्यानें आंधळ्यास आपल्या दृष्टीचा फायदा देऊन वाट दाखविली. आंधळ्यांत दृष्टीचें व्यंग होतें, पण इतर सर्व अवयव शाबूत होते. व पांगळ्यांतही पायांखेरीज दुसऱ्या कोणत्याही बाबतींत व्यंग नव्हतें. यामुळें त्या दोघांनीं आपल्या जवळच्या शक्तींची जरुरीपुरती अदलाबदल केली व आपली अडचण दूर केली.

अशाच तऱ्हेच्या अडचणी व्यवहारांत आपणास पदोपदीं येतात. मजजवळ धान्य भरपूर आहे, पण कापड नाहीं; व माझ्या शेजारीं एकाजवळ कापड भरपूर आहे, पण धान्याची उणीव आहे. अशा स्थितींत वरील आंधळ्या पांगळ्याप्रमाणें आम्ही आपल्या जवळच्या वस्तूंची अदलाबदल केली तर दोघांचीही सोय होईल. व असें आपण पुष्कळ वेळां करितोंही.

मनुष्यसमाज ज्या वेळीं अगदीं रानटी स्थितींत होता त्या वेळीं सुद्धां त्याला थोड्याबहुत वस्तूंची गरज पडत असे, व एकाजवळ एका वस्तूची जरुरीपेक्षां जास्त समृद्धि, पण दुसऱ्या एखाद्या वस्तूची उणीव, व त्याच वस्तूसंबंधीं दुसऱ्याची याच्या उलट स्थिति, असा प्रकार होत असे. उदाहरणार्थ एका माणसाला आज शिकार अनायासें पुष्कळ मिळाली, व मांसाची फारच चंगळ झाली; पण तें भाजण्यास लांकडें पाहिजे आहेत. दुसऱ्या एकाजवळ लांकडें पुष्कळ आहेत, पण त्याला आज शिकार कांहीं सांपडली नाहीं. अशा स्थितींत ते परस्परांना जरूर असलेल्या पदार्थांचा **विनिमय** ( अदलाबदल ) करून आपआपली गरज भागवून घेतील हें उघडच आहे.

समाज जसजसा सुधारत जातो, व त्याच्या गरजा वाढत जातात तसतशी श्रमविभागाची आवश्यकता कशी वाढत जाते, व त्यानें समाजामध्यें निरनिराळे धंदे करणारे अनेक वर्ग कसे उत्पन्न होतात हें मागें* एका धड्यांत आपण पाहिलेंच आहे. अशी स्थिति झाली म्हणजे अदलाबदलीची आवश्यकता अधिकच वाढते. कारण अदलाबदल न केली तर शेतकऱ्याजवळ धान्य तर धान्यच, लोहाराजवळ लोखंडी वस्तु तर लोखंडी वस्तूच; कोष्टयाजवळ केवळ कापड, चांभाराजवळ नुसते जोडे, अशी स्थिति होते. अर्थात् एका कोणत्या तरी वस्तूची जरूरीपेक्षां जास्त समृद्धि, व इतर वस्तूंचा अभाव असा प्रकार जास्त होतो.

अशा स्थितींत अदलाबदल कशी चालेल हें आतां आपणास पहावयाचें आहे. साध्या अदलाबदलीनें आतां काम भागणार नाहीं. समजा, रामा शेतकऱ्याजवळ धान्य पंचवीस कुटुंबांना पुरून उरेल इतकें आहे, पण दुसरें कांहीं नाहीं; व पिऱ्या चांभाराजवळ कमींतकमी पंचवीस जोड वहाणांचे आहेत, पण त्याला बाकी सर्व वस्तूंची जरूर आहे. या दोघांनीं

* पांचवें पुस्तक धडा १६ वा पाहा.

आपल्याजवळच्या वस्तूंची अदलाबदल केल्यास निदान तेवढ्यापुरती तरी त्यांची गरज भागणार नाहीं काय ? होय भागेल. पण प्रथम या दोघांची गांठ तरी पडली पाहिजे ना ? एखाद्या दहापांच घरांच्या खेड्यांत तें सोपें असेल. पण लहानशा शहरांतही तें मुष्किलीचें होईल. दुसरें असें कीं, रामाजवळ धान्य व पिऱ्याजवळ जोडे आहेत खरे; पण पिऱ्याला धान्याची गरज नसून कदाचित् कापडाचीच असेल; व रामाजवळ तर धान्याखेरीज कांहीं एक नाहीं. कदाचित् असेंही असूं शकेल कीं, पिऱ्याजवळ आहेत पंचवीस वहाणा, व रामाला तर पाहिजे एकच जोड. पिऱ्यानें धान्य घेऊन एक जोड रामाला दिला अशी कल्पना केली तरी, बाकीचे जोड खपवून कोष्टयाजवळून कापड, लोहाराकडून कुऱ्हाड, शिंप्याकडून कुडतें वगैरे जिन्नस मिळविण्यासाठीं पिऱ्याला पुनः हिंडलें पाहिजे. या सर्व लोकांना वहाणांचीच गरज असली तर बरें, नाहीं तर आली पंचाईत ! पिऱ्याच्या सुदैवानें वहाणांची गरज असलेला एक कोष्टी मिळाला अशी कल्पना करूं. पण त्याला जर वहाणांच्या एकाच जोडाची गरज असेल, व एका जोडाबद्दल तो जितकें कापड देण्यास तयार आहे तितकें पिऱ्याच्या कपड्यांना पुरण्यासारखें नसेल तर पुनः अडचण आलीच ! आतां याला पुरेसें कापड देण्याइतके वाहाणांचे जोड घेणारा कोष्टी कसा मिळावा ?

वस्तुस्थिति अशी असते कीं, एका शेतकऱ्याजवळचें धान्य किंवा एका चांभाराजवळच्या वहाणा अगर जोडे खपण्याला निदान पांच पंचवीस कुटुंबें पाहिजेत. तीं सर्व एकत्र कशीं गोळा व्हावीं, व त्यांपैकीं कोणाला काय पाहिजे व किती पाहिजे, याचा अंदाज एकमेकांना कसा लागावा ? बरें, अशी अदलाबदल करणाऱ्या लोकांत कदाचित् कित्येक मैलांचें अंतर असेल. इतक्या अंतरावर जाण्यायेण्याची दगदग करणें अगोदर त्रासाचें आहे. त्यांतून धान्यासारखा अवजड पदार्थ बरोबर घेऊन,

जरूर असलेले सर्व पदार्थ मिळविण्याकरितां एखादा मनुष्य निघाला, तर त्याचे जे हाल होतील त्यांची केवळ कल्पनाच केली पाहिजे.

पण अदलाबदलीची अडचण एवढ्यानेंच संपत नाहीं. आपण असें समजूं कीं, एखाद्या धट्ट्याकट्ट्या पण मंदबुद्धि माणसास अन्नवस्त्र पाहिजे आहे; व त्याजपाशीं मोबदला देण्यास अंगमेहनतीखेरीज दुसरें कांहीं नाहीं. आतां अशा माणसानें जर एखाद्या शेतकऱ्याकडे जाऊन म्हटलें कीं, "मजकडून कांहीं तरी काम करून घेऊन मला धान्य दे;" तर तो शेतकरी कदाचित् म्हणेल कीं, "तूर्त मला तुझ्या मेहनतीची मुळींच गरज नाहीं; पेरणीच्या हंगामांत पाहीन." अशा वेळीं त्या बिचाऱ्या कामकऱ्यानें काय करावें बरें ?

बुद्धिमत्तेवर अवलंबून असलेल्या कामाकडे लक्ष दिलें म्हणजे ही अडचण जास्तच तीव्र भासते. एका वैद्याला धान्याची गरज आहे असें समजूं. तो जर एका शेतकऱ्याकडे गेला व म्हणूं लागला कीं "मला धान्य दे; मी तुझ्या येथील कोणचाही आजार बरा करीन." शेतकरी कदाचित् म्हणेल "वैद्यबुवा, तूर्त सुदैवानें माझ्या घरीं कोणी आजारी नाहीं; व म्हणून आपल्या मदतीची मला कांहीं गरज नाहीं. जरूर लागेल तेव्हां बोलावीन." अशा स्थितींत काय वैद्यबुवांनीं उपाशीं मरावें ? बरें चांभाराचा एक मुलगा तापानें पडला, म्हणून तो वैद्यबुवांकडे आला व त्यानें वैद्यबुवांस पाहिजे तितके जोडे फीऐवजीं देण्याचें आश्वासन दिलें. पण वैद्यबुवा म्हणतील माझे जोडे अद्यापि चांगले धड आहेत. मी जोड्यांची फी घेणार नाहीं !"

साध्या अदलाबदलीच्या मार्गांत किती अडचणी येऊं शकतात हें वरील उदाहरणांवरून लक्षांत आलेंच असेल. आतां यांतून सुटण्याचा कांहीं मार्ग निघतो कीं नाहीं हें पाहूं.

---

## धडा ११

# व्यापार व अदलाबदल

## भाग २ रा

साध्या अदलाबदलीनें फार अडचणी उत्पन्न होतात, हें जेव्हां लोकांच्या लक्षांत येऊं लागलें, तेव्हां त्यांनीं एक युक्ति काढली. ती युक्ति ही कीं, मोबदला या नात्यानें जिचा सर्व लोक स्वीकार करतील अशी एकच वस्तु अदलाबदलीच्या कामीं उपयोगांत आणणें. अशा वस्तूला व्यवहारांत आपण **पैसा** म्हणतों. आपण आजकाल पैशाच्या मध्यस्तीनें सर्व प्रकारच्या वस्तूंचा विनिमय करतों. आपणास धान्य पाहिजे असेल, तर ज्याचेजवळ धान्य असेल त्याला आपण अमुक इतक्या धान्याला अमुक इतके पैसे या भावानें पैसे देतों; दुसरे जिन्नस देत बसत नाहीं. बरें, एका शेतकऱ्याला जोडा हवा आहे. तर धान्य विकून जे पैसे आले, त्यांपैकीं कांहीं देऊन चांभाराजवळून तो जोडे घेतो; चांभाराला धान्याची जरुरी आहे कीं नाहीं याची चौकशी करण्याचें त्याला आतां कारण नाहीं. त्या चांभाराला कपडे पाहिजे असले तर तो पैसे देऊन कापड आणतो, व शिंप्याला पैसेच देऊन कपडे शिवून घेतो. याप्रमाणें सर्वांना उपयोगी पडणारी अशी एकच वस्तु विनिमयाच्या कामीं उपयोगी पडूं लागली म्हणजे सर्वांचीच सोय होते. अंगमेहनत करणाऱ्या मजुराला आतां शेतकऱ्याच्याच घरीं राबावयाला नको. एखाद्या श्रीमंत मनुष्याच्या घरचें काम करून, पैशाच्या रूपानें वेतन मिळविलें म्हणजे झालें; मग पैसे देऊन अन्न व वस्त्र सहज मिळवितां येतात. वैद्यबुवांनीं धान्य मिळविण्याकरितां शेतकऱ्याच्याच मुलाची तबेत बिघडण्याची अपेक्षा करावयास नको. चांभाराच्या मुलाची तबेत बिघडली तरी त्यांचें काम भागेल. फीचे पैसे देऊन त्यांना वाटेल तो पदार्थ मिळवितां येईल.

असें **विनिमयसामान्य** किंवा **पैसा** प्रचारांत आला म्हणजे त्याच्या मध्यस्तीनें जी देवघेव होते, तिला आपण **व्यापार** असें

म्हणतों. पैसा घेऊन एखादा पदार्थ देणें म्हणजे तो **विकणें,** व पैसा देऊन एखादा पदार्थ घेणें म्हणजे **विकत घेणें** अगर **खरेदी करणें** असे शब्द या बाबतींत उपयोगांत येतात.

या अर्थानें खरेदी विक्री करण्याचा प्रसंग बहुतेक सर्वांना येतोच. पण श्रमविभाग जसजसा वाढत जाईल तसतसा समाजांत या खरेदी विक्रीच्या कामीं आपणास विशेष मदत करणारा एक स्वतंत्र वर्ग तयार होतो. या वर्गास आपण "व्यापारी वर्ग" असें म्हणतों. उदाहरणार्थ आपण बाजारांत गेलों म्हणजे धान्य विकत घेतों तें धान्य उत्पन्न करणाऱ्या शेतकऱ्याजवळूनच घेतों असें नाहीं. तर तें धान्याच्या व्यापाऱ्याकडून घेतों. हे व्यापारी शेतकरी लोकांना पैसा देऊन त्यांजपासून धान्य खरेदी करितात. व मग ज्याला तें पाहिजे असेल त्याला, थोडी अधिक किंमत घेऊन, विकतात. असेंच इतर सर्व वस्तूंबद्दल समजावयाचें. खरेदीच्या किंमतीपेक्षां जर विक्रींची किंमत अधिक असेल तर त्या दोहोंमधील अंतरास **नफा** म्हणतात. हा नफा अर्थातच व्यापाऱ्यानें आपणास जे जिन्नस पाहिजे असतील ते पुरविण्यासाठीं जी मेहनत केली, व या व्यापारांत जें भांडवल घातलें त्याचा मोबदला होय. व्यापारी जर कुशल नसेल तर नफा न मिळतां त्याला **तोटा**च सोसावा लागेल. म्हणजे व्यापारांत घातलेल्या भांडवलाची वाढ न होतां उलट त्यांतील कांहीं हिस्सा बुडेल.

विनिमयसामान्य उपयोगांत येऊन व्यापार सुरू झाला म्हणजे अदलाबदल एखाद्या लहानशा खेडया अगर प्रांतापुरतीच न होतां ती चोहोंकडे फैलावते. आजकाल आपल्या बाजारांत रंगूनचे तांदूळ, जावा बेटांतले मसाले, अफगाणिस्तानचा मेवा, जपानांतील काडयाच्या पेट्या, व अमेरिकेंतील राकेल तेल वगैरे अत्यंत दूरचे पदार्थही मिळूं शकतात. बरें, उलट आमच्या येथील कापूस, धान्य, अफू वगैरे माल

परदेशांस जातो. पण आमचे व्यापारी कांहीं म्यांचेस्टरचे कापडा-ऐवजीं इकडलें धान्य देत नाहींत, तर पैसा देतात; व कापसाऐवजींही ते पैसा घेतात.

पदार्थास किंमत कशानें पडते हें आपण पूर्वीं पाहिलेंच आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे वस्तु दुर्मिळ असून तिची गरज लोकांस फार असली म्हणजे तिला किंमत येते. अर्थात् व्यापाऱ्यांचें लक्ष नेहमीं इकडे असतें कीं, कोणत्या स्थलीं व कालीं कोणत्या वस्तूला किंमत भरपूर येईल. रंगूनकडे तांदूळ इतका पिकतो कीं तेथें त्याला कोणी विचारीत नाहीं. पण तोच आपल्या इकडील बाजारांत आणला, तर त्याला चांगला दर मिळतो. मिठाला कोंकणांत कोण विचारणार ? त्यास देशावर न्यावें तेव्हां किंमत चढते. गव्हाला पंजाबांत जितका भाव मिळतो त्यापेक्षां विलायतेंत किती तरी अधिक मिळतो. तेंच लोखंड, दगडी कोळसा वगैरे पदार्थांना इंग्लंडपेक्षां आपल्या देशांत जास्त दर येतो. इंग्लंडमध्यें कोळसे व लोखंड नेणाराची फजीती होईल; त्याचप्रमाणें नागपूर, वऱ्हाड प्रांतांत जर कोणी बाहेरून कापूस विकण्यास आणला तर त्याची तशीच स्थिति होईल. या सर्व गोष्टींचा विचार करून सवंग मिळेल तेथें माल खरेदी करावयाचा व महाग असेल तेथें विकावयाचा, असें धोरण व्यापारी लोकांस ठेवावें लागतें. त्यायोगानें त्यांचा स्वतःचा तर फायदा होतोच, पण ज्यांना जे पदार्थ पाहिजेत ते मिळून सर्वांचाच फायदा होतो.

---

## धडा १२

## कर्णाचे दांत कर्णाच्याच घशांत !

( भारतीय युद्धांत कर्ण व अर्जुन यांचें युद्ध चालू असतां शेवटीं कर्णाच्या रथाचें चाक जमिनींत रुतलें. रथाखालीं उतरून तें चाक काढण्याच्या नादांत कर्ण गुंतला असतां श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून अर्जुनानें कर्णावर बाण सोड-

ण्यास सुरुवात केली. "मी निःशस्त्र असून रथाचें चाक काढीत असतां मजवर प्रहार करणें हें योग्य नाहीं; हा अधर्म होय," असें कर्ण रागानें म्हणाला. त्यावेळीं त्याला कृष्णानें जें खोंचदार उत्तर दिलें तें खालील आर्यांत वर्णिलें आहे.)

कृष्ण म्हणे, "राधेया ! भला बरा स्मरसि आजि धर्मातें, ।
नीच व्यसनीं बुडतां निंदिति देवासि, न स्व-कर्मातें ॥ १ ॥
जेव्हां तूं, दुर्योधन, दुःशासन, शकुनि एकमति झालां; ।
कैसे कपटद्यूतीं चित्तींहि न धर्म लंघितां भ्यालां ? ॥ २ ॥
जेव्हां सभेसि नेली पांचाळी, मानिलें मनीं शर्म ।
तेव्हां गेला होता कोठें राधासुता ! तुझा धर्म ? ॥ ३ ॥
राज्य न देसी करवुनि वनवासाज्ञातवासही, जेव्हां ।
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना ! तेव्हां ? ॥ ४ ॥
केले दग्ध जतुगृहीं त्वां पांडव वारणावतीं जेव्हां ।
गेला होता कोठें धर्म तुझा सूतनंदना ! तेव्हां ? ॥ ५ ॥
चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले नृपें; असें खोटें ।
कर्म करवितां, कर्णा ! होता तव धर्म तेधवां कोठें ? ॥ ६ ॥
फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग, ।
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा ! सांग. ॥ ७ ॥
खर दुर्वाक्यशरशतें भेदित होतासि जेधवां मर्म ।
तेव्हां गेला होता कोठें राधासुता ! तुझा धर्म ? ॥ ८ ॥
अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म, ।
तेव्हां गेला होता कोठें राधासुता, तुझा धर्म ? ॥ ९ ॥
पूर्वीं धर्म न रुचला, त्यजिला निपटूनि तो जसा कुचला ।
आतांचि बरा सुचला ! धर्मगृहा, सर्व व्हा परासु, चला ॥ १० ॥
नळ होय धर्मराजा, कलहोत्सुक पुष्करहि तुम्ही सर्व; ।
बळ होतें सत्याचें, खळ हो तुमचा न चालिला गर्व. ॥ ११ ॥

मागेंचि तुम्ही भजतां धर्माला तरि तुम्हांसि वांचविता; ।
आतां मरा; न वांचे दीपगृहीं जो न तोय सांचविता. ॥ १२॥
मागेंचि धर्म करितां, जरि देतां राज्य, धर्म वांचविता ।
न जगे तो दुर्भिक्ष्यव्यसनापूर्वीं न धान्य सांचविता. ॥ १३ ॥
आतां रक्षील कसा धर्म ? तुम्हीं वित्तमद्यमत्तांनीं, ।
जो लोटिला दहादां स्वहितहि मानूनि अहित, लत्तांनीं. ॥१४॥
रक्षावा धर्म असा करिसी उपदेश, तरि असे मान्य ।
रक्षितसों **धर्मातें**, आम्हांला धर्म ठाऊका नान्य ॥ १५ ॥
हा **धर्म** मूर्तधर्म प्रभु, यातें भजतसों; असा मान्य ।
लोकांत कोण दुसरा ? सामान्य नव्हेचि हा असामान्य"॥१६॥
आश्रितजनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें, ।
निश्वास वृषें लज्जावनतमुखें सोडिला, जसा नागें. ॥ १७ ॥

---

## धडा १३

# कर्तव्यनिष्ठा

हिंदुस्थानापासून फार दूर, इंग्लंड देशाच्या पूर्वेस **उत्तरसमुद्र** नांवाचा एक महासागराचा भाग आहे. या समुद्रांत वरचेवर वादळें सुटून प्रचंड लाटांनीं तो खवळून जातो.

खालीं दिलेली गोष्ट या समुद्रांतील एका बेटावर घडून आली. हें बेट म्हणजे अफाट समुद्राच्या मध्यभागीं उभा असलेला खडकाचा एक लहानसा सुळकाच आहे; व यावर पाण्याच्या लाटा येऊन सारख्या आदळत असतात. अशा तऱ्हेच्या खडकांनीं समुद्रांत फिरणाऱ्या जहाजांना अपाय होऊं नये यासाठीं त्यांवर उंच व भक्कम खांब उभारून त्याच्यावर एक दीपगृह बांधीत असतात, व त्यांत यंत्राच्या साहाय्यानें फिरणारा एक दिवा ठेवतात. या दिव्याचा प्रकाश दूरवर पोंचत

असल्यामुळें खडक दूर असतांच त्याला टाळून जहाजांना सुरक्षितपणें जातां येतें.

वरील बेटांत अशाच तऱ्हेचें एक दीपगृह उभारलेलें आहे. भरतीच्या वेळीं या दीपगृहाखेरीज जमिनीचा एक लहानसा टिपका सुद्धां दिसत नाहीं, इतकें लहान हें बेट आहे. व समुद्र तुफानानें खवळून गेला म्हणजे तर हें बेट व इंग्लंडचा किनारा यामध्यें महिना महिनापर्यंत दळणवळण बंद पडतें. अर्थात् या दीपगृहाच्या माथ्यावर नियमितपणें फिरत राहणाऱ्या दिव्याचा खरा उपयोग अशाच वेळीं असतो. व समुद्रांत फिरणारे नाविक अशासमयीं या फिरत्या दिव्यास दुवा देत देत आपला मार्ग आक्रमितात.

जानेवारी महिन्यांत थंडी म्हणजे मी म्हणत असते. तशांत रात्रीचा वेळ, व हवा तर तुफान सुटलेली. अशा वेळीं एके दिवशीं वरील दीपगृहाचा रखवालदार **डेविड मॅनर्स** व त्याची बायको **मेरी** हीं दोघें दीपस्तंभाच्या पायथ्याशीं असलेल्या आपल्या छोटेखानीं घरांत आगटीपाशीं शेकत बसलीं होतीं. बाहेर वारा सूं सूं करीत होता, व समुद्राच्या प्रचंड लाटा त्या भक्कम खांबावर येऊन अशा जोरानें आदळत होत्या कीं, त्या योगानें उडणारे जलतुषार ज्या खिडकींतून तो तेजस्वी दीप प्रकाशत होता त्या खिडकीपर्यंत वर उडत असत. त्या काळ्याकुट्ट अंधारांत या दिव्याचे तेजस्वी किरण मात्र खवळलेल्या समुद्रांतील लाटांवर नाचतांना लांबवर दिसत होते.

या वेळीं **हॅंबर्ग**पासून **हल्ल**पर्यंत जाणारी एक खास आगबोट फार झपाट्यानें चालली होती. रात्रीची वेळ असल्याकारणानें या बोटींत दिव्याचा असा कांहीं लखलखाट केलेला होता कीं, लांबून पहाणारास त्या ठिकाणीं एखादा दीपोत्सवच आहे कीं काय असें वाटावें. बोटीच्या नाखव्यानें दूरून या दीपगृहांतील प्रकाश पाहून ताडलें कीं, आपण

या भयंकर खडकाजवळूनच जात आहों. व लगेच हा खडक टाळून जाण्यासाठीं जहाज कसें वळवावयाचें याविषयीं त्यानें सुकाण्यास हुकूम सोडला.

पण काय चमत्कार पहा, एकाएकीं दिवा दिसेनासा झाला! दिवा अशा बेतानें फिरत असे कीं, पंधरा सेकंदें प्रकाश व पंधरा सेकंदें अंधार असें आळीपाळीनें व्हावें. पण आतां दोन मिनिटें गेलीं, चार गेलीं, दहा गेलीं, तरी अंधार गडप!

डेविड् मॅनर्स व त्याची बायको सुखानें शेकोटीपाशीं गप्पागोष्टी सांगत होतीं. इतक्यांत मेरीची नजर त्या दिव्याच्या खिडकीकडे गेली. "अगबाई; दिवा फिरत नाहीं आहे!" ती एकदम ओरडली. "नाहीं?" डेविडनें विस्मयानें विचारलें.

"नाहीं!" असें उत्तर मिळतांच एका क्षणार्धांत डेविड् त्या दीप-स्तंभांतील वाटोळ्या जिन्यानें धांवतच वर गेला. मागोमाग त्याची बायकोही गेली. कारण आपल्यावर केवढी मोठी जबाबदारी होती हें त्यांच्या पक्कें लक्षांत होतें. दिवा जर फिरेनासा झाला, तर शेकडों लोकांचे प्राण जाण्याचा संभव होता!

एका मिनिटांतच तीं नवराबायको दिव्याच्या खोलींत पोंचलीं. पाहतात तों दिवा ठीक जळत होता. पण तो फिरत नव्हता. त्याची गति थांबली होती. त्या खोलींत अगदीं डोळे दिपून जाण्यासारखा लख्ख प्रकाश पडला होता. पण बाहेर काय? जिकडे तिकडे अंधार! अर्थात् जहा-जांना सावधगिरीची सूचना देण्याचें साधन आतां कांहींच राहिलें नव्हतें.

हा प्रकार पाहून डेविड् व मेरी गोंधळून जाऊन एकमेकांकडे पाहूं लागलीं. पण हें गोंधळणें एक क्षणभरच टिकलें. लगेच डेविड्नें त्या दिव्याच्या खालच्या बाजूस असलेला चोरदरवाजा उघडला, व ज्या ठिका-णीं त्या दिव्याला गति देणारीं यंत्रें होतीं, त्या तळघरांत प्रवेश केला.

मेरीनें एक कंदील वरून धरला, व त्याच्या उजेडानें तें यंत्र सुधारून फिरून चालू करण्याची खटपट डेविड्नें सुरू केली.

परंतु दुर्दैव ! दोनचार मिनिटें गेलीं असतील नसतील तों डेविड्नें दुःखाची एक किंकाळी फोडली. "काय? काय झालें?" म्हणून मेरीनें घाबरून विचारिलें. पण हे शब्द तिच्या तोंडून बाहेर पडण्यापूर्वीच तिच्या ध्यानांत खरा प्रकार आला. अशा फिरत्या यंत्रांत दांते असलेलीं कांहीं चक्रें असून तीं चक्रें फिरण्या करितां त्यांचे दांते एकमेकांत अडकविलेले असतात. अशा एकमेकांत अडकलेल्या दोन चाकांच्या मध्यें डेविड्चा हात चुकून सांपडला होता. मेरी घाईघाईनें कंदील घेऊन खालीं उतरली; व पाहते तों आपला नवरा बेशुद्ध झालेला असून त्याचा रक्तबंबाळ झालेला हात त्या चाकांत तसाच अडकलेला आहे ! त्याला त्यांतून सोडविण्याची तिनें फार जोरानें धडपड केली. पण व्यर्थ ! त्या यंत्राची मगरमिठी कांहीं सुटेना. अर्थात् वरील दिवा हा सर्वकाळपर्यंत स्तब्धच होता, व कदाचित् याच वेळीं एखादें मोठें जहाज याच दिशेनें येत असेल हा भयंकर विचारही तिच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं !

---

## धडा १४

# कर्तव्यनिष्ठा

### भाग २ रा

" डेविड्, डेविड्, अगबाई, मी आतां करूं तरी काय ? " ती आपल्या बेशुद्ध पतीकडे पाहून म्हणाली. क्षणभरानें डेविड्नें मोठ्या कष्टानें डोळे उघडले. त्या बिचाऱ्याला तेवढ्यानेंसुद्धां या वेळीं विलक्षण त्रास होत असावा असें दिसलें. मग तो हळूच म्हणाला,

" हें पहा ! तो—तो दिवा हातानेंच—फिरवीत राहाण्याखेरीज—आतां दुसरा इलाज नाहीं. जा; तो फिरव जा." इतकें बोलल्यानेंच त्याला थकवा आल्यामुळें तो फिरून निपचीत पडला.

"हें काय बाई, मी तुम्हाला येथें अशा स्थितींत कसें सोडूं ? मला प्रथम तुमची सुटका केली पाहिजे! " मेरी म्हणाली.

" छे ! छे ! तो दिवा, दिवा ! " डेविड् धापा टाकीतच म्हणाला. त्याला हे शब्द उच्चारतांना फारच श्रम पडत होते. " दिवा फिरता राहिलाच पाहिजे ! हंः ! उठ, व तो फिरव; हें—हें आमचें कर्तव्य आहे, तें केलेंच पाहिजे ! " तो फिरून म्हणाला.

याच क्षणीं त्या सोसाट्याच्या वादळांतून एका आगबोटीची शीट ऐकूं येऊं लागली. दिवा दिसेनासा झाल्यामुळें दिशाभूल होऊन कोणीकडून जावें हें समजेनासें झालें होतें, व म्हणून दिवा दाखविण्याविषयीं विनंतीदाखलच ही शीट वाजत होती.

बिचाऱ्या मेरीची स्थिति फार चमत्कारिक झाली होती. तिला मृत्यूच्या दाढेंत सांपडलेल्या आपल्या नवऱ्यासही सोडवेना; व त्या बोटींतल्या शेकडों लोकांचे प्राण या वेळीं आपल्या हातीं आहेत या गोष्टीकडेही दुर्लक्ष करितां येईना. एकीकडे प्रेम, व दुसरीकडे कर्तव्य या दोहोंमध्यें तिचें मन घुटमळत होतें.

ती शीट ऐकिल्या बरोबर डेविड्नें फिरून एकवार डोळे उघडले व दीनवाण्या मुद्रेनें आपल्या बायकोकडे पाहून "कर्तव्य ! कर्तव्य !" एवढेच शब्द कसेबसे उच्चारिले.

या दीन पण करारी भाषणानें मेरीच्या मनांतील घुटमळणें पार नाहींसें झालें. तिच्या मनांत जणू कांहीं एक नवीन प्रकाश पडला. तिचा निश्चय पक्का झाला. ती शिडीवरून दिव्याकडे धांवतच गेली, व त्या दिव्याचा खालील यंत्रसामग्रीशीं जो संबंध होता तो तिनें तोडून टाकला.

नाहीं तर दिवा फिरल्याबरोबर खालील चक्रेंही फिरावयाचीं, व बिचाऱ्या डेविड्चा चुराडा व्हावयाचा. मग तिनें तो दिवा हातांनीं फिरविण्यास सुरवात केली. तो अवाढव्य दिवा नुसत्या हातांनीं फिरविणें हें कांहीं हलकें काम नव्हतें. पण इलाज नव्हता. तसें करणें हें यावेळीं जरूर होतें व तिच्या नवऱ्यानेंही तिला तसें बजाविलें होतें !

प्रथम प्रथम हें काम तिला फार जड गेलें. पण दिव्याला एकदा गति मिळाल्यावर तो फिरविणें बरेंच सोपें जाऊं लागलें; व नंतर तर घड्याळाकडे पाहून तिनें तो दिवा अशा बेतानें फिरविण्यास सुरवात केली कीं, पूर्वीप्रमाणें पंधरा सेकंदें प्रकाश व पंधरा सेकंदें अंधकार, असें आळीपाळीनें होऊं लागलें.

अटलांटिक महासागरांत प्रवास करणारी एक प्रचंड आगबोट याच सुमारास या खडकाजवळून चालली होती. तिनें ह्या फिरत्या दिव्याकडे अगदीं वेळेवर पाहिलें म्हणून ठीक झालें. एक दोन मिनिटांची जरी चूक झाली असती तरी त्या बोटीचा चक्काचूर झाला असता. सुकाण्यानें वेळेवर सावधगिरी राखिली, व आणीबाणीचा प्रसंग टळला. परंतु बोटीच्या कप्तानाच्या लक्षांत एक गोष्ट मात्र आल्यावांचून राहिली नाहीं. ती ही कीं, दीपगृहांतील दिवा नेहमींपेक्षां जरा अनियमितपणें फिरत होता. त्या बिचाऱ्याला काय माहीत कीं, ज्या दिव्यानें त्याचे व इतर अनेक लोकांचे प्राण वांचविले होते, तो एका दुर्बल अबलेकडून मोठ्या कष्टानें फिरविला जात होता ?

सर्व रात्रभर तिनें हा उद्योग चालू ठेविला. मधून एखाद्या वेळीं ती खालीं डोकावून पतीस विचारी; "डेविड्, मी आतां खालीं येऊं का ?" परंतु डेविड्कडून एकच उत्तर येई, "इतक्यांत नको, मेरी, उजाडेपर्यंत तेथेंच रहा !" एकदां तर तिला खालीं जाण्याचा मोह आवरला नाहीं. आपली जागा सोडून ती खालीं धांवली, व नवऱ्यास म्हणाली; "कांहीं

मिनिटें तरी मला तुमच्याजवळ राहूं द्या; मी हत्यारें आणून तुमचा हात सोडविण्याचा प्रयत्न करतें."

"छे छे ! इतक्यांत नको; मेरी, माझी सुटका कदाचित् शेकडों लोकांचा प्राण घेईल ! माझ्या वेदना मी सहन करीत आहें; तुझ्यानें नाहीं का सहन करवणार ?"

"पाहातें; प्रयत्न करून पाहातें," मेरी म्हणाली. पण त्या प्रेमळ स्त्रीचे डोळे अश्रूंनीं भरून आले ! तथापि एका क्षणाचाही विलंब न लावतां ती आपल्या कामावर हजर झाली. आतां मात्र तिनें आपलें मन दगडासारखें घट्ट केलें होतें. आतां ती पूर्वींची कोमलहृदयी अबला नसून एक अत्यंत निधड्या छातीची वीरस्त्री बनली होती.

पहाट होऊन त्या खवळलेल्या समुद्राच्या लाटा थोडथोड्या प्रकाशमान होऊं लागल्या, तरी मेरीनें आपली जागा सोडली नाहीं. यानंतर अर्ध्या तासानें जेव्हां फटफटीत उजाडलें, तेव्हां मात्र डेविड्नें हांक मारून म्हटलें "मेरी, आतां तुला आपलें काम थांबविण्याला कांहीं हरकत नाहीं."

रात्रभर तो दांडगा दिवा फिरविल्यानें मेरी इतकी थकून गेली होती कीं, खालीं येणें, हत्यारें शोधून काढणें व त्यांचा उपयोग करून डेविड्चा हात सोडवणें, हीं कामें करण्याला सुद्धां तिच्यांत फारशी ताकत उरली नव्हती. तथापि तीं सर्व तिनें निमूटपणें केलीं; व एकदाचा डेविड्चा हात यंत्रांतून बाहेर निघाला. पण या श्रमाचा, व मानसिक यातनांचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. इतका वेळ या आणीबाणीच्या संकटानें तिला जणूं कांहीं उसनें अवसान आलें होतें. आतां मात्र आपल्या पतीचा तो छिन्नभिन्न झालेला हात पाहिल्याबरोबर तिला मूर्छा आली.

डेविड्नें लगेच तिला सावरून धरलें. आपल्या जखमी हाताचें दुःख-सुद्धां या वेळीं तो विसरला. त्यानें तिला हळूच नेऊन बिछान्यावर निजविलें. थोड्या वेळांत ती सावध झाली, व सावध झाल्यावर मात्र प्रथम तिनें आपल्या नवऱ्याची जखम बांधली.

आतां तुफानाचा जोरही कमी झाला होता. व हवा थंडगार पण स्वच्छ होऊं लागली होती. आपणास कोणीकडून तरी मदत मिळेल या आशेनें त्यांनीं संकटसूचक निशाण उभारलें. पण मदत येण्यास चार दिवस लागले! या अवधींत त्या कर्तव्यनिष्ठ माणसानें किती भयंकर यातना सोसल्या असतील याची वाचकांनींच कल्पना करावी.

डेविड्चा स्वभाव इतका भिडस्त होता कीं, या विलक्षण रात्रीची हकीकत तो स्वतः होऊन कधींच कोणाला सांगत नसे. व कधीं लोकांच्या आग्रहास्तव सांगण्याचा प्रसंग आलाच तर तो म्हणे, "अं:, यांत मी विशेष तें काय केलें? तसें करणें हें माझें कामच होतें. मला त्या वेळीं तें करतां आलें नाहीं, म्हणून माझ्या बायकोनें तें केलें इतकेंच!"

---

## धडा १५

## सुभाषितमाला

घोडे कधीं न खळती रविच्या रथाचे,
उल्लंघितो पवन भाग सदा नभाचे;
भूभार शेष धरि संतत मस्तकांहीं,
राजास विश्रम तसा क्षणमात्र नाहीं. १
एकीकडेस विधु अस्तगिरीस जातो,
एकीकडे रवि पहा उदयासि येतो;
तेजस्वियांसहि लयाभ्युदयादि होती,
लोकस्थिती अशिच, हें जणुं सूचवीती. २

तरुवर सुफलांच्या आगमीं नम्र होती,
जलदहि जलभारें खालती शीघ्र येती;
सुपुरुष विनयातें भाग्यकालीं धरीती,
उपकृति करित्यांची जाणिजे हेचि रीती. ३

गुरू विद्या प्राज्ञा जशि तशिच अज्ञाहि वितरी,
तयांची धी-शक्ती अधिक अथवा न्यून न करी;
तथापी दोघांच्या बहुताचि फलीं भेद दिसतो,
जसा बिंबग्राहीं शुचि मणि तसा लोष्ठ नसतो. ४

प्रसवति बहुकामां, घालवी दुर्दशेसी,
उपजवुनि सुकीर्ती दुष्कृतातें विनाशी;
सतत सदय माता मंगलाचीच मानूं,
सुकवि वदति वाचा सूनृता कामधेनू. ५

न तेजस्वी साहे प्रकट परतेजोबलमदा,
जयाचा जो आहे प्रकृतिगुण लोपे नच कदा;
मयूखांनीं जेव्हां प्रखरतर चंडांशु तपतो;
रविग्रावा तेव्हां अनलसम तेजास वमतो. ६

भोगूनि दुःखें सुख शोभतें जनीं;
घनान्धकारांत दिवा जसा वनीं;
सुखापुढें होय दरिद्रता नरा,
असोनि देही मृततुल्य तो खरा. ७

चिंतेचें घर हेंच वैर दुसरें लोकांत होतें सदा,
निंदा मित्रजनांत कारण निजद्वेषास हें सर्वदा;
जाया बुद्धि वनास देह सहसा, जाया सदा लाजवी,
शोकाग्नी हृदयस्थ हा परि तनू जाळी न संतापवी. ८

शाखा सद्गुण, पालवी विनय ही, विश्रंभ मूळें, दया
छाया, स्वाचरण प्रकांड, फुललीं चारित्रपुष्पें जया;
सत्कारोपकृती फळें, रस सुधातुल्या गिरा वाहती,
ऐशा सज्जनपादपावरि सुहृत्पक्षी सुखें राहती. ९

जनामधें जो धनहीन झाला,
असोनिही जीवित काय त्याला ?
कोपास ज्याच्या फळ येत नाहीं.
तैसें प्रसादासहि ये न कांहीं. १०

सत्पक्षरहित पक्षी, शुष्क तरू कीं तडाग जळहीन,
दंष्ट्राहीन भुजंगम, तैसा धनहीन होय नर दीन. ११

भीतासि अभय देता, आणि रसिक जो परोपकाराचा,
जरि होय नाश त्याचा लोकीं, तो गुणचि त्या उदाराचा. १२

धर्मसंग्रहिं सदा तुम्हि भागा, ध्यानदुंदुभिरवासह जागा;
इंद्रियें विषम चोरचि येती, धर्मवित्त चिरसंचित नेती ! १३

अशरणा शरणप्रद हे तरू, असुखिता सुखहेतु जसे गुरू;
नगर सोडुनि राहति हे वनीं, तरि खरे उपकारक या जनीं. १४

हातां विकास पहिल्या समयीं फुलातें,
येती जसे मधुप सार लुटावयातें;
दैवेंचि होय पुरुषास विपत्ति जेव्हां,
पाहूनि छिद्र बहु येति अनर्थ तेव्हां. १५

**परशुरामपंत तात्या गोडबोले**

---

धडा १६

## रामाचें वनगमन

**रामचंद्रा**चा विवाह होऊन बारा वर्षें लोटल्यावर एके दिवशीं **दशरथ** राजाच्या मनांत आलें कीं, आतां आपण वृद्ध झालों आहों; तेव्हां

रामचंद्रास युवराज नेमून त्याच्या अंगावर राज्याचा सर्व भार टाकावा. असा विचार करून दशरथ राजानें आपल्या राज्यांतील विद्वान् ब्राह्मण, मांडलिक, क्षत्रिय, व सन्मान्य लोक बोलावून आणले. सभा जमल्यावर तो म्हणाला " सभ्यहो, आपल्या सर्वांचें आजपर्यंत मीं रक्षण केलें आहे. आपलें हित साधण्याकरितां मेहनत करतां करतां मीं फार वृद्ध झालों आहें. तेव्हां आतां या जीर्ण झालेल्या शरीरास विश्रांति द्यावी, असें मला वाटतें. हा माझा पुत्र सद्गुणी, वीर्यवान् व इंद्रासारखा पराक्रमी असून युवराजपदास अगदीं योग्य आहे. माझ्या मनांतून उद्ईकच त्यास युवराज नेमावें असें आहे. तर आपली सर्वांची काय इच्छा आहे ?" हें भाषण ऐकतांच सर्व लोकांनीं अत्यंत उत्साहानें राजाचें अभिनंदन केलें, व त्याच्या विचारास संमति दिली. या प्रकारची लोकांची उत्कंठा व संमति पाहून दशरथास अत्यंत आनंद झाला; व त्यानें **वसिष्ठ** महामुनींना म्हटलें " गुरुवर्य, रामाच्या अभिषेकाच्या सामग्रीविषयीं आपण आतांच आज्ञा द्या, म्हणजे त्याप्रमाणें सर्व तयारी होईल. " तेव्हां वसिष्ठांनीं पांढरीं फुलें, लाह्या, मध, तूप, शुभ्र नवीन वस्त्रें, सर्व आयुधांनीं भरलेला रथ, चतुरंग सेना, शुभ्र छत्र व चामरें, अग्नीप्रमाणें चकाकणारे सोन्याचे शंभर कलश, वगैरे सर्व अभिषेकसामग्री तयार ठेवण्याविषयीं सचिवांस आज्ञा केली. त्याचप्रमाणें सर्व नगर चंदनयुक्त माळांनीं सुशोभित करून, सुगंधित सड्यांनीं रस्ते शिंपून, जिकडे तिकडे गुढ्यातोरणें उभारून शहर श्रृंगारण्याविषयींही त्यांनीं सांगितलें. नंतर रामचंद्रास सभेस बोलावून आणलें. रामचंद्राचें सिंहासारखें चालणें, त्याचें चंद्रासारखें मोहक वदन, व त्याची शांत व सुशील वृत्ति पाहून सभागृहांतील प्रजाजनांचें हृदय भरून आलें. त्याच्या वृद्ध पित्यास तर त्याच्याकडे पाहून तृप्तीच होईना. रामानें सिंहासनाजवळ जातांच पित्यास लवून नमस्कार केला; व नंतर तो विनयानें जवळ उभा राहिला. दश-

रथानें त्याला प्रेमानें म्हटलें, "बेटा रामचंद्रा, प्रजाजनांच्या संमतीनें मी उदईक तुला युवराजपदावर स्थापण्याचा बेत केला आहे. तूं सुज्ञ, सुशील व सुशिक्षित आहेस. तुला विशेष सांगण्याची गरज नाहीं. तथापि पुत्रप्रेमानें दोन अनुभवाचे शब्द तुला सांगितल्यावांचून राहवत नाहीं. प्रजाजनांचीं सुखदु:खें समजून घेऊन त्यांना पोटच्या पोरांप्रमाणें वागवीत जा. आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांना नेहमीं संतुष्ट व राजी ठेव, म्हणजे तुला व तुझ्या मित्रांना सुख होईल. आतां जा व उद्यां-पर्यंत सीतेसह व्रती व उपवासी रहा."

ही आनंदाची वार्ता **कौसल्या** राणीला कळली, तेव्हां तिला परमा-वधीचा आनंद झाला. तिनें ही सुवार्ता सांगणाऱ्या दूतांस कडींतोडे बक्षीस दिले ! मातांची भेट व आशीर्वाद घेऊन रामचंद्र आपल्या वाड्यांत आला.

इकडे अयोध्या नगरीची ही अपूर्व शोभा, मंगल वाद्यांचा ध्वनि, लोकांचा आनंदोत्सव, हीं सर्व **कैकेयी** राणीची माहेरची दासी **मंथरा** गच्चीवर उभी होती तिनें पाहिली, व तिला ही रामाच्या युवरा-जपदाच्या अभिषेकाची तयारी आहे असें जेव्हां कळलें, तेव्हां तिनें कपाळाला आंठ्या घालून म्हटलें, " तर मग हें मोठें भयच उत्पन्न झालें आहे! मला याचा बंदोबस्त आतांच केला पाहिजे." असें म्हणून ती कैकेयीजवळ गेली, व म्हणाली, "मूर्खे कैकेयी ! ऊठ, तूं अशी आनंदांत स्वस्थ काय बसली आहेस ? तुझ्यावर केवढें भयंकर संकट ओढवत आहे हें तुला कळलें नाहीं का? अग, तुझ्या निरंतर दु:खांचा पाया दशरथराजा उद्यां घालणार आहे; व रामचंद्राला यौव-राज्याचा अभिषेक करणार आहे. फार काय सांगू ? माझ्या अंगाला पायापासून डोक्यापर्यंत आग लागली आहे. तुझ्या हिताकरितां, तुझे डोळे उघडावे म्हणून मी धांवत आलें आहें." हें ऐकून कैकेयी म्हणाली,

"मग यांत दुःख करण्याचें कारण काय? जसा माझा **भरत**, तसाच राम मला आवडतो. त्याला महाराज युवराज करणार ही आनंदाची गोष्ट आहे!" हें ऐकून मंथरा कैकेयीस म्हणते, "वेडे कैकेयी, तूं अगदीं भोळी आहेस ग, भोळी! तुला राजकारण अगदींच समजत नाहीं. 'लाडके' 'प्रिये' हे गोड शब्द तेवढे तुझ्या वांट्याला, व अर्थाची बाब तेवढी कौसल्येच्या वांट्याला! तुझ्या भरताला मामाच्या घरीं पाठवून राजानें हा अभिषेकाचा बेत एकाएकीं केला, यांतलें कपट तुझ्या लक्षांत नाहीं आलें! सावध हो, व आपल्या पुत्राचें या भावी संकटापासून रक्षण कर; नाहीं तर उद्यां तुला कौसल्येपुढें हात जोडून दासीसारखें उभें राहावें लागेल." हें मायावी भाषण ऐकतांच कैकेयीची बुद्धि पालटली. ती म्हणाली "असें काय? पाहतें कसें करतात रामाला युवराज तें! रामाला वनाला धाडून भरताला राज्य देईन तरच नांवाची कैकेयी! पण मंथरे, याला काय युक्ति करावी बरें?" मंथरेनें थोडासा विचार करून म्हटलें "याची युक्ति मी सांगतें. तुला आठवत नाहीं कां, कीं मागें एकदा देवांना मदत करण्याकरितां शंबरासुराबरोबर दशरथ राजा लढण्यास गेला असतां तूं त्याचें सारथ्य केलें होतें; व त्या वेळीं प्रसन्न होऊन त्यानें तुला दोन वर दिले होते? ते वर तूं तेव्हां तसेच राहूं दिले होतेस. आतां ते मागण्याची वेळ आली आहे. एका वरानें रामाला चौदा वर्षें वनवासाला धाड, व दुसऱ्यानें भरताला यौवराज्य माग. एवढ्या अवधींत राम दक्षिणेंतून राक्षसांच्या तडाक्यांतून वांचून कसचा परत येतो! आणि आलाच तरी भरत राज्यावर स्थिर झाल्यावर तो त्याला काय दाद देणार आहे? तर ऊठ लवकर; महाराज येण्यापूर्वीं क्रोधागारांत जा, व केस मोकळे सोडून जमिनीवर लोळ. दशरथाच्या गोड भाषणास भुलूं नकोस, व आपलें म्हणणें सोडूं नकोस. लक्षांत ठेव." याप्रमाणें त्या दुष्ट दासीचा उपदेश मान्य करून सवती-

मत्सरानें ग्रस्त झालेली कैकेयी क्रोधागारांत गेली व तिनें गळ्यांतील मोत्यांचे हार फेंकून दिले व मलिन वस्त्र नेसून "हायरे देवा! किती अभागी मी!" असें ओरडत जमिनीवर लोळण्यास आरंभ केला!

---

## धडा १७

# रामाचें वनगमन

### भाग २ रा

नित्याप्रमाणें संध्याकाळच्या वेळीं अंतःपुरांत प्रवेश करून दशरथ राजा कैकेईच्या महालाकडे चालला. त्याच्या मनांत आज आनंदाचे विचार घोळत होते. पुढें कांहीं अरिष्टसूचक ग्रह येत असल्याचें ज्योतिष्यांकडून कळल्यामुळें रामास यौवराज्य देण्याचा बेत दशरथानें एकाएकीं केला होता; व भरत मातुलगृहाहून परत येण्याची वाट पाहाणें शक्य नव्हतें. परंतु या गोष्टीमुळें पुढें भयंकर अनर्थ ओढवेल, हें त्याच्या स्वप्नींही नव्हतें. कारण रामावर कैकेयीची निष्कपट भक्ति होती. असो; आपण कैकेयीस ही आनंदाची बातमी अचानक सांगूं असा विचार करीत, व अंतःपुरांतील बागेची शोभा पहात दशरथ जात होता. महालांत पोहोंचतांच पाहातो तों नित्याप्रमाणें त्याचें स्वागत करण्याकरितां कैकेयी पुढें आली नाहीं. यामुळें, व शय्येवरही ती नाहीं असें पाहून त्यास फार आश्चर्य वाटलें. इतक्यांत प्रतीहारीनें सांगितलें कीं, आज राणीसाहेब रागावून क्रोधागारांत गेल्या आहेत. राजास हें ऐकून फार आश्चर्य वाटलें, व नाउमेद होऊन त्यानें क्रोधागाराकडे पाऊल टाकलें; तों कैकेयी जमिनीवर उसासे टाकीत लोळत आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. हें पाहून त्या वृद्ध राजास फार वाईट वाटलें व त्यानें तिच्या तोंडावर हात फिरवून विचारिलें "कैकेयी, तुला राग कां आला आहे? माझा अपराध तर यत्किंचित् दिसत नाहीं. तुझा कोणी अप-

मान केला काय ? तुला कोणी बोललें काय ?" कैकेयी म्हणाली "मला कोणी बोललें नाहीं, किंवा माझा अपमानही कोणी केला नाहीं; परंतु मला जें पाहिजे तें देईन असें वचन द्या, म्हणजे मी आपली इच्छा सांगेन." दशरथाच्या पोटांत पाप मुळींच नव्हतें. यामुळें त्यानें ताबडतोब म्हटलें "कैकेयी, रामाशिवाय कोणीही मला तुझ्याहून अधिक प्रिय नाहीं; त्या रामाची शपथ घेऊन मी सांगतों कीं, तूं जें मागशील तें मी तुला देईन!" हे शब्द ऐकून कैकेयीस आनंद झाला, व तिनें म्हटलें " सत्यप्रतिज्ञ व धर्मिष्ठ दशरथ राजानें देतों म्हटलें आहे, त्या अर्थीं मी असें मागतें कीं, रामचंद्राच्या अभिषेकाची जी सामग्री तयार केली आहे तिनेंच माझ्या भरताला यौवराज्याचा अभिषेक करावा, व रामानें वल्कलें नेसून चौदा वर्षें दंडकारण्यांत वनवास भोगावा." हे भयंकर शब्द दशरथाच्या कानावर वीज कोसळावी तसे कोसळले; व तो धाडकन् मूर्च्छा येऊन पडला! क्षणाभरानें सावध झाल्यावर तो म्हणाला " दुष्टे, पापिणी, कुलविध्वंसिनी! रामानें तुझें असें काय पाप केलें आहे, म्हणून तूं त्याचा असा छळ मांडला आहेस ? तुझ्यावर तो सख्ख्या आईप्रमाणें प्रेम करीत असतां त्याचें वाईट करावयास तूं तयार झालीस, त्या अर्थीं तूं प्रत्यक्ष काळसर्पीण आहेस; म्यां मूर्खानें तुला आपल्या नाशाकरितां घरांत घेतलें आहे. सर्व जग रामाचे गुण गात आहे, त्या रामाला कोणतें नांव ठेवून मी वनवासाला धाडूं ? रामावांचून मी क्षणभरही जिवंत राहणार नाहीं. तर चांडाळणी, हा हट्ट सोड." अशी त्या वृद्ध राजानें कैकेयीची विनवणी केली, पण ती दुष्ट चांडाळीण आपला हट्ट सोडीना. तिनें शेवटचेंच एकदम सांगितलें, " मला एकदा वर देऊन पुनः नाकबूल करीत असाल, तर तुमचा धार्मिकपणा केवळ दांभिकपणा आहे असें मी समजेन; व जगांत वचनभंगाबद्दल तुमची निंदा होईल. वचनभंग करून रामाला राज्य द्यावयाचें असेल

तर खुशाल द्या; पण मी खचित सांगतें कीं तुमच्यासमोर विष पिऊन मी आपला प्राण देईन !" हे दारुण शब्द उच्चारून कैकेयीनें जें एकदां मौन धरिलें तें दशरथानें तिच्या शतशः विनवण्या केल्या तरी तिनें सोडिलें नाहीं. शोकावेगानें दशरथ वरचेवर बेशुद्ध होई, व सावध होतांच फिरून विनवणी करूं लागे. तो म्हणाला "रामाला यौवराज्य देण्याचें ठरवून वनवासाला पाठविलें तर लोक माझा कसा धिक्कार करतील हें मनांत आण. राम गेल्यावर मला मृत्यु आल्यावांचून राहणार नाहीं. मग विधवा होऊन तूं खुशाल पुत्रासहित राज्य कर. चांडाळणी, जरा विचार कर; माझें जीवित रामाविणें टिकणें अशक्य आहे. मी तुझ्या पायां पडतों. हा हेका सोड !" असें म्हणून तिनें पसरलेले पाय धरण्याच्या इराद्यानें राजा पुढें सरसावला. परंतु तिनें पाय मागें ओढल्यामुळें पाय हातीं न लागतां तो धरणीवर पडला !!

---

### धडा १८

## रामाचें वनगमन

### भाग ३ रा

संध्याकाळ होऊन, सूर्य अस्तास गेला, व चंद्राचें शुभ्र चांदणें चोहोंकडे पसरलें; पण कैकेयीच्या महालांत आनंद पसरला नाहीं. तो अधिकच भयाण दिसूं लागला. दशरथ राजा एकसारखा अश्रु गाळीत होता. मधून मधून तिची विनवणी करावी, मधून मधून निर्भत्सना करावी, असें रात्रभर चाललें; तरी तिनें आपला हट्ट रतीभरही सोडला नाहीं. शेवटीं रात्र संपली, पण दशरथाची कष्टावस्था संपली नाहीं. प्रातःकाळच्या सुमारास वसिष्ठ ऋषि घाई घाईनें स्नानादि कर्मे आटोपून निघाले; व राजवाड्यांत येऊन अभिषेकाची तयारी करूं लागले.

त्यांनीं सुमंत्रास आज्ञा केली कीं, " दशरथ राजास उठवा व स्नान घाला; पुष्य नक्षत्रावर चंद्रमा पोहोंचला आहे. मुहूर्ताची वेळ चुकूं देऊं नका." आज्ञा होतांच सुमंत्र कैकेयीच्या महालाकडे गेला, व त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें राजाच्या स्तुतिपर पद्यें गाऊन त्यास जागें करूं लागला. दशरथ राजाला हे स्तुतीचे शब्द सुरीसारखे बोंचले. तो म्हणाला, " सुमंत्रा, मी जागा आहें. तुझे शब्द मला भाल्यासारखे टोंचत आहेत. पुरे कर." राजाचे हे शब्द ऐकून, व त्याची खिन्न मुद्रा व रडण्यानें व जागरणानें लाल झालेले डोळे पाहून सुमंत्रास फार दुःख झालें, व त्याच्यानें कांहीं बोलवेना. तेव्हां ती निर्लज्ज कैकेयी म्हणाली,—" रामाला राज्याभिषेक होणार या हर्षानें राजास रात्रभर झोंप लागली नाहीं, म्हणून त्यास थकवा आला आहे. तर तूं आतांच जाऊन रामचंद्रास घेऊन ये." सुमंत्र म्हणाला "बाईसाहेब, महाराजांची आज्ञा झाल्याशिवाय मी कसा जाऊं?" तेव्हां दशरथ म्हणाला "जा, माझ्या रामाला घेऊन ये."

सुमंत्र लागलाच रामचंद्राकडे गेला. रामचंद्र स्नानादि कर्में आटोपून व उत्तम वस्त्रें परिधान करून आसनावर बसले होते. त्यांस सुमंत्रानें दशरथाचा निरोप कळविला. " मी आतांच जाऊन येतों " असें सीतेस सांगून राम घाईनेंच निघाला, व कैकेयीच्या महालाशीं पोहोंचला. तों सर्व शून्य दिसूं लागलें. एका आसनावर आपला दीन व म्लान झालेला पिता बसलेला आहे, व रागानें तोंड लाल झालेली, मलिन वस्त्र नेसलेली कैकेयी जमिनीवर बसलेली आहे, असें पाहतांच रामाचें तोंड सुकून गेलें. त्यानें नेहमींप्रमाणें प्रथम पित्यास व नंतर मातेस नमस्कार केला. "रामा—" इतकेंच दशरथानें म्हटलें. शोकाच्या वेगामुळें त्यास पुढें बोलवेना. ही राजाची भयंकर स्थिति पाहून रामाला भीति उत्पन्न झाली. त्यानें दीन वदनानें

कैकेयीस म्हटलें, " देवी कैकेयी, माझ्या पित्यास राग येईल असा माझ्या हातून तर कांहीं अपराध घडला नसेल ना ? तसें असेल तर तूं माझ्या वतीनें राजाजवळ रदबदली कर. कांहीं मानसिक चिंता तर राजाला लागली नाहीं ना ? माझा प्रिय बंधु भरत याजविषयीं तर कांहीं वाईट बातमी आली नाहींना ?" हें ऐकून ती निर्लज्ज स्त्री म्हणाली "रामा, तुझा राजाला राग मुळींच आला नाहीं; परंतु मनांतली गोष्ट भीतीनें तो बोलूं शकत नाहीं. म्हणून मी सांगतें. तूं ती गोष्ट अवश्य करशील यांत संशय नाहीं. हें पहा, राजानें पूर्वीं मला वर देऊन आतां तो त्याबद्दल पश्चात्ताप करीत आहे. **सर्व धर्माचें मूळ सत्य आहे.** हें सत्य तुझ्याकरितां राजा सोडणार नाहीं ही मला खात्री आहे. " हें ऐकतांच रामास फार दुःख झालें; व तो राजाच्या समक्ष कैकेयीस म्हणाला, " हे देवी, मी जर राजाची आज्ञा पाळणार नाहीं, तर मला धिक्कार असो ! राजाची आज्ञा असेल तर मीं अग्नींतही उडी टाकीन ! तर सांग राजाची काय आज्ञा आहे ती. **राम फक्त एक वेळच भाषण करीत असतो.**" हें निर्वाणीचें भाषण ऐकून कैकेयीनें रामाला दशरथ राजानें पूर्वीं दिलेल्या वरांची हकीकत सांगितली; व त्याप्रमाणें रामानें चौदा वर्षें वल्कलें नेसून वनवासास जावें, व भरतास राज्य मिळावें अशी आपली इच्छा प्रदर्शित केली. कैकेयीचें भयंकर भाषण ऐकून रामाला मुळींच दुःख झालें नाहीं. तो शांतपणें म्हणाला " एवढीच गोष्ट असेल तर कांहीं चिंता नाहीं. तूं म्हणतेस तसेंच असो. मी आनंदानें राजाची प्रतिज्ञा सिद्धीस नेतों, आणि आतांच वल्कलें नेसून वनास जातों. माझ्या राजानें, माझ्या गुरूनें, माझ्या पित्यानें, माझें आजपर्यंत कल्याण करणारानें, मला आज्ञा केली असतां मी ऐकणार नाहीं काय ? पण एक गोष्ट माझ्या मनाला खात आहे. राजानें स्वतः मला सांगितलें नाहीं कीं, भरताला राज्याभिषेक करितों म्हणून ! राजाची तशी

इच्छा असेल तर मी ती शिरसावंद्य करून लागलीच अमलांत आणीन." हे शब्द ऐकून कैकेयीस अत्यानंद झाला, व रामाला, वनवासास जाण्याची जलदी करण्याच्या हेतूनें ती दुष्ट स्त्री म्हणाली "रामा, लज्जेनें तुझा पिता कांहीं बोलूं शकत नाहीं; पण मी तुला सांगतें, जोंपर्यंत तूं अरण्यांत जाणार नाहींस तोंपर्यंत तुझा बाप स्नान करणार नाहीं, किंवा अन्न घेणार नाहीं!" हे शब्द ऐकतांच दशरथ राजा "धिक्कार! धिक्कार!" असें बोलून मोठ्यानें सुस्कारा टाकून एकदम मूर्च्छित पडला. त्याबरोबर रामानें पुढें धांवून राजाला धरून उठवून बसविलें. ज्याप्रमाणें एखाद्या उमद्या घोडयाला चाबकाचा फटका बसला म्हणजे तो जोरानें उसळतो, त्याप्रमाणें कैकेयीच्या भाषणानें राम उसळला, व म्हणाला "देवी कैकेयी, मला एखाद्या सामान्य माणसाप्रमाणें लोभी समजूं नकोस. मातापित्यांची शुश्रूषा करणें व त्यांचें वचन पाळणें ह्यापेक्षां माझा परम धर्म दुसरा कोणताच मी समजत नाहीं. कैकेयी, याकरितां राजाला तूं व्यर्थ भरीला घातलेंस. तूंच मला वनवासाची आज्ञा कां दिली नाहींस? असो; तुझी तशीच राजाची आज्ञा मला शिरसा-वंद्य आहे. मी आतांच मातोश्रींचा निरोप घेऊन, व सीतेची समजूत करून वनाला जातों. भरतानें राज्य करून पित्याची सेवा करावी. तूंही राजाचा सांभाळ कर." हे रामाचे शब्द ऐकून दशरथ मोठा स्वर काढून रडूं लागला!

शेवटीं या दुःखद प्रसंगांतून कसेंतरी बाहेर पडलेंच पाहिजे असा विचार करून रामचंद्रानें आपल्या निश्चेष्ट झालेल्या पित्याचे चरण वंदिले, व नंतर मातेचेही वंदिले, व तो बाहेर पडला. बाहेर जमलेल्या मंडळींचें कसेंबसें सांत्वन करून तो हळू हळू कौसल्येच्या महालाकडे गेला. ती मोठ्या हर्षानें मूल्यवान् पैठणी नेसून अग्नीची पूजा करीत होती. रामानें येऊन तिला वंदन केल्याबरोबर तिनें त्याला

पोटाशीं धरून मोठ्या प्रीतीनें म्हटलें, " बाळा, तूं मोठमोठ्या धर्मशील राजर्षींच्या पंक्तीस जाऊन बसशील." राम हळूच नम्रपणें म्हणाला, " देवी कौसल्ये, मजवर मोठें संकट आलेलें तुला माहीत नाहीं. आई, मी चौदा वर्षें वनवास भोगण्यास आजच जात आहें. महाराज दशरथ भरताला यौवराज्य देत आहेत." हे शब्द ऐकतांच, एखादी केळ कुऱ्हाडीच्या एका घावानें तुटून कोसळून पडावी, त्याप्रमाणें कौसल्या एकदम मूर्च्छा येऊन पडली. रामानें केलेल्या उपचारांनीं सावध झाल्या-नंतर ती म्हणाली, " रामा, वांझेला एकच दुःख असतें कीं मला मूल नाहीं. परंतु पुत्रवती स्त्रीला वारंवार दुःखें असतात. खरोखर माझें हृदय वज्राहून कठिण आहे. कारण ही बातमी ऐकून तें शतशः फुटून गेलें नाहीं." इत्यादि विलाप ऐकून राम म्हणाला " देवी, तूं कांहीं काळजी करूं नको; मी चौदा वर्षें वनवास भोगून खचित परत येईन व तुझें दर्शन घेईन." या भाषणानें शांत होऊन कौसल्या म्हणाली " रामा, तुझा निश्चय मी पालटूं शकत नाहीं; तूं निःशंक चित्तानें वनास जा. तुझें सदैव कल्याण असो. पण तूं परत येईपर्यंत मला झोंप लागणार नाहीं." रामानें मातेच्या चरणावर आपलें डोकें ठेवून व आशिर्वाद घेऊन तिचा निरोप घेतला.

---

## धडा १९

## रामाचें वनगमन

### भाग ४ था

इकडे आपल्यापुढें काय वाढून ठेविलें आहे, याची बिचाऱ्या सीता-देवीस कांहींच कल्पना नव्हती. भक्तिपूर्ण अंतःकरणानें देवांची पूजा करून ती रामाची वाटच पहात बसली होती. कौसल्येचा निरोप घेऊन राम परत आले, त्या वेळीं त्यांचा चेहरा चिंतेनें व्याकुळ झालेला

पाहून तिच्या पोटांत एकदम धस्स झालें. ती मोठ्या खिन्न स्वरानें म्हणाली "हें काय ? तुमच्याबरोबर अभिषेकाचा लवाजमा कां दिसत नाहीं ? तुमचें मुख इतकें म्लान कां झालें ? काय तें मला सांगा." रामानें उत्तर केलें "सीते, माझे परमपूज्य तात मला आज वनवासाला धाडीत आहेत, म्हणून वनवासास जाण्यापूर्वीं तुझा निरोप घेण्यासाठीं मी आलों आहें." असें म्हणून रामानें तिला सर्व कच्ची हकीकत सांगितली, व नंतर म्हणाला "सीते, तूं भरताच्या आज्ञेबाहेर कधींही वागूं नकोस; तूं येथेंच राहून माझ्या वृद्ध पित्याचें व दुःखित मातेचें सांत्वन करीत जा." हे शब्द ऐकून सीता म्हणाली, "महाराज, वीरांना, क्षत्रियांना न शोभणारे हे शब्द आपण कसे उच्चारतां ? **भार्या ही आपल्या पतीच्या सुखाची तशीच दुःखाची वांटेकरीण आहे;** म्हणून वनवासास जाण्याची मलाही आज्ञा झाली पाहिजे. स्त्रियांना पति हाच एक आधार आहे. पित्याच्या घरच्या आनंदापेक्षां जास्त अशा आनंदानें मी वनांत तुमच्या बरोबर राहीन; कशाचीही आठवण करणार नाहीं." तथापि वनवासाच्या दुःखांचा विचार करितां रामास तिला न्यावेंसें वाटेना. तिचें सांत्वन करून राम म्हणाले, " सीते, वनवासांतील दुःखांची तुला कल्पना नाहीं. अरण्यांत सिंह, व्याघ्र वगैरे हिंस्र पशूंचें फार मोठें भय असतें; नद्यांतून मोठमोठे नक्र असतात; किनाऱ्यावर ढोपर ढोपर चिखल असल्यामुळें दांडग्या हत्तींना सुद्धां नद्या ओलांडणें भयंकर असतें, मग माणसांची कथा काय ? कित्येक वेळ कोस कोसपर्यंत पाणी मिळत नाहीं. जमीन आपल्या हातांनीं फोडून सारखी करून व कांटेकुटे बाजूला सारून, पानांच्या किंवा गवताच्या आंथरुणावर निजावें लागतें. काय मिळतील तीं कंदमुळें व फळें खाऊन भूक शांत करावी लागते. ऊन, वारा, थंडी, व पाऊस हीं सर्व सहन करावीं लागतात. तुझ्यासारख्या नाजूक स्त्रीच्या हातून

हें होणें कठिण आहे; म्हणून हे सीते, हा वनवासाचा हट्ट तूं सोड." पण सीतेनें आपला आग्रह सोडला नाहीं. सद्गदित कंठानें ती फिरून म्हणाली "रामा, तुमच्या सहवासाच्या आनंदापुढें तुम्ही आतां सांगितलेलीं सर्व दुःखें मला तुच्छ आहेत ! ज्याच्या हातावर पाणी घालून बापानें मुलगी दिली, त्याची ती झाली. मग तो सुखी असो, कीं दुःखी असो. अशी ही सर्वस्वी आपली झालेली पत्नी आपण कां बरें बरोबर नेत नाहीं ? जशी सत्यवानाबरोबर पूर्वीं सावित्री गेली तशीच मी तुमच्याबरोबर वनांत जाईन. मला तुमच्या सहवासांत स्वर्गसुख आहे; आणि तुमच्या वियोगांत नरकाचें दुःख आहे. " असें म्हणून शोकानें घाबरी होऊन तिनें रामाचे गळयास मिठी मारली. तेव्हां तिचा दृढ निश्चय पाहून रामानें म्हटलें " बरें तर, तूं तयार असशील तर चल मजबरोबर." याप्रमाणें आज्ञा मिळतांच त्या पतिव्रतेचा आनंद गगनांत मावेना. आपली सर्व संपत्ति सख्यांना व ब्राह्मणांना दान देऊन टाकून ती रामाबरोबर जाण्यास सिद्ध झाली. हें पाहून लक्ष्मणानेंही धांवून दोघांच्या पायावर लोटांगण घालून म्हटलें " रामा, मला घेतल्याशिवाय जाऊं नका." त्याचेंही पुष्कळ प्रकारें निवारण करण्याचा यत्न रामानें केला. पण अखेरीस संमति द्यावी लागली.

राम, लक्ष्मण, सीता सर्वस्व दान करून घराबाहेर पडलीं, तीं वनवासास जाण्यापूर्वीं दशरथाचा निरोप घेण्याकरितां राजवाड्याकडे चाललीं असतां रस्त्यांत हजारों लोक जमा झाले होते. पाऊल टाकण्यासही जागा नव्हती. त्यांची ही स्थिति पाहून प्रजाजनांनीं आक्रोश केला. रामानें दशरथाजवळ जाऊन म्हटलें "महाराज, मी आपला निरोप घेतों. लक्ष्मण व सीता यांनाही परवानगी असावी. आपण सर्व शोक सोडून आम्हांस आशीर्वाद द्यावा. " दशरथाच्या नेत्रांतून घळघळां अश्रु वाहात होते. मोठ्या कष्टानें तो हळूहळू म्हणाला " रामा, जा; सर्व प्रकारें

तुझें कल्याण असो." असें म्हणतां म्हणतां दशरथ पुनः मूर्छित झाला. कठोर कैकेयीखेरीज तेथें जमलेल्या सर्व स्त्रिया रडूं लागल्या. सर्व वाडा शोकानें भरून गेला.

वचनानें बद्ध झालेल्या दशरथाला कांहींच बोलतां येईना. शेवटीं त्यानें सुमंत्रास म्हटलें "चतुरंग सेना तयार करून रामचंद्रास पोंचवावयास जा." तेव्हां रामानें विनंति केली—"महाराज, मला वनांत मुनीसारखें रहावयाचें आहे. तेथें बरोबर सेना कशास पाहिजे? वनवासाला योग्य अशा वस्तु म्हणजे कुदळ, पावडीं व वल्कलें हीं होत. हीं असलीं म्हणजे पुरे आहे." हे शब्द ऐकतांच निर्लज्ज कैकेयीनें स्वतः वल्कलें आणून सर्वांसमक्ष रामापुढें ठेविलीं. रामानें आपलीं उंची वस्त्रें सोडून तीं वल्कलें धारण केलीं. लक्ष्मणानेंही तो तापसवेष धारण केला. परंतु गरीब बिचारी सीता! तिला नेहमीं शालूच नेसणें ठाऊक; तीं वल्कलें कशीं नेसावीं हें तिला समजेना! जशी एखादी हरिणी जाळें समोर पसरलेलें पाहून घाबरी होते, तशी ती घाबरून गेली. व वेडयासारखी पतीकडे पाहून म्हणाली, "काय करावें बाई, वनांतल्या मुनींच्या स्त्रिया वल्कलें कशीं नेसतात हें मला ठाऊक नाहीं!" असें म्हणून खालीं मान घालून ती रडूं लागली. परंतु इतक्यांत रामानें लागलींच पुढें होऊन तिच्या रेशमी वस्त्रावरच तिच्या गळ्याशीं त्या वल्कलास गांठ देऊन तें बांधिलें. त्या वेळीं सर्व स्त्रियांसच काय पण वसिष्ठ गुरूनांही फार वाईट वाटलें. ते कैकेयीस म्हणाले "पापिष्टे कैकयी, राजाला फसवूनही तुझी तृप्ति होत नाहीं, म्हणून आणखी तूं सीतेचाही छळ करतेस काय? जेथें राम सीतेसह जातील तेथें आम्हीं सर्व जाऊं; सर्व अयोध्या नगरी तेथें जाईल; मग तूं खुशाल या शून्य नगरीमध्यें राज्य कर. सीतेनें तुझें काय बरें अप्रिय केलें होतें? वेडे! या पतिव्रतेला उत्तम अलंकार देऊन हीं वल्कलें काढून घे." असें म्हणून

त्यांनीं सीतेजवळचीं वल्कलें काढून घेतलींही. दशरथानेंही फिरून कैकेयीचा जोरानें धिक्कार केला; व सुमंत्रास सांगून आपल्या सुनेस वनवासांत लागतील तितकीं वस्त्रें व अलंकार दिले. तेव्हां रामचंद्र, सीता, लक्ष्मण यांनीं दशरथाच्या पायांवर डोकीं ठेवून व त्यांस प्रदक्षिणा घालून त्याचा शेवटचा निरोप घेतला. अश्रुपूर्ण नेत्रांनीं दशरथ सुमंत्रास म्हणाला "सुमंत्रा, रथ तयार कर; व रामाला देशाच्या हद्दीपर्यंत पोंचीव. आम्हीं मातापितरें आमच्या वीर व साधु पुत्राला व्यर्थ हद्दपार करीत आहों; त्यांत गुणवंताचा एवढा तरी सत्कार होवो." त्याप्रमाणें रथ येतांच राम पित्यास फिरून नमस्कार करून बाहेर पडला.

रथ चालू होतांच हजारों लोक रथाला चारी बाजूंनीं बिलगले; जसा तान्हेलेला मनुष्य पाण्याकरितां धांवतो तशी रामाच्या दर्शनाकरितां सर्व अयोध्या नगरी धांवली. त्या गर्दींतून रथ चालविणें कठिण झालें. इतक्यांत दशरथ राजा " रामा, तुला एकवार पाहूं दे " असें म्हणत स्त्रियांसह अंत:पुरांतून बाहेर धांवत आला ! शेंकडों लोक रथाला झोंबताहेत हें पाहून तर त्याचें दुःख दुप्पट झालें. रथाच्या मागें आक्रोश झालेला ऐकून रामानें मागें पाहिलें, तों पित्याची ती करुणमूर्ति त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां आतां काय करावें, हें त्यास सुचेनासें झालें. शेवटीं सुमंत्रास " रथ हाक " असें त्यानें म्हटलें. पण " सुमंत्रा, थांब, " म्हणून लोक ओरडले. सुमंत्राला दोन्ही गोष्टी करणें अशक्य झालें. जशी एखादी गाय कोणी आपल्या वत्साला ओढून नेत असतां हंबरडा फोडीत मागें धांवते, त्याप्रमाणें कौसल्या "रामा, थांब," म्हणून मागें धांवली. रामाच्यानें आपल्यामागें पायीं येणाऱ्या आपल्या मातापितरांकडे पाहवेना व नाइलाज होऊन त्यांनीं "सुमंत्रा, जलदी रथ हांक " असें काकळुतीला येऊन सांगितलें; तेव्हां रथ चालू झाला !

रा. ब. चिं. वि. वैद्यकृत "**श्रीरामचरित्र**"
या पुस्तकाचे आधारें.

---

## धडा २०

# भीष्मार्जुन-युद्ध

प्रतिज्ञा जे केली यदुकुळवरें 'युद्ध न करीं,'
धरींना शस्त्रातें कदनसमयीं मी निज करीं;
"घडेना हें मिथ्या जरि, तरि न मी भागवत रे,"
प्रतिज्ञेतें भीष्में मनिं अवधिलें या दृढतरें. १

पिता शंतनू, माय ज्याची नदी जे
स्वयें शुद्ध ऐशास सन्मान दीजे;
असे गर्व तो ही हरावा मनाचा,
मनाचा असा भाव त्या वामनाचा. २

नृपा! ऐकिजे युद्ध देवव्रताचें,
गमे हेंचि साफल्य तूझ्या व्रतांचें;
रथीं देखिले कृष्णकौंतेय दोघे,
म्हणे भीष्म, 'माझ्या शरांतें यदो, घे!' ३

भीष्माकडे रव भयानक दुंदुभीचा
होतां वदे तनय आनकदुंदुभीचा;
"दुश्चिन्ह आजि गमतें मज, सव्यसाची!
जाती शिवा अशिव हे अपसव्य साची." ४

गर्वोक्ति फाल्गुन वदे, "जगदेकराया,
आहे असा कवण तो झगडा कराया?
म्यां काळखंज वधिले अतुलप्रतापी,
पौलोम ही असुर गोसुरविप्रतापी." ५

पितामह वदे तया, "प्रबळ तूं, पृथानंदना!
रमेश रथिं सारथी चतुर वागवी स्यंदना;

स्वयें गतवयस्क मी, सरस वीर तूं रे! नवा "
भिडें रणधुरंधरा! जय घडो सुखें वा न वा. ६
पारिक्षिता! मग शरासन पांडवानें
ओढूनियां हुतवहार्पितखांडवानें,
तो भीष्मदेह खचिला शरतांडवानें,
ज्याच्या क्रिये सकळ पद्मभवांड वाने. ७
गांगेय कोपा चढला कसा रे?। ज्या मानिती हाचि कृतांत सारे;
गर्जोनियां सिंहरवें जयातें। पाहे, जणों मारिल आज यातें! ८
" त्वां काय कर्म करिजे लघुलेंकरानें?"
बोलूनियां मग धनू धरिलें करानें.
तें व्यापिलें सकळ सैन्य महाशरांनीं
भीष्में, जसा पतित होय हुताश रानीं. ९
तो स्तोम येतां बहु सायकांचा
झालाचि पार्थ व्यवसाय काचा.
काचावला वीर, पुढें धसेना,
झाली नृपा! सर्व भयांध सेना. १०
पुष्पवर्ण नटला पळसाचा,
पार्थ सावध नसे पळ साचा.
पाहिलें जंव निदान तयाचें
तों दिसे वदन आनत याचें. ११
प्रतोद मग ठेविला, उतरला रथाधःस्थळीं,
म्हणे, "प्रबळ भीष्म हा, जय घडे न या दुर्बळीं"
करीं कमलनेत्र तो प्रथित चक्र तें स्वीकरी,
प्रमोद यम-नंदना बहु तसा यशस्वी करी! १२
असा येतां देखे रथ निकट तो श्यामल हरी,
नृपा! गांगेयाच्या हृदयिं भरल्या प्रेमलहरी.

शरातें, चापातें त्यजुनि वदला गद्गदरवें,
" जगन्नाथें केलें मज सकल लोकांत बरवें." १३

"ये रथावरि झणीं, यदुराया!
खड्ग देइन विकोश कराया;
तोडिं मस्तक, पडो चरणीं या,
धन्य होइन तदाच रणीं या. १४

" श्रीमाधवावांचुनि आन देवा
भजें, तरी हो! मज आण देवा,
तुझीच कीं वाहतसें हरी रे!
मिथ्या झडो हे तरि वैखरी रे! १५

" मारावें मजला असेंच असलें चित्तीं तुझ्या केशवा!
तैं मातें मग कोण रक्षिल पहा, विश्वेश नाकेश वा?
हा मुख्यार्थ जनार्दना! मज गमे, भक्तप्रतिज्ञा खरी
कीजे, सर्व जनांत होइल मृषा, हो आपुली वैखरी." १६

हें भीष्मवाक्य परिसोनि जगन्निवासें,
केलें विलोकन मृदु-स्मित पीतवासें;
वेगें फिरोनि चढला मग तो रथातें
पार्थाचिया पुरविणार मनोरथातें. १७

वामन पंडित

---

## धडा २१

# नाणें

मागें एका धड्यांत आपण पाहिलेंच आहे कीं, देवघेव व व्यापार हीं एखादें **विनिमयसामान्य** उपलब्ध असेल तेव्हांच सुलभ होतात. अशा विनिमयसामान्याला '**पैसा**' म्हणतात हेंही प्रसिद्धच आहे.

आपला प्रचारांतील पैसा सोनें, रुपें, तांबें, व निकेल या धातूंचा केलेला असतो हें तुम्हांस ठाऊक आहेच. यापैकीं तांब्याचें व निकेलचें नाणें केवळ बारीकसारीक देवघेव करण्याकरितां उपयोगांत येतें; त्याला **चिल्लर** किंवा **परचुटण** नाणें म्हणतात. मुख्य नाणें सोनें व रुपें या मूल्यवान् धातूंचेंच बनलेलें असतें.

यावरून असें मात्र समजतां कामा नये कीं, नाणें उच्चप्रतीच्या धातूंचें—निदान कसल्या तरी धातूंचेंच—असलें पाहिजे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, साधी अदलाबदल जाऊन एखादें विनिमयसामान्य उपयोगांत येऊं लागलें कीं, लागलाच त्या कामीं धातूंचा उपयोग होऊं लागत नाहीं. धातूंचा उपयोग नाण्याचे कामीं होऊं लागण्यास समाज बराच सुधारलेला असावा लागतो. अगदीं अडाणी समाजांत त्यांच्या परिस्थितीला योग्य अशा वस्तूच पैशादाखल वापरल्या जातात. उदाहरणार्थ रशियांतील कित्येक रानटी प्रदेशांत व अमेरिकेंतील इंडियन लोकांत जनावरांचीं कातडींच नाण्यासारखीं उपयोगांत आणलीं जात; व पुढें पुढें सबंध कातड्याच्या ऐवजीं नुसते कातड्याचे तुकडे वापरण्यांत येऊं लागले. चीन देशांत एका काळीं चहाच्या वड्या, कापडाचे तुकडे, व सुऱ्या हेच पदार्थ पैशाऐवजीं उपयोगांत होते. अर्थात् "एका घोड्याला पन्नास चहाच्या वड्या, अगर वीस सुऱ्या" अशी मौजेची व्यापारी भाषा तेथें एका काळीं प्रचारांत असली पाहिजे. अबिसीनिया देशांत मिठाचे खडे व शिंपा, अमेरिकेंतील व्हर्जिनिया प्रांतांत तंबाकू, व आइसलंड् व न्यू फाउंडलंड बेटांत वाळलेली मासोळी—हींच नाणीं प्रचारांत होतीं. स्काटलंड देशांत पुष्कळ दिवस लोखंडाचे खिळेच पैशाप्रमाणें देत घेत असत. हे सर्व चमत्कारिक प्रकार कसे चालू होते याचें आपणास गूढ वाटेल खरें; पण यांत एक सामान्य नियम दिसून येतो तो हा कीं ज्या वस्तूला तिच्या उपयोगामुळें एक विशेष प्रकारची किंमत चढते

तिचाच, प्रारंभीं तरी, नाण्याऐवजीं उपयोग होऊं लागतो. रशियासारख्या कडक थंडीच्या प्रदेशांत लोंकर असलेल्या जनावरांच्या कातड्यांना पांघरुणाच्या दृष्टीनें फार महत्व असतें; अर्थात् तो पदार्थ तेथें पैसा झाला. गुराखी वृत्तीनें राहणाऱ्या लोकांत गाई, म्हशी, घोडे वगैरे जनावरें हींच पैशाप्रमाणें दिलीं घेतलीं जातात. शेतकीवरच ज्यांची उपजीविका चालते अशा लोकांत बराच वेळ केवळ धान्याचीच नाण्याऐवजीं देवघेव चालते. धातूंचा उपयोग होऊं लागणें ही बरीच पुढची मजल होय.

विनिमयसामान्य या नात्यानें वरील सर्व पदार्थ जरी उपयोगांत येऊं शकले तरी त्यांत अनेक दोष आहेत, असें हळू हळू लोकांच्या नजरेस येऊं लागलें. आपल्या इकडे अद्यापही कित्येक ठिकाणीं कवड्यांचा उपयोग होतो. पण एक तर कवडी हा पदार्थ स्वभावतः अगदींच कमी किंमतीचा असल्यामुळें एखाद्या लहानशा पदार्थाची किंमत द्यावयाची झाली, तरीही एक ओझेंभर कवड्या द्याव्या लागतील. त्या सर्व मोजून देणें अगर घेणें, व त्यांची ने-आण करणें हें किती त्रासाचें होईल बरें ? शिवाय तो पदार्थ सहज फुटूनतुटून जाणारा आहे. शिंपा, कातड्याचे अगर कापडाचे तुकडे या सर्वांच्या बाबतींत हेच दोष कमजास्त प्रमाणांत दिसून येतील. तांबें, निकेल, ब्रांझ वगैरे धातू वरील पदार्थांपेक्षां नाण्यांच्या कामीं जास्त उपयोगी आहेत; पण सोनें व रुपें यांच्या मानानें त्या गौणच ठरतात. याचें कारण त्यांचा सवंगपणा होय. एका घोड्याची किंमत तांब्याच्या पैशांनीं द्यावयाची असें ह्मटलें तर त्या नाण्याची रास इतकी मोठी होईल कीं ती उचलणेंसुद्धां कठिण जाईल. पण तेंच सोन्याचीं नाणीं एका मुठींत मावतील. यावरून हें दिसून येईल कीं नाणीं करण्याचा पदार्थ स्वाभाविक रीत्याच मूल्यवान् असला पाहिजे; म्हणजे तो दुर्मिळ असून लोकांस त्याची फार जरूरी भासत

असली पाहिजे; शिवाय तो टिकाऊ पाहिजे, व त्याची ने-आण करणें सुलभ असलें पाहिजे. हे सर्व गुण सोनें व त्याच्या खालोखाल चांदी या दोन धातूंतच आढळतात. म्हणून हल्लीं या कामीं त्यांचाच उपयोग सर्वत्र होतो.

कांहीं लोक समजतात कीं सोन्याचांदीच्या किंवा तांब्याच्या नाण्यांना जी किंमत येते ती त्यांवर जो राजाचा शिक्का असतो त्यामुळें येते. पण वरील विवेचनावरून ही समजूत चुकीची आहे असें दिसून येईल. कारण जर तसें असतें, तर तांब्याच्या तुकड्यावर राजाचा छाप मारून त्यास रुपया अशी संज्ञा दिली तर तो रुपयाच्या बरोबर चालावा. पण तो तसा चालत नाहीं; म्हणजे रुपयाच्या किंमतीचा माल त्यास मिळत नाहीं. आतां असें होऊं शकेल कीं, एखादा विक्षिप्त राजा तांब्याच्या कांहीं विशेष तुकड्यास—समजा दुंढया पैशास—रुपया म्हणावें, असा कायदा करील. व लोक त्याला रुपया म्हणतीलही. पण उपयोग काय? अशानें त्याची किंमत थोडीच वाढणार आहे? एक रुपया किंमतीचा माल विकत घेण्यास असले बत्तीस रुपये मात्र द्यावे लागतील!

पैशाचा आणखी एक प्रकार आहे; त्यास "**नोटा**" म्हणतात. नोट म्हणजे वस्तुतः एक कागदाचा तुकडा. त्याला आंगची किंमत कांहींच नाहीं. मग त्याला बाजारांत किंमत कशी येते? रुपयाप्रमाणेंच राजाचा शिक्का त्यावर असतो म्हणूनच नव्हे काय?—अशी येथें शंका येईल. पण ती निरर्थक आहे. नोट हें मुळीं नाणें नव्हेच. तें एक **राजाचें वचन** आहे. "ही नोट घेऊन येईल त्या माणसाला सरकार अमुक इतके रुपये देण्याचें अभिवचन देतें." अशा अर्थाचे शब्द प्रत्येक नोटीवर लिहिलेले असतात. लोकांचा सरकारावर भरंवसा असतो म्हणूनच लोक हे कागदाचे चिटोरे पैशादाखल देतात घेतात. सरकाराच्या खजिन्यांत भरपूर सोन्यारुप्याचें नाणें आहे, व आपल्याजवळची नोट इतर कोणीं-

ही घेतली नाहीं तरी सरकार ती घेऊन आपणास रोख पैसा देईल अशी खातरी जर लोकांस नसती तर त्यांनीं या चिटोऱ्यांस कवडीही दिली नसती !

---

## धडा २२

## प्रख्यात ग्रीक वीर लिओनिडस

यूरोपखंडाच्या दक्षिणेस **ग्रीस** या नांवाचा एक फार लहान देश आहे. ग्रीस देश हें **भूमध्य समुद्रां**तील एक द्वीपकल्प आहे, व याच्या लगत अनेक लहान लहान बेटांचा बनलेला एक द्वीपसमूह आहे. हा छोटेखानी देश अत्यंत डोंगराळ आहे, व लहान लहान आखातांनीं व खाड्यांनीं त्याचा किनारा इतका वेडावांकडा झाला आहे कीं, ग्रीस देशाच्या कोणत्याही भागापासून समुद्र लांब पडत नाहीं. अर्थात् येथील लोक नाविक विद्येंत प्रवीण असून धाडशीपणाबद्दल पूर्वींपासून त्यांची प्रख्याति आहे.

सुमारें दोन अडीच हजार वर्षांपूर्वीं, ज्या वेळीं युरोपखंडांतील इतर सर्व राष्ट्रें अत्यंत रानटी व मागसलेल्या स्थितींत होतीं, त्या वेळीं ग्रीक लोकांनीं विद्या व कला यांची फार चांगली उन्नति केलेली होती, व त्या वेळीं हें चिमुकलें राष्ट्र आपल्या शौर्यानें, विद्येनें, व व्यापारी धाडसानें फारच प्रसिद्धीस आलें होतें. विशेषेंकरून **स्पार्टा** व **आथेन्स** या दोन संस्थानांचें नांव इतिहासांत अजरामर होऊन राहिलें आहे. यांपैकीं स्पार्टाची प्रसिद्धि शौर्य, काटकपणा व करारी स्वभाव यांबद्दल फार आहे; व आथेन्सची कीर्ति तेथील लोकांनीं विद्यांची व कलांची जी आश्चर्यकारक वृद्धि केली तिनें चिरस्थायी झालेली आहे.

ग्रीसच्या इतिहासांत एक काळ असा आला होता कीं या मूठभर लोकांच्या राष्ट्राला **इराण**सारख्या बलाढ्य व संपन्न राष्ट्राशीं टक्कर देणें

भाग पडलें होतें. त्या वेळचा इराणचा बादशाहा **डरायस** हा अत्यंत महत्वाकांक्षी होता. एका विस्तृत साम्राज्यानेंही त्याची तहान न भागल्यामुळें या डोंगराळ पण सुंदर देशालाही हस्तगत करण्याचा विचार त्यानें मनांत आणला. या मूठभर लोकांना आपण केव्हांच चिरडून टाकूं असें त्याला वाटलें होतें; पण अनुभव अगदीं उलट आला. कित्येक वर्षे लढाई चालून अखेर इराणच्या बादशाहास ग्रीस देश काबीज करण्याचा नाद सोडून द्यावा लागला. ह्या लढाईतील एका अत्यंत मनोरंजक व स्फूर्तिदायक प्रसंगाचें वर्णन करण्याचा आमचा विचार आहे.

ग्रीस देश अत्यंत डोंगराळ आहे असें वर म्हटलेंच आहे. पूर्वेकडील बाजूस समुद्रकिनाऱ्यालगतच डोंगराची एक ओळ आहे. व पूर्वेकडील किनाऱ्यानें ग्रीस देशांत ज्याला प्रवेश करावयाचा असेल, त्याला या डोंगरांतील एका अत्यंत अरुंद व अवघड घाटांतूनच यावें लागतें. या घाटाचें नांव "**थर्मापिलीचा घाट**" असें आहे. खालीं लिहिलेला प्रसंग याच ठिकाणीं घडून आला.

इ. स. पूर्वी ४८० या सालीं एका चिमुकल्या सैन्याचा तळ या ठिकाणीं पडला होता. त्या सैनिकांनीं आपल्या पिछाडीचा अरुंद रस्तासुद्धां बंद करण्याकरितां एक बळकट भिंत उभारली होती. तिच्यावर उभें राहिलें म्हणजे एकीकडून त्या घाटाखालचें मैदान व दुसरीकडून समुद्राचें निळें पाणी हीं त्यांच्या नजरेस पडत असत.

घाटाखालच्या मैदानांत एका प्रचंड सैन्यानें येऊन छावणी दिलेली होती. ही सेना अर्थात् इराणच्या प्रबल बादशाहाची होती; व तिला अडविण्याकरितां वरील छोटेखानी—अर्थात् ग्रीक लोकांची—फौज आलेली होती. या सैन्यांतील बहुतेक लोक स्पार्टा शहरांतून आले होते व त्यांचा राजा **लिओनिडस** हा त्यांचा सेनापति होता.

इराणच्या बादशाहाची फौज खरोखरच फार दांडगी होती. तींत खुद्द पारसी लोकांचाच भरणा होता असें नव्हे, तर इराणी साम्राज्याचा त्या

वेळीं ज्या ज्या देशांवर अंमल चाले, त्या त्या सर्व ठिकाणांहून सैन्य गोळा करण्यांत आलें होतें. याखेरीज एक बाराशें जहाजांचें जंगी आरमारही खास याच कामाकरितां सज्ज करण्यांत आलें होतें. खुद्द **झर्झीस** बादशाहा मात्र खुष्कीच्या मार्गानें सैन्य घेऊन आलेला होता.

ऐश्वर्यानें व सत्तेनें झर्झीस बादशाहाला अगदीं अस्मान ठेंगणें झाल्यासारखें झालें होतें. तो करील ती पूर्वदिशा असा प्रकार होत आल्यानें आपण काय वाटेल तें करूं शकूं अशी त्याची समजूत झाली होती, व त्याचा स्वभाव एकाद्या पोरासारखा हट्टी झाला होता. ग्रीस देशाला जाण्यापूर्वी त्याला एक लहानशी खाडी ओलांडून जाणें जरूर होतें. म्हणून त्यानें त्या खाडीवर एक होड्यांचा पूल बांधविला. परंतु अकस्मात् वादळ सुटून हा पूल मोडून गेला. तेव्हां या पोरकट बादशाहानें समुद्राला शिक्षा करण्याकरितां म्हणून त्यावरील लाटांना मारे चाबकानें झोडपून काढविलें!

शेवटीं, फिरून एकदा तसलाच पूल बांधला, व त्यावरून सर्व सैन्य पलीकडच्या तीरास गेलें, व अखेरीस वर सांगितलेल्या थर्मापिलीच्या घाटाजवळ आलें. तेथें त्यांना तोंड देण्यासाठीं लिओनिडस तयारच होता.

एवढेंसें छोटें सैन्य आपल्याशीं सामना देण्याची हिंमत करील ही कल्पनाच झर्झिसला खरी वाटेना. थोड्याच वेळांत तें परत निघून जाईल या समजुतीनें तो बरेच दिवस वाट पहात राहिला.

अशा अवाढव्य सैन्याशीं टक्कर देण्याचें काम कांहीं लहान सामान्य नाहीं, हें ग्रीक लोकांच्या ध्यानांत आलें. पण मारूं किंवा मरूं अशा करारानें बाहेर पडलेले हे स्पार्टन लोक त्या देखाव्यानें घाबरणार थोडेच होते. उलट जणुं कांहीं कसलाच कठिण प्रसंग आला नसल्याप्रमाणें त्यांनीं आपले रोजचे मर्दानी खेळ चालूच ठेवले होते. एकाद्या सणावारीं आपले लांबसडक व सुंदर केश ते विंचरून साफसूफ करीत असत, तसेच ते या प्रसंगींही करीत होते.

कांहीं दिवस वाट पाहून नंतर स्पार्टन लोक काय करीत आहेत हें पाहण्याकरितां इराणच्या बादशाहानें एक हेर पाठविला. त्यानें जेव्हां येऊन सांगितलें कीं स्पार्टाचे लोक आनंदानें हंसत खेळत आहेत, तेव्हां बादशाहानें आश्चर्यानें तोंडांत बोट घातलें. व कांहीं वेळ त्याला ही बातमी खरीच वाटेना.

मग त्यानें आपला एक वकील स्पार्टन लोकांकडे पाठविला, व "मुकाट्यानें शस्त्रें खालीं ठेवून शरण या, नाहींतर तुमची धडगत नाहीं" असा निरोप त्यांस कळविला. "छाती असेल तर आमचीं शस्त्रें आमच्या हातून काढून घ्या!" असा उलट निरोप लिओनिडसनें पाठविला.

"त्यांच्या बाणांचा वर्षाव असा जोराचा असतो कीं त्यानें सूर्य सुद्धा झांकून जातो"—एक ग्रीक हेर घाबऱ्या घाबऱ्या म्हणाला. "इतकेंचना! मग यांत गैर काय झालें? आम्हाला आयतें सावलींत लढतां येईल!"—एका स्पार्टन शिपायानें हंसत उत्तर दिलें.

अखेरीस या लोकांवर हल्ला करून त्यांचा फन्ना पाडलाच पाहिजे असें झर्झीसनें ठरविलें, व त्यानें तसें करण्याबद्दल आपल्या सैन्यास हुकूम सोडला. त्यानें आपणा स्वतःकरितां एक उंच सिंहासन तयार करविलें व त्यावर बसून आपल्या सैन्याची कर्तबगारी पाहण्यास त्यानें आरंभ केला. पर्शियन सेनेनें स्पार्टन लोकांवर खूब आवेशानें हल्ला केला व ग्रीक लोकांनींही त्यांना असा जोराचा सामना दिला कीं, थोड्याच वेळांत लढाई अगदीं हातघाईवर आली.

ग्रीक लोक संख्येनें जरी थोडे होते तरी आपल्या देशाच्या स्वातंत्र्याकरितां लढत होते, व यामुळें त्यांच्या अंगीं विलक्षण आवेश चढला होता. शिवाय ते लढत होते ती जागा इतकी अरुंद होती कीं, तेथें जास्त लोकांना उभेंच राहतां येत नव्हतें. यामुळें एका खेपेला थोड्याच पारसी

लोकांना पुढें येतां येई. शिवाय ग्रीक लोकांचे भाले अधिक लांब व वजनदार असल्यामुळें इराणी लोकांचा त्यांनीं सपासप फन्ना उडविण्यास सुरवात केली.

याचा परिणाम असा झाला कीं, एकामागून एक सारखे हल्ले करतांना पारसी वीर पटापट मरून पडूं लागले, तरी ग्रीक वीरांपैकीं एकाददुसराच मनुष्य दगावला असेल. असें युद्ध सर्व दिवस चाललें; पुनः दुसरे दिवशींही सारखी लढाई होत राहिली. पण काय? काळाच्या जबड्यांत सांपडल्याप्रमाणें जो पुढें येई तो कापून निघावा असा प्रकार होत राहिला. बादशाहानें आपल्या सिंहासनावरून जेव्हां ही हकीकत पाहिली, तेव्हां तो संतापानें नुसता वेडा होऊन गेला; व दुःखानें जळफळत तीन वेळां त्यानें सिंहासनावरून खालीं उडी घेतली!

अर्थात् आतां असा रंग दिसूं लागला कीं ग्रीक लोकांचा खात्रीनें जय होऊन पारसी लोकांस हिरमुसलें होऊन परत जावें लागणार. परंतु कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ होतो, त्याप्रमाणें अखेरीस ग्रीक लोकांतच एक बेशरम विश्वासघातकी फितुर निघाला, व त्यानें पैशाच्या लालचीनें इराणच्या बादशाहास अशी एक नवीन चोरवाट दाखवून दिली कीं, पारसी लोकांस ग्रीक लोकांना न कळत त्यांच्या पिछाडीस जातां येऊन त्यांची रसद मारतां यावी! त्याप्रमाणें पारसी सैन्य अंधेऱ्या रात्रीं एका नदीच्या कांठाकांठानें जंगलांतून रस्ता काढीत चाललें, व सकाळच्या सुमारास थर्मापिलीच्या घाटाच्या मागील बाजूस पोंहोंचलें. थोड्याच वेळांत घाटाचें रक्षण करण्यासाठीं उभे असलेल्या ग्रीक सैन्यावर हल्ला करण्याची त्यानें तयारी चालविली.

ही बातमी लिओनिडसपर्यंत पोंचली. अद्याप शत्रूचा हल्ला येण्यापूर्वीं सुरक्षितपणें मागें हटणें शक्य होतें. त्याप्रमाणें लिओनिडसनें खास आपल्या तुकडींतील लोकांखेरीज इतर सर्वांची रवानगी करून दिली.

स्वतः मात्र केवळ तीनशें लोकांनिशीं तेथेंच राहिला. हे तीनशें लोक म्हणजे अर्थात्च त्याच्या अत्यंत विश्वासांतले व जिवाला जीव देणारे गडी होते. व त्यांनीं आपल्या नायकाला सोडून मागें जाण्याचें साफ नाकारलें.

पूर्वीं एकदां असें भविष्य करण्यांत आलें होतें कीं "एक तर स्पार्टाचा राजा पडेल किंवा स्पार्टा पडेल." लिओनिडसला या प्रसंगीं या भविष्यवाणीचें स्मरण झालें. अर्थात्च या देशभक्त वीरानें स्वतःचा जीव देऊन स्पार्टाला वांचविण्याचा निश्चय केला. प्रत्येक स्पार्टन वीरानें या दिवशीं "मारीन अगर मरेन" अशी शपथ घेतली. अर्थात् मरण हें ठरल्यासारखेंच जरी होतें, तरी त्याला आनंदानें तोंड देण्यास ते तयार झाले.

आतां घाटांतच न राहतां खालीं मैदानांत उतरून शत्रूवर शेवटचा व निकराचा एकच हल्ला करण्याचा त्यांनीं निश्चय केला. त्याप्रमाणें सूर्योदय होऊन कांहीं वेळ झाल्यावर त्यांनीं खालीं उतरून शत्रूवर असा तडाक्याचा मारा केला कीं, एवढ्या मोठ्या सैन्यालासुद्धां मागें हटावें लागलें. त्यांची अशी दाणादाण उडाली कीं लोक एकमेकांच्या अंगावर कोसळून आपले लोक कोण व शत्रूचे कोण हें समजेनासें झालें; कित्येक आपल्याच घोडयाखालीं किंवा रथाखालीं चिरडून मेले, कित्येक मागें जातां जातां समुद्रांत बुडून मेले, व कित्येकांना दलदलीच्या पाणथळींत समाधि मिळाली !

तथापि हलके हलके स्पार्टाच्या वीरांची संख्या कमी होत होती. तीनशें लोक किती वेळ टिकूं शकणार ? शिवाय या निकराच्या हल्ल्यांत त्यांचीं हत्यारेंही मोडून बेकाम होत चाललीं होतीं. ग्रीक लोकांचें मुख्य शस्त्र म्हणजे भाला; पण अखेरीस सर्व भाले मोडून गेले. मग त्यांनीं तरवारीनें लढण्यास सुरवात केली. तरवारीही तुटून गेल्यावर त्यांनीं

नुसत्या कट्यारींवरच काम चालविलें; शेवटीं त्यांही मोडून गेल्यावर ते बहाद्दर केवळ हातांनीं लढत राहिले!

लढाईची घनचक्कर चालू असतांच लिओनिडस पडला! त्याच्या प्रेताच्या संरक्षणार्थ स्पार्टन लोकांनीं शर्तीची मारामारी केली, व शाबास असो त्या मर्दांची, त्यांनीं अखेरीस लढतां लढतां मोठ्या खुबीनें तें प्रेत त्या गर्दीतून लांबवून घाटामागच्या तटबंदीमागें सुरक्षित पोंचविलें !

पण आतां चोरवाटेनें त्या घाटाच्या मागल्या बाजूकडे आलेलें पारसी सैन्य या अवशिष्ट वीरांच्या मागें येऊन त्यांवर तुटून पडलें. अर्थात् दोहोंकडून मारा सुरू झाल्यानें थोड्याच वेळांत त्यांचा निकाल लागला. पण यांपैकीं एकही वीर दीन होऊन शरण गेला नाहीं. एकूण एक वीर लढतां लढतां धारातीर्थी पतन पावला.

याप्रमाणें या थर्मापिलीच्या युद्धाचा शेवट झाला. अर्थात् ग्रीस व इराण या देशांतील तंट्याचा या लढाईनें निकाल लागला नाहींच. पण ज्या देशांत असे कट्टे लढवय्ये होते त्यांत पारशांचा फार दिवस निभाव लागला नाहीं, व अखेरीस त्यांना लाजिरवाणें होऊन देश सोडावा लागला, यांत फारसें आश्चर्य नाहीं!

युद्धाचा समाधानकारक निकाल लागून पारसी लोकांची हकालपट्टी झाल्यावर, लिओनिडस व त्याचे शूर अनुयायी ज्या जागीं कामास आले त्या जागीं ग्रीक राष्ट्रानें कृतज्ञतापूर्वक एक स्मारक उभारलें. तें स्मारक म्हणजे एक संगमरवरी सिंहाचा पुतळा असून, त्याच्या चबुतऱ्यावर खालील स्फूर्तिदायक शब्द खोदलेले आहेत:—

**"हे प्रवासी लोकहो! तुम्ही जर या बाजूनें स्पार्टाकडे गेलां, तर स्पार्टन लोकांना आमचा असा निरोप सांगा कीं आपल्या देशाच्या कायद्याला अनुसरून या ठिकाणीं आम्ही आमचे देह ठेवले आहेत!"**

---

## धडा २३

# तुकाराम

### भक्ति व वैराग्य

( १ )

त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं। आमुचें त्या काई असे ओझें? ॥ १ ॥
पाषाणाचे पोटीं बैसला दर्दुर। तया मुखीं चारा कोण घाली? ॥ २ ॥
पक्षी, अजगर न करी संचित। तयासि अनंत प्रतिपाळी ॥ ३ ॥
**तुका** म्हणे तया भार घातलिया। उपेक्षिना दया-सिंधु माझा ॥ ४ ॥

( २ )

जन हें सुखाचें दिल्याघेतल्याचें। बा अंतकाळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥
झाल्या हीन शक्ती नाक डोळे गळती। सांडोनीयां पळती रांडा पोरें॥ २ ॥
बाईल म्हणे खर मरता तरी बरें। नासलें हें घर थुंकोनियां ॥ ३ ॥
**तुका** म्हणे माझीं न होत हीं कोणीं। तुज चक्रपाणी वांचूनिया॥ ४ ॥

( ३ )

तुजवीण वाणी आणिकाची थोरी। तरी माझी हरी जिव्हा झडो! ॥ १ ॥
नेत्र आणीकासी पाहती आवडी। जावोत तेचि घडी चांडाळ हे॥ २ ॥
कथा-मृत-पान न करिती श्रवण। काय प्रयोजन ह्यांचें मग? ॥ ३ ॥
हात पाय तुझे पथीं न चालतां। जावोत अनंता गळोनियां ॥ ४ ॥
**तुका** म्हणे तुज विसंबितां क्षण। वांचोनी कारण काय मग? ॥ ५ ॥

( ४ )

न मिळो खावया न वाढो संतान। परि हा नारायण कृपा करो ॥१॥
ऐशी माझी वाणी मज उपदेशी। आणीक लोकांसी हेंची सांगे ॥ २ ॥
विटंबो शरीर होत कां विपत्ति। परी राहो चित्तीं नारायण ॥ ३ ॥
**तुका** म्हणे नाशवंत हें सकळ। आठवी गोपाळ तेंची हीत ॥ ४ ॥

(५)

नलगे मायेसी बाळ निरवावें । आपुल्या स्वभावें ओढे त्यासी ॥ १ ॥
मज कां लागला करणें विचार । ज्याचा कारभार त्याचे माथां ॥ २ ॥
गोडधड त्यासी ठेवी न मागतां । समाधान खातां नेदी मना ॥ ३ ॥
खेळतां गुंतलें उमगूनी आणी । बैसोनीयां स्तनीं लावी बळें ॥ ४ ॥
त्याच्या दुःखें पीडे आपण, खापरीं । लाही तळीं वरी होय जैसी ॥ ५ ॥
**तुका** म्हणे देह विसरे आपुला । आघात ती त्याला लागों नेदी ॥ ६ ॥

(६)

कां रे नाठवीसी कृपाळू देवासी । पोसीतो जगासी एकलाची ॥ १ ॥
फुटे तरु-वर उष्ण-काळ-मासीं । जीवन तयासी कोण घाली ॥ २ ॥
बाळा दुग्ध कोणीं केलेंसे उत्पत्ती । वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥ ३ ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहें त्या अनंता आठवूनी ॥ ४ ॥
**तुका** म्हणे त्याचें नांव विश्वंभर । करा निरंतर ध्यान त्याचें ॥ ५ ॥

## स्फुट उपदेश

(१)

साधूनी बचनाग खाती तोळा तोळा। आणिकांतें डोळां न पाहवे ॥१॥
साधूनी भुजंग धरितील हातीं । आणिकें कांपती देखोनीयां ॥ २ ॥
**असाध्य तें साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥ ३ ॥**

(२)

लोहो परीसा रूसलें । सोनेंपणासी मूकलें ॥ १ ॥
येथें कोणाचें काय गेलें । ज्याचें तेणें अन-हित केलें ॥ २ ॥
गंगा आली आळशावरी । आळशी देखुनि पळे दुरी ॥ ३ ॥
गांवाखालील ओहळ । रागें गंगेसी न मिळे ॥ ४ ॥
**तुका** म्हणे होऊनी दास । गुरुसी न भजती शिष्य ॥ ५ ॥

( ३ )

मुंगियांच्या घरां कोण धाडी मूळ। देखूनियां गूळ धांव घेती ॥ १ ॥
दु:खें पीडियेला जाय वैद्यघरा। दु:ख-परिहारा आपुलीया ॥ २ ॥
**तुका** म्हणे कां रे न करां स्वहित। कारण हे प्रीत धरा नामीं ॥ ३ ॥

( ४ )

ढेंकणाचे संगें हिरा जो भंगला। कुसंगें नाडला साधू तैसा ॥ १ ॥
वोढाळाचे संगें सात्वीक नाडले। क्षण एक नासले समागमें ॥ २ ॥
**तुका** म्हणे धरा सत्संग हा बरा। चुकेल तो फेरा चौऱ्यांशीचा ॥

( ५ )

आंधळ्यासी जन सारेची आंधळे। आपणासी डोळे दृश्य नाहीं ॥ १ ॥
रोगीयासी विषतुल्य हें मिष्टान्न। तोंडासी कारण चवी नाहीं ॥ २ ॥
**तुका** म्हणे शुद्ध नाहीं जो आपण। तया त्रि-भुवन अवघें खोटें ॥ ३ ॥

( ६ )

नीचपण बरवें देवा। न चले कोणाचाही हेवा ॥ १ ॥
महापुरें झाडें जाती। तेथें लोहाळे राहती ॥ २ ॥
येती सिंधूच्या लहरी। नम्र होतां जाती वरी ॥ ३ ॥
**तुका** म्हणे हेंचि फळ। पाय धरिल्या न चले बळ ॥ ४ ॥

( ७ )

बैसोनी थिल्लरीं। बेडूक सागरा धिक्कारी ॥ १ ॥
नाहीं देखिला ना ठावा। तोंडपिटी करी हांवा ॥ २ ॥
फुगतें काउळें। म्हणे राजहंसा आगळें ॥ ३ ॥
गजाहुनी खर। म्हणे चांगला मी फार ॥ ४ ॥
मुलाम्याचें नाणें। **तुका** म्हणे नव्हे सोनें ॥ ५ ॥

—**तुकाराम**

## धडा २४

# टायटानिक बोटीची जलसमाधि

वाफेचा उपयोग नौकानयनाचे कामीं होऊं लागल्यापासून, व लोखंडी सामानाच्या मदतीनें प्रचंड जहाजें बांधण्यांत येऊं लागल्यापासून समुद्रावरचा प्रवास एकंदरीनें किती सुलभ व सुखाचा झाला आहे याची आपल्या इकडील लोकांस चांगलीशी कल्पना नसते. अलीकडील आगबोटी म्हणजे समुद्रावर तरणारे प्रचंड राजवाडेच होत असें म्हटलें तरी चालेल; कारण त्यांत अमुक प्रकारची सोय व सुखोपभोगाची सामग्री नसते असें म्हणतां येणार नाहीं. दोनदोन हजार माणसांना सुखानें राहतां येईल इतक्या या बोटी प्रचंड असतात. मोठेमोठीं भोजनालयें, नाचरंग करण्याचे प्रशस्त दिवाणखाने, क्रिकेट, टेनिस वगैरे खेळ खेळण्याच्या जागा, सुंदर बागबगीचे, स्नानगृहें व पोहण्याचे मोठमोठे हौद, व्यायामगृहें, वाचनालयें वगैरे एकाद्या मोठ्या व सुधारलेल्या शहरांत मिळणाऱ्या सर्व ऐषआरामाच्या सोई या बोटींवर तयार असतात. बरें इतक्या प्रचंड आकाराचे हे तरते किल्ले दर तासाला कमींत कमी अठरावीस मैलांच्या वेगानें प्रवास करूं शकतात. अर्थात् प्रवासाच्या इतक्या सोई असल्यावर उतारू लोकांची दिवसेंदिवस जास्तच गर्दी होत जावी, व कोणी व्यापारधंद्याकरितां, तर कोणी केवळ मौज पाहण्याकरितां दूरदूरचे प्रवास करण्यास उत्सुक व्हावें हें अगदीं साहजिक आहे.

पूर्वींच्या मानानें आतां समुद्रपर्यटनांत धोकेही फार कमी असतात. मोठ्या जंगी तुफानानेंही फारसा त्रास पोंचूं नये इतकीं मोठीं व जड अलीकडचीं जहाजें असतात. सर्व महासागराची आतां उत्कृष्ट पाहणी झालेली आहे; व खडक कोठें आहेत; समुद्र उथळ कोठें आहे; पाण्यांतील भोंवरे कोठें आहेत, हें सर्व दाखविणारे उत्कृष्ट नकाशे जहाजाच्या

कतानाजवळ असतात. खडकाळ प्रदेशावर उंच दीपगृहें बांधलीं असून त्यांत फार उज्ज्वल प्रकाशाचे यंत्राच्या साहाय्यानें फिरत राहणारे दिवे ठेवलेले असतात; त्यायोगानें रात्रीच्या वेळींही हे खडकाळ प्रदेश टाळून जाणें शक्य होतें. बोटींना भक्कमपणा आणण्याकरितां त्यांचा खालचा भाग दहा बारा इंच जाडीच्या लोखंडी पत्र्यांनीं मढविलेला असतो. याशिवाय अलीकडे अशी एक खबरदारी घेण्यांत येते कीं, बोटीच्या तळाची पोकळ जागा येथून तेथवर सारखी मोकळी न ठेवतां मध्यें जाड पत्र्याच्या भिंती घालून तींत अनेक खोल्या बनविलेल्या असतात. उद्देश हा कीं, एखादे वेळीं तळाला भोंक पडून पाणी आंत शिरूं लागलें तरी फार तर एखादीच खोली पाण्यानें भरावी, व सर्व बोटभर पाणी भरूं नये.

तथापि इतकी जय्यत तयारी असूनही कधीं कधीं फारच मोठे अपघात होतात. १९१२ सालीं एप्रिल महिन्याच्या १४ तारखेस असा एक भयंकर अपघात अटलांटिक महासागरांत होऊन "टायटानिक" या नांवाची फार दांडगी बोट बुडाली व सुमारें १६३५ लोक प्राणास मुकले ! या अपघाताची हकीकत अंगावर शहारे आणण्यासारखी भयंकर व हृदयद्रावक आहे; तरी तीपासून आमच्या बालवाचकांना बरीच नवीन माहिती व बोध मिळेल असें वाटल्यावरून संक्षेपरूपानें ती येथें दिली आहे.

इंग्लंडांत "व्हाइट स्टार लाईन" ही एक प्रमुख व श्रीमंत आगबोटीची कंपनी आहे. त्या कंपनीची सर्वांत मोठी व अत्यंत सुधारलेल्या पद्धतीवर बांधलेली टायटानिक नांवाची एक बोट होती. ती इतकी दांडगी होती कीं तींतून ४५००० टन वजनाचें सामान नेतां येत असे.

हिंदुस्थानच्या किनाऱ्यालगतच फिरणाऱ्या ज्या आगबोटी असतात, त्या सुमारें तीनशें टनाच्या असतात. ह्या प्रमाणानें पाहिलें तर आपल्या हिंदुस्थानच्या बोटींपेक्षां सुमारें दीडशें पटीनें टायटानिक बोट मोठी होती.

च इतकें असून तिचा वेग दर ताशीं २४ मैलांचा होता. विलायतेहून हिंदुस्थानास डांक आणणाऱ्या बोटी अदमासें १०००० टनांच्या असतात, तरी त्यांचा वेग ताशीं १६-१७ मैलांहून जास्त असत नाहीं.

या प्रकरणाच्या सुरवातीस आधुनिक बोटींवर संरक्षणाचीं व ऐषआरामाचीं जीं साधनें असतात म्हणून सांगितलें आहे, तीं सर्व या आगबोटीवर होतीं. बोटीची मजबुती इतकी दांडगी होती व तळाशीं असलेल्या खोल्यांची लोकांना इतकी खातरी वाटत होती कीं, तिला अपघात होईल अशी कल्पना स्वप्नांतसुद्धां कोणाला आली नसती. पण शेवटीं तसा प्रकार झालाच.

तारीख १० एप्रील रोजीं ही बोट लिव्हरपूल सोडून निघाली. तिच्यावर ३३४६ उतारूंची सोय होती. पण, आतां सुदैवानेंच म्हणावयाचें--या बोटीची ही पहिलीच सफर असल्यानें सर्व जागा भरल्या नव्हत्या. उतारू व नौकरचाकर मिळून एकंदर २३४० माणसें बोटीवर होतीं. ता. १४ च्या मध्यरात्रीं न्यू फाउंडलंडच्या टोंकापासून थेट दक्षिणेस ४०० मैलांवर आगबोट आली. त्या वेळेस थंडी अतिशय पडली होती. पण समुद्र अगदीं शांत होता व आकाशही निरभ्र होतें. दूरच्या वस्तूंची पाहणी करण्याकरितां नाळीवर एक पहारेकरी बसविलेला असतो. त्यानें या सुमारास पुलावरील अधिकाऱ्यास अशी वर्दी दिली कीं समोरून एक मोठा हिमनग ( बर्फाचा डोंगर ) जोरानें वहात येत आहे!

अमेरिकेच्या उत्तरेस ग्रीनलंड हा अत्यंत थंड प्रदेश आहे. तेथील डोंगर व दरींखोरीं हिवाळ्यांत बर्फानें झांकून गेलेलीं असतात. उन्हाळ्याच्या सुमारास जेव्हां उष्णता वाढूं लागते, तेव्हां या बर्फाचे मोठेमोठे तुकडे तुटून ते अटलांटिक महासागरांतून तरंगत दक्षिणेकडे येतात. हे तुकडे केव्हां केव्हां इतके मोठे असतात कीं खरोखरच त्यांना पर्वताची उपमा साजेल. बर्फ पाण्यापेक्षां हलकें असल्यामुळें हे हिमनग

पाण्यांत तरंगूं शकतात, व समुद्राच्या लाटांबरोबर पुष्कळ दूरवर जातात. जसजसे ते दक्षिणेकडील उष्णप्रदेशाकडे येतात तसतसे ते वितळून लहान होऊं लागतात व शेवटीं पार नाहींसे होतात. पण ते जेव्हां मोठे असतात तेव्हां जर कां त्यांचा धक्का एखाद्या जहाजास लागला तर त्या जहाजाचा चक्काचूर होऊन जातो. हे वरून जरी एखादे वेळीं लहान दिसले, तरी त्यांवर विश्वास टाकण्याची सोय नाहीं; कारण समुद्राच्या पृष्ठभागावर त्यांचा जेवढा भाग दिसतो त्याच्या सुमारें आठपट भाग पाण्यांत बुडालेला असतो ! त्यांना पुष्कळ वेळां तीक्ष्ण कडा असून त्यांनीं जें काय समोर येईल त्याला कापून काढण्याला ते समर्थ असतात.

असा एक प्रचंड हिमनग सुमारें पाऊण एक मैलाच्या अंतरावर ह्या वेगानें चाललेल्या आगबोटीस दिसला. एकदम आगबोट बाजूला घेण्यास फारशी जागा नव्हती. कारण जिकडे तिकडे असे लहानमोठे बर्फाचे तुकडे पसरलेले असून, त्यांमधून कसाबसा रस्ता काढीत बोट चालली होती. हिमनगाचा इशारा मिळतांच ती त्याला चुकविण्यासाठीं जरा बाजूला वळली. तथापि उभयतांच्या प्रचंड वेगामुळें एका बाजूनें चाटीत आगबोट थोडीशी त्यावर चढली. त्याबरोबर त्या हिमनगाच्या पाण्याखालील भागानें आगबोटीची एक बाजू तिरकस कापून काढिली व अर्थात् तिच्यांत भराभर पाणी शिरूं लागलें.

---

## धडा २५

# टायटानिक बोटीची जलसमाधि

### भाग २ रा

यापुढील हकीकत या अपघातांतून बचावलेल्या **लारेन्स बीस्ले** नांवाच्या गृहस्थानें फारच रसभरित रीतीनें सांगितली आहे. तो म्हण-

तो:—त्या रात्रीं थंडी अशी कडक पडली होती कीं बोटीच्या डेकवर कोणीही राहणें शक्य नव्हतें. मी माझ्या खोलींतील बिछान्यावर पडून दहा मिनिटें झालीं असतील नसतील; कसलासा धक्का बसल्यासारखा आवाज ऐकू आला. थोड्याच वेळांत आणखी एक धक्का बसला. तथापि हे धक्के कोणालाही काळजी उत्पन्न करण्यासारखे मुळींच नव्हते. पण पाहतों तों थोडयाच वेळांत बोटीचीं इंजनें बंद पडलीं. मी डेकवर गेलों; माझ्यासारखेच, 'काय आहे ? बोट एकाएकीं थांबली कां ?' याची चौकशी करण्याकरितां आणखीही कांहीं लोक तेथें गोळा झाले होते. पण भीति वाटण्यासारखा कांहीं प्रकार झाला असेल असें कोणासच वाटत नव्हतें. धक्का बसलेला सर्वांनीं ऐकिला होता; व कांहींनीं खिडक्यांतून डोकावून पाहिलें होतें, त्यांना एक प्रचंड हिमनग शेजारून गेल्याचेंही आढळलें होतें. त्याला बोट चाटून गेली असावी, व कांहीं नुकसान झालें कीं काय, याचा तपास करण्याकरितां बोट कांहीं वेळ थांबविण्यांत आली असावी, इतकाच सर्वांचा तर्क झाला. यामुळें आम्ही सर्व परत आपापल्या खोल्यांत गेलों, व कोणी पत्ते खेळूं लागले, व कोणी वाचनांत गुंग झाले.

थोडया वेळांत पुन: गडबड ऐकूं आल्यावरून मी पुन: डेकवर गेलों. इंजिनें एकदम थांबल्यामुळेंच पुष्कळांची झोंपमोड झाली होती, व ते चौकशी करण्याकरितां बाहेर आले होते. या वेळीं माझ्या असें नजरेस आलें कीं, बोट थोडीशी पुढील बाजूला कलती झाली होती. पण याचें खरें कारण न समजल्यामुळें मला त्याची मुळींच भीति वाटली नाहीं व मी पुन: आपल्या खोलीकडे गेलों.

तेथें जाऊन मी जरा गरम कपडे अंगांत घालीत होतों, इतक्यांत "सर्व उतारूंनीं प्राणरक्षक वलयें घालून डेकवर तयार असावें" असा हुकुम जोरानें माझ्या कानावर आला. हुकुमाप्रमाणें वलयें चढवून आम्ही सर्व

डेकवर तर गेलों; पण आम्हांस वाटलें कीं, न जाणों, कशी वेळ येईल कोण जाणे, असें वाटून कप्तानानें खबरदारी घेतली असेल; पण वास्तविक तिची जरूर नसून लवकरच आम्हांस आपापल्या ठिकाणीं परत जातां येईल. कांहीं भयंकर प्रकार असेल अशी कोणास कल्पना येईना. रात्रीची शांत वेळ असून, अपघाताचें कांहींच चिन्ह दिसत नव्हतें. जहाज अगदीं स्तब्ध होतें; फक्त तें एका बाजूला कललें होतें (हें कलणेंसुद्धां या वेळीं सर्वांच्या लक्षांत येण्यासारखें नव्हतें); याखेरीज भावी अनर्थाची सूचना देणारें दुसरें कोणतेंच साधन त्या वेळीं नव्हतें. यामुळें सर्व लोक निश्चिंत होते. पण थोडयाच वेळांत हा भ्रम नाहींसा झाला. धोक्याच्या प्रसंगीं उपयोगी पडाव्या म्हणून मुद्दाम ठेवलेल्या छोट्या नावा काढून पाण्यांत लोटण्याची जेव्हां तयारी होऊं लागली, तेव्हां मात्र खरोखरच कांहीं तरी अरिष्ट कोसळणार असें सर्वांना वाटलें.

थोड्याच वेळांत दुसरा हुकूम ऐकूं आला:—" पुरुषांपैकीं कोणीही होडयांजवळ जातां कामा नये; व सर्व स्त्रियांनीं खालच्या मजल्यावरील 'बी' डेकवर गोळा व्हावें." हुकुम होतांच सर्व पुरुष होडयांपासून दूर झाले; व कोणी निमूटपणें उभे राहिले व कोणी डेकवर इकडून तिकडे फिरूं लागले. होडया 'बी' डेकपर्यंत खालीं सोडण्यांत आल्यावर बायकांना त्यांत बसविण्याची व्यवस्था करण्यांत आली, व त्याही मुकाट्यानें त्यांत बसल्या. कांहीं थोडया बायकांनीं मात्र आपल्या पतींस सोडून जाण्याचें नाकारलें. त्यांपैकीं कांहीं जणींना जबरदस्तीनें ओढून बोटींत ढकललें; पण इतर कांहींजणी मात्र तशाच राहिल्या. कारण त्यांनीं बोटींत गेलेंच पाहिजे असा आग्रह करणारेंच त्या वेळीं कोणी मिळालें नाहीं.

भरलेल्या बोटी हळूहळू दूर जातांना आम्हांस दिसूं लागल्या. कांहीं वेळानें मी जेथें उभा होतों त्या बाजूच्या होडया खालीं सोडण्याचा हुकूम

झाला. इतक्यांत आफिसरचा पोषाख केलेला एक मनुष्य तेथें आला, व मोठ्यानें ओरडून म्हणाला कीं "तुम्ही होडींत बसलां म्हणजे दुसऱ्या बाजूला ज्या होडया भरत आहेत त्यांजपाशीं आपली होडी नेऊन उभी करा, व मग पुढच्या हुकुमाची वाट पहा." "होय, ठीक आहे" असा या हुकूमास चहूंकडून जबाब मिळाला. पण मला नाहीं वाटत हा हुकूम पाळण्याची कोणत्याही होडींत या वेळीं ताकत होती. कारण बोटींत बसून जरा दूर जातांच त्या भराभर बुडूं लागलेल्या जहाजाची खरी स्थिति नावाडयांच्या एकदम लक्षांत आली; व त्यांनीं ताडलें कीं, आतां शक्य तितकें जलद या अजस्र बोटीपासून दूर जाणें हाच मार्ग प्रशस्त. कारण असें अवाढव्य जहाज बुडूं लागलें म्हणजे पाण्यांत जणू कांहीं एक प्रचंड खळगा उत्पन्न होतो, व तो भरून काढण्याकरितां चहूंकडून पाण्याचा लोट जोरानें त्या जागेकडे वाहूं लागतो! अर्थातच लहान-सहान होडया या प्रवाहानें त्या खड्डयांत जाऊन गडप व्हावयाच्या, व जे थोडेसे लोक वांचण्याचा संभव होता तेही "समुद्रास्तृप्यंतु" व्हावयाचे !

हा सर्व प्रकार चालू असतांना गडबड किंवा धांदल मात्र बिलकुल दिसत नव्हती. सर्व कांहीं सावकाश व शिस्तीनें चाललें होतें. धांवाधांवी, आरडाओरड, बायकांची रडारड वगैरे अशा प्रसंगीं साहजिक रीतीनें दिसणारा देखावा या वेळीं अगदीं दिसला नाहीं हें आश्चर्य आहे !

थोडयाच वेळांत बोटीच्या उजव्या बाजूकडच्या कांहीं होडयांत आतां पुरुषांना घेऊं लागले आहेत अशी खबर आली. मी डाव्या बाजूला होतों; वरील बातमी येतांच बरेच लोक ती बातमी खरी आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां उजव्या बाजूकडे गेले. मी मात्र आपली बाजू सोडली नव्हती. इतक्यांत "आतां वर कोणी बायका राहिल्या आहेत कां?"

असे शब्द माझ्या कानीं आले. मीं जहाजाच्या खालीं डोकावून पाहिलें तों नंबर १३ ची होडी ' बी ' डेकजवळ लोंबकळत होती. होडी अर्धीमुर्धी बायकांनीं भरलेली होती. " कोणी बायका राहिल्या आहेत का बायका ?–" आणखी एक आरोळी ऐकूं आली. पण कोणी बायको दिसत नव्हती. होडींत बसलेल्या लोकांपैकीं एकानें मला विचारलें, " आतां वर बायकांपैकीं कोणी राहिलें नाहीं ना ?" मी म्हटलें " नाहीं. " " टाका तर उडी मग !–" तो म्हणाला, व मीं लगेच तसें केलेंही. मी बोटींत पाउल टाकलें असेल नसेल, तों "सोडा खालीं" हे शब्द माझ्या कानीं आले. होडी खालीं येतां येतां दोन बायकांना कसेंबसें तींत ढकलण्यांत आलें, व त्यांमागून एक दहा महिन्याचें तान्हें मूलही खालीं सोडण्यांत आलें.

---

## धडा २६

# टायटानिक बोटीची जलसमाधि

### भाग ३ रा

थोडयाच वेळांत आमची बोट चालू झाली. सुमारें बारावर एकाचा सुमार होता. आकाश इतकें निरभ्र होतें कीं, सर्व नक्षत्रें स्पष्ट दिसत होतीं. फक्त चंद्रोदय झाला नसल्यानें लख्ख प्रकाश नव्हता इतकेंच. समुद्र तर एखाद्या सांचलेल्या पाण्याच्या डबक्याप्रमाणें शांत होता. एक कडक थंडीखेरीज सर्व बाजूंनीं ती रात्र अगदीं अप्रतिम होती. दुरून ती टायटानिक बोट फारच भव्य दिसूं लागली. मागें तारागणांनीं चमचमणारें नील आकाश, व पुढें विजेच्या दिव्यांनीं ज्यांत जिकडे तिकडे लखलखाट करून सोडला होता असें हें प्रचंड जहाज—हा देखावा खरोखरच विलक्षण होता. तें राक्षसी धूड पुढल्या बाजूला बरेंच कललें आहे असें जर दिसलें नसतें, तर त्याच्यावर कांहीं संकट येणार आहे या गोष्टीवर आमचा विश्वासच बसला नसता.

दोन वाजण्याच्या सुमाराला तें अगदीं भराभर खालीं जात आहे असें दिसलें. त्याची पुढची बाजू खालीं जातां जातां एकदम खालीं बुडाली, व मागील बाजू खडी उभी राहिली. या वेळेपर्यंत लख्ख प्रकाशणारे दिवे आतां एकदम दिसेनासे झाले, एक क्षणभर पुनः चकाकले, व मग मात्र एकदम जे विझले ते विझलेच. जहाज बुडतांना त्यांतील यंत्रें व इतर सामानसुमान यांचा एकदम चुराडा झाल्याप्रमाणें कडकडाट ऐकूं आला; तो इतका मोठा होता कीं कित्येक मैलपर्यंत ऐकूं गेला असेल. तथापि अद्यापही जहाजाची पुरती अखेर झाली नव्हती. आश्चर्याची गोष्ट ही कीं ही बोट खडया स्थितींतच सुमारें पांच दहा मिनिटें उभी होती. व तिचा सुमारें १५० फुट उंचीचा हिस्सा समुद्राच्या पृष्ठभागावर दिसत होता. मग जरा कलती होऊन ती जी खालीं गेली ती कामयचीच गेली. व हेंच तिचें आम्हांस शेवटचें दर्शन झालें !

मग मात्र त्या बर्फासारख्या थंडगार पाण्यांत, स्वतःचा जीव वांचविण्याची धडपड करीत असलेच्या आमच्या अनेक बांधवांनीं "आम्हांला कोणी तरी वांचवा हो !" म्हणून दीनवाणीनें मारलेल्या हांका आमचे कानावर येऊं लागल्या. हर हर ! काय कठीण प्रसंग तो ! त्या दीन व निराशेच्या आरोळ्यांनीं आमचें काळीज फाटून गेलें. पण त्या बिचाऱ्यांकरितां आम्हीं कांहीं करणें शक्य नव्हतें. त्यांपैकीं कांहीं लोकांना तरी वर घ्यावें असें आम्हाला वाटलें; पण आमची होडीच इतकी खचून भरली होती कीं, आणखी एखादासुद्धां माणूस घेणें म्हणजे सर्वांचा नाश करण्यासारखें होतें !

अशा रीतीनें हा भयंकर अपघात घडून आला. अपघात वाईट तर खराच, पण या प्रसंगीं बोटीवरील अधिकाऱ्यांनीं व इतर पुष्कळ लोकांनीं स्वतःच्या प्राणाची परवा न करितां बायकामुलांचे प्राण प्रथम वांचविण्यांत जो अजब स्वार्थत्याग दाखविला व सर्व व्यवस्था करण्यांत

जो शांतपणा व शिस्त राखिली, त्यांची तारीफ करावी तितकी थोडी आहे. होडया सर्वांस पुरणें शक्य नव्हतें. कित्येकांनीं प्राणसंरक्षक वलयें अंगावर घालून समुद्रांत उडया टाकल्या; पण बहुतेक लोक शांत मनानें ईशचिंतन करीत बोटीबरोबरच जलसमाधि घेण्यास तयार झाले. हिमन-गाशीं टक्कर झाल्यानंतर लगेच तोफांचे आवाज काढून, बाण सोडून, व बिनतारांचे संदेश पाठवून चोहोंकडून मदत मिळण्याचे शक्य तेवढे प्रयत्न अधिकाऱ्यांनीं केले. परंतु त्या काळरात्रीं त्या दुर्दैवी मंडळीस सोडवि-ण्यास वेळेवर कोणीच येऊं शकलें नाहीं. सुमारें पाऊणशें मैलांच्या अंतरावर "कार्पेथिया" नांवाची आगबोट होती. ती त्वरा करून पहांटे ४॥ वाजतां त्या ठिकाणीं आली; व होडींतील बायकामुलांस व इतर मंडळीस तिनें वर घेतलें. याप्रमाणें ७०५ माणसांचे प्राण वांचले. बाकी सर्वांना जलसमाधि मिळाली. त्यांनीं मोठ्या धैर्यानें व शांतपणें मृत्यूला तोंड दिलें. इंग्लंडमधील प्रख्यात लेखक व गरीबांचा कनवाळू मासिककार **वुईल्यम् स्टेड** हाही या धैर्यशाली मंडळींत होता. वृद्ध कप्तान **स्मिथ्** तर पुलावर कमरेइतक्या पाण्यांत उभा असलेला कित्येकांनीं पाहिला; बोट हळू हळू खालीं जात होती तरी उतारूंची व्यवस्था लावीत तो निश्चळ खांबासारखा मृत्यूसमोर उभा होता. सुमारें दोन वाजतां तोही आगबोटीबरोबरच समुद्राचे तळास गेला !

---

## धडा २७

# रामाचा करुणविलाप

[ खालील उतारा **"उत्तररामचरित्र"** नामक नाटकांतून घेतलेला आहे. रावणाचा वध करून सीतादेवीची मुक्तता केल्यावर रामचंद्रानें कांहीं काल सुखानें राज्य केलें. पण पुढें त्याच्या कानावर अशी वार्ता आली कीं, सीतेच्या पातिव्रत्यासंबंधानें अद्यापही कांहीं लोक साशंक आहेत. वास्तविक पाहतां रामचंद्रास या लोकापवादाकडे लक्ष देण्याचें कांहीं कारण नव्हतें; पण त्याची

लोकरंजन करण्याची कल्पना इतकी उच्च प्रतीची होती कीं, स्वत:स सीतेच्या पवित्रपणाबद्दल बिलकुल शंका नसतां, केवळ लोकांचें समाधान करण्याकरितां सीतेचा त्याग करणें हें आपलें कर्त्तव्य होय असें त्याला वाटलें. याप्रमाणें त्यानें सीतेस ती गर्भवती असतां लक्ष्मणाकडून अरण्यांत सोडविलें. तेथें बहुधा तिचा नाश झाला असावा, अशी त्याची कल्पना होती. सीतेनेंही गंगेच्या प्रवाहांत उडी टाकून जीव देण्याचा यत्न केला. पण चमत्कार असा झाला कीं, स्वत: भागीरथीनें सीतेला वांचविलें, व तिचा सांभाळ केला. पुढें सीता प्रसूत होऊन तिला दोन आवळेजावळे मुलगे झाले. त्यांना भागीरथीनें वाल्मीकीच्या स्वाधीन केलें. वाल्मीकीच्या आश्रमांतच हे लहानाचे मोठे झाले, व त्यांचें विद्याध्ययन पुरें झालें. पुढें शंबूक नांवाच्या तपाचरण करणाऱ्या शूद्राचें पारिपत्य करण्याकरितां रामचंद्र फिरून दण्डकारण्यांत गेले. त्या ठिकाणीं सीताही तमसा या नांवाच्या वनदेवतेबरोबर आली होती. पण भागीरथीच्या प्रसादानें ती वाटेल तिकडे फिरली तरी अदृश्य राहत असे. पूर्वी सीतेच्या सहवासांत ज्या ठिकाणीं आपण फार आनंदांत दिवस काढले, तींच दंडकारण्य, पंचवटी वगैरे स्थानें पाहून रामाचें हृदय दु:खानें भरून आलें, व त्यानें वासंती नामक वनदेवतेजवळ मन मोकळें करून शोक केला. जवळ सीताही अदृश्य रूपानें होतीच. तिलाही या वेळीं अनावर दु:ख झालें. ह्या हृदयद्रावक प्रसंगाचें या उताऱ्यांत वर्णन आहे.]

**वासंती:**—अहो वनदेवतांनो, हा रामभद्र आपल्या घरीं आला आहे, तर या समयीं याचा योग्य सत्कार व्हावा हें योग्य आहे म्हणून,

( श्लोक ) फल मधु कुसुमांनीं वृक्ष पूजोत सारे,
स्फुट कमलसुगंधी मंद वाहोत वारे ।
मधुरतर करावा शब्द येथें शकुंतीं,
फिरुनि सहज आला राम कीं या वनांतीं. ॥ १ ॥

**राम:**—सखि वासंती, ये आपण येथें बसूं.

**वासंती:**—( बसून, डोळ्यांत पाणी आणून ) महाराज, कुमार लक्ष्मण खुशाल आहे ना?

**राम:**—( मनांत ) हिनें मला "महाराज" असें उपरोधिक संबोधन दिलें, व लक्ष्मणाविषयीं कुशल प्रश्न विचारतांना इचा गळा

दाटून आला, त्या अर्थीं सीतेचा वृत्तांत इला समजला आहेसें दिसतें. ( उघड ) होय, कुमार लक्ष्मण खुशाल आहे. ( रडूं लागतो. )

**वासंतीः**—रामा, तूं असा निष्ठुर हृदयाचा कसा रे झालास ?

( पद ) कितीरे निष्ठुर तूं अससी रामा । नव मेघश्यामा ॥ ध्रु०॥
कुसुमाहुनिही जी अति सुकुमारी, । मिथिलेश कुमारी ॥
उदरीं गर्भाचें ओझें भारी, । ती स्त्री कांतारीं, ॥
विजनी नेउनि त्यजिली कैची? । एकाएकीं निज विश्रामा ॥
किती रे० ॥ २ ॥

हर हर काय दैवगति ही,—

( श्लोक ) तूं जीव, तूं हृदय, तूं मजला विसावा,
तूं चंद्रिकाच नयना, शरिरा सुधा वा; ।
मोहीं जिला वदुनि यापरि गुंतवावें.
तीतेंच—हाय! तुज काय पुढें वदावें! ॥ ३ ॥

रामा, आपण अशी अयोग्य गोष्ट कां बरें केली ?

**रामः**—लोकांस सोसेना म्हणून !

**वासंतीः**—कोणत्या कारणामुळें ?

**रामः**—कोणतें कारण तें लोकच जाणत असतील !

**तमसाः**—( स्वगत ) लोकांच्याविषयीं रामाच्या तोंडून वाईट शब्द असा आजच निघाला !

**वासंतिः**—लोकांची समजूत कशीही असली म्हणून तूं असें करावेंस काय ?

( श्लोक ) कठिण हृदय रामा ! आवडे कीर्ति तूतें,
तरि वद अपकीर्ती याहुनी काय मातें ? ।
वनिं गति अबलेची काय झाली असेल ?
तव हृदयिं नरेंद्रा वाटतें काय बोल ॥ ४ ॥

**सीताः**—हे वासंती, रामचंद्राच्या दुःखावर डागण्या देणारी तूंच खरोखर कठिण हृदयाची आहेस !

**रामः**—सखि वासंति, दुसरें काय वाटावयाचें आहे ?

( श्लोक ) भ्याल्या मृगापरि जिची सुविलोल दृष्टी,
जी पूर्ण गर्भ धरितां बहु होय कष्टी, ।
जीची शरीर-लतिका कुसुमें स्तवावी,
रानांत हिंसक जनीं गिळिली असावी. ॥ ५ ॥

**सीताः**—प्राणप्रिया मी जिवंत आहें बरें, जिवंत आहें. मला कोणी गिळलें नाहीं.

**रामः**—हाय ! हाय ! प्रिये जानकी, तूं आतां कोठें आहेस ?

**सीताः**—हाय ! हाय ! प्राणनाथ गळा मोकळा करून रडूं लागले कीं !

**तमसाः**—वत्से, तो करीत आहे हेंच ठीक आहे. जे दुःखित आहेत त्यांनीं रडूनच दुःखें घालवावीं, दुसरा उपाय नाहीं !

( आर्या ) जळ तुंबतां तडागीं फोडावा लागतो जसा पाट,
शोक क्षोभीं रोदन, हृदयस्थैर्या नसे दुजी वाट ॥ ६ ॥

**रामः**—काय दुःख हें ! किती सोसावें तरी ?

( श्लोक ) हृदय उलतें शोकें माझें, नव्हे द्विविधा तरी
विकल करिते मूर्च्छा काया, न जीवित संहरी; ।
अंतुनी तनुशी भाजी ज्वाला, न भस्म करीतसे,
विधि जरि करी मर्मोच्छेदा, न जीव हरीतसे ॥ ७ ॥

हे अयोध्यापुरवासी जनहो, तुम्हांस माझी प्रार्थना आहे कीं,

( श्लोक ) स्थिति निजगृहीं त्या देवीची तुम्हांस न रूचली,
म्हणुनि तृणवत् ती म्यां रानीं त्यजूनि न शोचिली; ।
परि परिचिता त्या त्या वस्तू न राहविती धिरा,
म्हणुनि रडतों हा मी येथें; क्षमा जन हो करा ! ॥ ८ ॥

**तमसा:**—अगबाई, यांच्या शोकसागरास अति गंभीर भरती आली !

**वासंती:**—रामा, जी गोष्ट होऊन गेली तीविषयीं आतां धैर्यच धरलें पाहिजे !

**राम:**—सखे, धैर्य धरावें म्हणून सांगावयास नको, धैर्यच आहे ! पहा,

( श्लोक ) त्या देवीनें शून्य हा लोक झाला.
बारा वर्षें लोटलीं कीं तयाला ! ।
प्राया तीचें जाहलें नष्ट नाम,
आहे अद्यापीहि जीवंत राम ! ॥ ९ ॥

**सीता:**—प्राणनाथांच्या या वचनांनीं मी धन्य झालें ! पण किती मंदभाग्य मी ? वरचेवर प्राणनाथांस दुःख देणारी झालें ना ! ह्यांच्या या दारुण दुःखामुळें माझेंही हृदय थरथर कापूं लागलें आहे !

**वासंती:**—( मनांत ) हा रामचंद्र तर फारच शोकसंकटांत पडला; याचें चित्त दुसरीकडे लावलें पाहिजे. ( उघड ) रामा, हे पंचवटींतील प्रदेश आपल्या फार ओळखीचे आहेत. ह्यांकडे पाहिलें म्हणजे चित्तास कांहीं आनंद होईल.

**राम:**—बरें आहे. तसेंच करितों. ( उठून इकडे तिकडे फिरतो. )

**सीता:**—प्रिय सखीनें प्राणनाथांच्या मनाचें रंजन होण्यासाठीं म्हणून जो उपाय योजिला, तोच त्यांच्या दुःखाग्नीस अधिक पेटविणारा आहे, हें तिच्या कसें ध्यानांत आलें नाहीं ? आतां ही काय काय दाखवील कोण जाणे !

**वासंती:**—( करुणार्द्र वाणीनें ) रामदेवा, हें लतागृह पाहिलेंस ना ?

( श्लोक ) या कुंजांतचि वाट पाहत तिची होतास; ती गोमटी
होती हंसविलास देखत उभी गोदावरीच्या तटीं. ।

येतां खिन्न तुला विलोकुनि तिच्या शंका मनीं वाटली,
भीतीनें तुज हात जोडुनि तिनें केला प्रणामांजली ॥१०॥

**सीताः**—वासंती, किती ग कठोर मनाची आहेस तूं? ह्या अशा मर्मभेदी भाषणांनीं माझ्या प्राणनाथांना व मला कां पुनः पुनः दुःख देत आहेस?

**रामः**—अगे कोपिष्टे निर्दये जानकी, जवळपास असल्यासारखी वाटतेस, पण दिसत नाहींस. मज मंदभाग्याची तुला दया येत नाहीं कां?

( श्लोक ) हा हा देवि! हृदय फुटतें देह माझा गळाला,
वाटे शून्य त्रिभुवन मला, अंतरात्मा जळाला!।
या आत्म्यानें किति तरि सदा दुःखभारा धरावें?
मोह व्यापी फिरफिरुनि, म्यां काय आतां करावें! ॥ ११ ॥

( मूर्च्छा पावतो. )

**सीताः**—हाय हाय, धिक्कार असो या कर्माला. प्राणनाथ मूर्छित झाले! जळो हें माझें जीवित, कीं प्राणनाथांची अशी दशा मी आपल्या डोळ्यांनीं पाहतें आहें!

**तमसाः**—वत्से सीते, धीर धर, घाबरूं नको, ऊठ आणि रामचंद्राला तुझ्या हाताचा स्पर्श कर, हाच त्याच्या संजीवनाचा मुख्य उपाय आहे.

( सीता त्वरेनें रामचंद्राजवळ जाऊन त्याच्या हृदयास व मस्तकास स्पर्श करते. राम हळू हळू सावध होतो. )

**रामः**—( श्लोक ) वाटे कीं अमृतमय प्रलेपनांनीं
बाहेरी अंतुनिहि देह सारवूनी;।
हा स्पर्श क्षण मज वाचवूं पहातो,
आनंदें मज दुसराच मोह देतो! ॥ १२ ॥

वासंती, जानकी पुनः प्राप्त झाली!

**वासंतीः**—हं हं! कुठें आहे ती?

**रामः**—अग ही पुढेंच आहे पहा !

**वासंती:**—रामदेवा, मी अगोदरच दुःखानें भाजलें आहें. त्यांत असे मर्मभेदक प्रलाप करून तूं मला कां आणखी भाजतोस ?

**रामः**—सखे प्रलाप कशाचे ? सत्यच आहे हें !

**वासंती:**—( मनांत ) काय कपाळ सांगावें ? येथें कशाची सीता आणि कशाचा स्पर्श ! ही सारी दुःखशोकांतली बडबड आहे !

**सीताः**—सखे तमसे, आतां येथें राहणें उचित नाहीं ( असें म्हणून एकदम मागें सरते. )

**रामः**—हाय हाय, हें काय झालें ?

( आर्या ) सहसा माझ्या हस्तापासूनि कसा तिचा कर निघाला ?।
जड कंपित घमप्लुत कर दोघांचाहि एकदा झाला!॥१३॥

( चोहोंकडे पाहून ) काय, नाहींशी झाली ? हाय ! निर्दये जानकी !

**सीताः**—खरोखरच मी निर्दय आहें. कां कीं तुम्हांला दुःखित पाहूनही मी जीवंतच आहें !

**वासंती:**—रामदेवा, आतां कृपा करावी. शोकाची आतां पराकाष्टा झाली. प्रिय सखी सीता येथें कोठून बरें येणार ? ही व्यर्थ भ्रांति आहे.

**रामः**—खरेंच, तसेंच असलें पाहिजे; नाहीं तर ती तुझ्या दृष्टीस पडली नसती कां ? विरहामुळेंच माझ्या तोंडून अशी बडबड झाली. पण मी काय करूं ?

( साक्या ) कैसा दुःखातें साहूं ? । कोठें सीतेला पाहूं ? ॥ध्रु० ॥
पूर्वीं दैवें मजला झाला स्त्रीचा वियोग जेव्हां,
होते भेटावयास तीतें शतशा उपाय तेव्हां ॥ १४ ॥
पुढच्या आशेवर म्यां बहुधा, कालक्रमणा केली,
आतां तीच्या भेटीचीही आशा नाहीं उरली ! ॥ १५ ॥

मेळविलें म्यां वानर बळ तैं, सेतु सागरीं रचिला
आतां कोणा सहाय घेऊं ? धीरचि माझा खचला ॥ १६ ॥
पहिला वियोग रिपुघातावधि होता उघडच लोकीं,
आतांचा हा निरवधि आहे, घालिल दुःसह शोकीं ॥ १७ ॥

**सीताः**—हाय, हाय, हा वियोग निरवधि आहे काय ? ( रडूं लागते. )

**रामः**—अरेरे ! काय संकट हें !

( दिंड्या ) व्यर्थ जेथें सुग्रीव सख्य व्हावें,
वानरांचेंही वीर्य वृथा जावें; ।
जांबवंता न स्फुरे बुद्धि कांहीं,
वायुपुत्राची गती जेथ नाहीं ॥ १८ ॥
विश्वकर्म्याचा पुत्र नळ त्याची,
मार्ग करण्याला शक्ति नाहिं साची; ।
लक्ष्मणाचे शर जेथ जाति वांया,
प्रिये, अससी कोणत्या अशा ठायां ? ॥ १९ ॥

सखे वासंती, या रामाचें दर्शन तुम्हां सर्वांस दुःखच देणारें आहे; हें किती वेळ तुम्हांस रडवील नकळे. तर आतां तूं मला जाण्यास अनुमोदन द्यावेंस हें बरें. ( उठतो. )

**सीताः**—( गहिंवर येऊन ) सखे तमसे, प्राणनाथ चालले कीं ग !

**तमसाः**—वत्से, अशी धीर सोडूं नको. जाऊं दे गेला तर. आपणही आतां आयुष्मंत कुशलवांच्या वाढदिवसाचें मंगलकार्य संपादण्यास भागीरथीच्या पायांजवळ जाऊं.

**सीताः**—बाई तमसे, अमळ थांब तरी. ह्या प्रियजनाचें पुनः दर्शन दुर्लभ आहे. ह्यासाठीं क्षणभर त्याला आणखी पाहूं दे.

**वासंतीः**—रामदेवा, खरेंच मीं तुमच्या जाण्याचा खोळंबा केला. आतां आपण ज्या योगानें पुढील कार्याची हानि न होईल असें करावें !

**सीता:**—ह्या वेळेस वासंती मला प्रतिकूल झाली; कां कीं प्राणनाथांचे गमनास तिनें अनुमोदन दिलें.

**तमसा:**—वत्से, चल तर आपणही जाऊं! ( सीता सारखी रामाकडेच पहात राहते. ) पण जावें कसें ? तुझी अवस्था पाहिली तर—

( आर्या ) तृष्णादीर्घ तुझे हे चक्षू दयितींच रोविले अढळ,
त्यांचा महाप्रयासें करितां आकर्ष होइनाच ढळ ॥ २० ॥

**सीता:**—प्राणनाथांच्या चरणकमलांस माझा वारंवार नमस्कार असो. ज्यांच्या पदरीं पुण्य नाहीं, त्यांच्या हे कोठून दृष्टीस पडणार? असो. चला आतां, मेघांच्या आड जाणाऱ्या पूर्ण चंद्राचें दर्शन किती वेळ होणार ? ( सर्व जातात. )

**परशरामपंत गोडबोले** यांच्या भाषांतरावरून
थोडा फेरफार करून.

---

धडा २८

## रांगोळी घालतांना पाहून

**श्लोक**

होतें आंगण गोमयें सकल ही संमार्जिलें सुंदर,
बालार्कें अपुली प्रभा वितरली नेत्रोत्सवा त्यावर; ।
तीची जी भगिनी अशी शुभ-मुखी द्वारीं सती पातली,
रांगोळी मग त्या स्थलीं निजकरें घालावया लागली. ॥१॥

आधीं ते लिहिले तिनें रवि, शशी, नक्षत्रमाला तदा,
मध्यें स्वस्तिक रेखिलें, मग तिनें आलेखिलें गोष्पदा; ।
पद्में, बिल्वदलें, फुलें, तुळसही, चक्रादिकें आयुधें,
देवांचीं लिहिलीं; न एक उरलें जें चिन्ह विश्वीं सुधें ! ॥ २ ॥

होती मंजुल गीत गात वदनीं अस्पष्ट कांहीं तरी,
गेला दाटुनि सर्व शांत रस तो तेणें मदभ्यंतरीं; ।
तीर्थें, देव, सती, मुनी, नरपती, देवी तशा पावना
अन्तर्दृष्टिपुढोनियां सरकल्या;--संतोष झाला मना ! ॥३ ॥

चित्रें मी अवलोकिलीं अजवरी काव्यें किती चांगलीं,
त्यांहीं देखिल न स्मरेचि इतुकी मद्वृत्ति आनंदली ।
लीलेनें स्वकरें परंतु चतुरे ! त्वां काढिल्या आकृती,
त्या या पाहुनि रंगली अतिशयें ही आज माझी मती ! ॥ ४ ॥

रांगोळींत तुझ्या विशेष गुण जो आर्ये मला वाटतो
स्पष्टत्वें इतुक्या अशक्य मिळणें काव्यांत, चित्रांत तो; ।
स्व-र्भूसंगम हा तयांत इतुक्या अल्पावकाशीं नसे
कोणीं दाखविला अजून, सुभगे ! हा साध्य तूतें असे ! ॥५ ॥

आदित्यादिक आकृती सुचविती दिव्यत्व गे उज्जल;
तैसें स्वस्तिक सूचवी सफलता धर्मार्थकामांतिल, ।
पावित्र्याप्रति गोष्पदें, तुळस ही, शोभेस हीं सारसें,
पुष्पें प्रीतिस, चक्र हें सुचवितें द्वारीं हरी या असे ! ॥ ६ ॥

तत्वें मंगल सर्व हीं विहरती स्वर्गीं तुझ्या ह्या, अये
आर्ये, तूं उपचारिकाच गमशी देवी तयांची स्वयें ! ।
नातें, स्नेह, निदान ओळख जरी येथें मला आणिती,
होतों मी तरि पाद सेवुन तुझे रम्य स्थलीं या कृती ॥ ७ ॥

चित्तीं कल्मष ज्याचिया वसतसे ऐशा जना लागुनी
ह्या चिन्हांतुनि हा निषेध निघतो आहे गमे मन्मनीं:— ।
" जा मार्गें अपुल्या, न दृष्टि कर या द्वाराकडे वांकडी,
पापेच्छूवर हें सुदर्शन पहा आणील कीं सांकडीं. ॥ ८ ॥

आहे निर्मल काय अंतर तुझें ! मांगल्य कीं जाणशी ?
लोभक्षोभजयें उदात्त हृदयीं व्हायास कां इच्छिसी ! ।
ये येथें तर, या शुभाकृति मनीं सांठीव अभ्यासुनी,"
आर्ये, स्वागत हें निघे सहज ह्या त्वल्लेखनापासुनी ॥ ९ ॥
**साध्याही विषयांत आशय कधीं मोठा किती आढळे;**
नित्याच्या अवलोकनें परि किती होती जगीं आंधळे ।
रांगोळी बघुनी इतःपर तरी होणें तयीं शाहणें,
कोठें स्वर्गसमक्षता प्रगटते हें नेहमीं पाहणें. ॥ १० ॥

**कृ. के. दामले**
(केशवसुत)

---

## धडा २९

## छत्रीचे उपकार

### पद

छत्री गे, मानितों तुला मी माझि खरी माउली,
कृपेची करिसि बरी साउली ॥ ध्रु० ॥
आटपसर कधिं वस्त्र चुण्याचें नेसुनि येशी सवें
यष्टिसी सेविसि मज गौरवें;
श्वापद रोखिति मार्गा जेव्हां त्यांतें तुज टोंचुनी
लावितों क्षणांत मी पळवुनी;
(चाल) कधिं खांचा खळगे अवचित पथ रोधिती,
कधिं तिमिर खुंटवी समूळ माझी गति,
सोपान कधीं मज उतरावे लागती,
ऐशा संकटिं देउनि टेंका, रक्षिसि सांघे भली,
कृपेची करिसि बरी साउली. ॥ १

निज वस्त्रा कधिं रूप झग्याचें देउनि वातावरी,
पोहसी दिससि भव्य किति तरी,
चंद्रा जैसा परिवेष तशी शोभविसी मम मुखा,
दागिना कोण तुझ्या सारिखा ?
(चाल) मम शिरीं तरंगुनि या रीतीनें सदा,
वारिशी रवीच्या करमूलक आपदा,
जल बलें निवारुनि विडंबिशी अंबुदा,
निवारितों नच नेतिस तरि नभिं सुंदर वेगानिलीं,
कृपेची करिसि बरी साउली. ॥ २
दैवाच्या दुर्विपाक-योगें अग्नि जयीं पेटतो,
नराला सौधांतरिं गांठितो;
अथवा दुर्गावरी नराला शत्रु जयीं कोंडितो,
भोंवतीं रक्षकगण ठेवितो;
(चाल) जरि असती त्यांच्या सन्निध तूं देवता,
तो क्षणार्धांत करि तुजसह निजमुक्तता,
अग्निच्या जिभा अरि-शर किंवा तत्वतां,
पोचति नच त्या चुकविसि यापरि महासंकटावरी;
कृपेची करिसि बरी साउली. ॥ ३
अजुनी माते उपकार तुझा कथण्याचा राहिला,
पूर्विंच्याहुनि जो बहु आगळा;
मत्त वृषभ जैं गर्जत दारुण मजवरि ये धांवुनी,
वांचतो उभारुनी तुज झणीं;
(चाल) मार्गानें भेटति खल जे मजलागुनी,
व्यवधान म्हणोनि तुज मध्यें घालुनी,
रक्षितों स्वतांला तद्-दृष्टीपासुनी,

भर रस्त्यामधिं निर्मिशि यापरि निवांत खोली खुली,
कृपेची करिसि बरी साउली. ४

श्री. कृ. कोल्हटकर

---

## धडा ३०

# महाराणा प्रतापसिंह

आली जरी कष्टदशा अपार,
न टाकिती धैर्य तथापि थोर; ।
केला जरी पोत बळेंचि खालें,
ज्वाळा तरी ते वरती उफाळे ! ॥ —भर्तृहरि

अग्नीची ज्वाळा बळानें खालीं चेपली, तरी ती खालीं न जातां वरच जावयाची; तसा धैर्यशाली पुरुष अनेक संकटांनीं दडपून गेला, तरी त्यांस न जुमानतां तो आपली मान वरच काढतो, असा वरील पद्याचा आशय आहे. याचें एक अत्यंत उज्वलित उदाहरण म्हणजे मेवाड देशाचा राणा **प्रतापसिंह** याचें चरित्र होय.

प्रतापसिंह मेवाडच्या गादीवर इ. स. १५७२ मध्यें बसला. पण तो त्याच्या वाडवडिलांची राजधानी जो विख्यात **चितोडगड** तेथें नव्हे. चितोडगड त्याच्या बापानें ( उदयसिंहानें ) सन १५६८ मध्येंच गमावला होता, व त्याच्या बरोबरच त्यानें मेवाडच्या शौर्याविषयींचा लौकिकही गमावला होता. तो चितोडगड पुनः **अकबरा**पासून हिसकून घ्यावयाचा, व मेवाडांतून मोंगलांस हुसकून लावावयाचें असा निश्चय प्रतापसिंहानें केला.

परंतु हें काम अत्यंत कठिण होतें. चितोडगड गेल्यापासून तों प्रतापसिंह गादीवर बसेपर्यंत चारपांच वर्षांत राजस्थानांतील बहुतेक राजघराण्यांस अकबरानें आपल्या पराक्रमानें पादाक्रांत करून, त्यांस आपल्या

उदार स्वभावानें, चातुर्यानें, त्यांचीं संस्थानें कायम करून व त्यांचा मानमरातब वाढवून अगदीं मोहून टाकिलें; इतकें कीं, ते कट्टे रजपूत-बच्चे आपल्या मुलीबहिणी त्यास व त्याच्या मुलांस देऊन त्याच्या घराण्याशीं शरीरसंबंध जोडूं लागले होते; व अकबरासाठीं पाहिजे त्या मुलखांत जाऊन त्याच्या शत्रूंस जेरीस आणीत होते. जयपूर, जोधपूर, बिकानेर इत्यादि प्रांतांचे राजे अकबराचे मनसबदार बनले होते.



प्रथम या गोष्टी प्रतापसिंहाच्या लक्षांत चांगल्याशा आल्या नाहींत. त्यास वाटलें कीं, पूर्वीच्या वहिवाटीप्रमाणें मेवाडच्या राण्यानें मुसलमानांवर शस्त्र धरिलें कीं, बाकीचे सर्व रजपूत राजे त्याचे झेंड्याभोंवतीं जमा होऊन लढतील. परंतु वरील घरफोड लवकरच त्याच्या अनुभवास आली. त्यानें अकबराशीं उघड वैर आरंभिलें; पण त्यास कोणी रजपूत संस्थानिक येऊन मिळाले नाहींत. उलट, राजा **मानसिंग** वगैरे राजे

अकबराच्या वतीनें त्याच्याशीं लढण्यास तयार झाले ! प्रत्यक्ष त्याचा भाऊ **सागरजी** उघडपणें अकबरास जाऊन मिळाला, व त्यास अकबरानें 'चितोडचा राणा' अशी पदवीही दिली. अशा रीतीनें मोंगलासारख्या अवाढव्य बादशाहीशीं प्रतापसिंहास जो झगडा करावा लागला, तो फक्त मेवाडी रजपुतांवर व स्वतःच्या पराक्रमावर भिस्त ठेवून करावा लागला.

तरी तो बिलकुल डगमगला नाहीं. तुर्कांपुढें मान वांकविण्यापेक्षां व आपल्या देशाचें स्वातंत्र्य गमावण्यापेक्षां मरण आलें तरी बेहेत्तर असा त्यानें मनाचा धडा केला; व जय्यत तयारी करून आलेल्या मोंगलांस तोंड देण्याचा त्यानें उपक्रम चालविला. प्रथमतः त्यानें मैदानांतील आपल्या प्रजाजनांस आरवली पर्वताच्या खोऱ्यांत काढून घेतलें; नंतर मैदानांतील सर्व मुलुख बेचिराख करून टाकला. व मग आपल्यावर चालून येणाऱ्या मोंगल फौजेस प्रतिबंध करण्यासाठीं **हळदीघाटा**च्या पहाडांतून माऱ्याच्या जागा पाहून खालींवर, खोऱ्यांत दऱ्यांत आपले मेवाडी रजपूत व भिल्ल ठेवून दिले. पहाडी प्रदेशांत आवळून बसून शत्रू आला असतां त्यावर एकदम हल्ला करण्याची त्याची ही सैन्यरचना पाहून पुढें **औरंगजेबा**शीं सामना देतांना **शिवाजी** महाराजांनीं जी पद्धत स्वीकारली तिची आठवण होते.

मोंगलांच्या फौजेंत अकबर स्वतः नव्हता. त्याचा मुलगा **सेलीम** यास त्यानें फौजेचें आधिपत्य दिलेलें होतें, व त्याच्या मदतीसाठीं राजा मानसिंग यास त्यानें दिलेलें होतें. यास कारणही तसेंच होतें. आपल्या आयाबहिणी तुर्कांस देऊन त्यांजपुढें मान वांकविण्यास तयार झाल्याबद्दल प्रतापसिंहानें एकदा मानसिंगाची खूपच निर्भर्त्सना केली होती. व याचा सूड घेण्यासाठीं, "तुझा ताठा मोडून तुझी मान वांकवीन तरच नांवाचा '**मान**'—" अशी मानसिंगानेंही प्रतिज्ञा केली होती;

मोंगली फौज मेवाडच्या मैदानमुलखांत आली तों मुलुख सर्व वैराण झालेला; त्यांस अन्नपाणी मिळेना. तेव्हां त्याचा पुरवठा बाहेरील प्रदेशांतून करणें भाग पडलें.

पुढें पहाडी प्रदेशांतून प्रतापाची राजधानी जें **कमळमेर** त्यावरच सेलीमानें रोख धरला. वाटेंत **हळदीघांटचा** निरुंद प्रदेश लागतो. त्याच्या तोंडींच प्रताप आपल्या निवडक रजपुतांच्या सैन्यानिशीं उभा होता. त्याच्या डोकीवर छत्र धरिलें होतें, व जवळच सुवर्णादित्यांकित असा त्याचा लाल झेंडा फडकत होता. मोंगल घाटांत शिरूं लागले तों रजपुतांनीं चोहोंकडून त्यांवर हल्ला केला, व लढाई जुंपली. प्रतापानें मानसिंगाशीं गांठ घालून त्याचा सूड घेण्यासाठीं तिकडे घोडा फेंकला; पण मानसिंग त्याच्या तडाक्यांत सांपडला नाहीं. मग जेथें सेलीम हत्तीवर बसलेला होता तिकडे शत्रूंची फळी फोडीत तो गेला. सेलीमच्या खास हुजरातीच्या लोकांचा प्रतापाच्या धडाक्यापुढें फडशा उडाला! त्याचा घोडा सेलीमच्या हत्तीच्या पायावर आपले पुढील पाय देऊन उभा राहिला. त्याबरोबर प्रतापानें आपल्या भाल्याची फेंक अशा जोरानें मारली कीं, त्या फेकीखालीं सेलीम ठारच व्हावयाचा. पण त्याच्या हौद्यास पोलादी पत्रे मारिले असल्यामुळें भाल्याचें फळ बोथटून ती फेक व्यर्थ झाली. इतक्यांत हत्तीचा माहूत मारला गेला, व हत्ती अनावर होऊन पळूं लागला. तेव्हां तेथें तुंबळ युद्ध सुरू झालें. सेलीमाच्या बचावासाठीं मोंगल, व आपल्या राण्याच्या साहाय्यासाठीं रजपूत तुटून पडले! मोठी मारामारी खणाखणी झाली. खुद्द प्रतापास सात जखमा लागल्या. तरी तो सेलीमाचा पिच्छा सोडीना, व आपलें छत्र व लाल निशाण दूर करीना. यामुळें जेथें तें निशाण दिसे तेथें मोंगलांचे हल्लयावर हल्ले चढूं लागले. शेवटीं मोंगलांचा वेढा पडून प्रताप त्यामध्यें सांपडणार असा रंग दिसतांच **झालाचा ठाकूर माना** यानें तें छत्र व तें लाल निशाण यांस

झोंबून तीं आपल्या डोकीवर धरिलीं, व एका अडचणीच्या स्थळीं निघून जाऊन प्रतापावरील मोंगलांचे हल्ले त्यानें आपणामागें ओढून घेतले ! याप्रमाणें त्या स्वामीभक्त ठाकुरानें आपल्या राण्याची सुटका केली, तेव्हां इतर रजपूत सरदारांनीं प्रतापास जुलमानें बाहेर काढिलें. इकडे माना आपल्या शूर तुकडीसह ठार झाला. त्यानें आपला प्राण स्वामिभक्तीस बळी दिला ! *

अशी ही निकराची लढाई झाली. पण मोंगलांच्या असंख्य तोफा, स्वार, व पायदळ यांपुढें रजपुतांचें मूठभर सैन्य किती वेळ तग धरणार ? बावीस हजार रजपुतांपैकीं सारे आठ हजार रणांतून जिवंत परतले, इतक्या शौर्यानें ते लढले. प्रताप आपल्या अत्यंत चपळ व विश्वासू **चेतक** नांवाच्या घोड्यावर बसून ओढ्यानाल्यावरून उडून जात असतां एकदम शत्रू पाठीशीं आले. अशा प्रसंगीं एका रुंद नाल्यावरून उडी मारून तो घोडा प्रतापास पलीकडे घेऊन गेला. यामुळें प्रतापास थोडी फुरसत मिळाली. पण प्रतापाप्रमाणेंच चेतकही जखमी झाला होता; आणि पाठलाग करणारे तर जवळ येऊं लागले होते. इतक्यांत "अरे काळ्या घोड्यावरील स्वारा, उभा रहा!" म्हणून प्रतापास स्वभाषेंत कोणीं हाक मारली. वळून पाहतो तों आपला भाऊ **सूक्त** दौडत येत आहे ! सूक्त मागेंच फितुर होऊन अकबराकडे गेला होता. पण या वेळीं आपला भाऊ एकटा असून त्याचा पाठलाग दोन पठाण स्वार करीत आहेत असें त्यानें पाहिलें, तेव्हां त्याचें मन पश्चात्तापानें व बंधुप्रेमानें द्रवलें; आणि तो त्या पठाण स्वारांबरोबर दौडत आला, व त्यानें त्या दोन्ही पठाणांस ठार मारून आपल्या भावास सोडविलें !

---

* या स्वामिभक्तीबद्दल पुढें त्याच्या वंशजास हीं दोन्ही राजचिन्हें वापरण्याचा, दरबारांत राजाच्या उजव्या हातास बसण्याचा, व राजवाड्यापर्यंत नौबत वाजवीत जाण्याचा मान मिळाला.

सूक्त आपल्या सुटकेस आलेला पाहून प्रतापासही गहिंवर आला व दोघे बंधु प्रेमानें एकमेकांस कडकडून भेटले ! इतक्यांत चेतकास झीट येऊन तो पडला; व त्यावरील सामान काढून सूक्तानें दिलेल्या घोड्यावर घालतात तों त्या उमद्या घोड्यानें प्राण सोडला ! ज्या स्थलीं तो मेला त्या स्थलीं त्याच्या स्मरणार्थ प्रतापानें एक चबूतरा बांधला, तो **चेतक चबूतरा** या नांवानें प्रसिद्ध आहे.

---

## घडा ३१

# महाराणा प्रतापसिंह

### भाग २ रा

या प्रकारें ही हळदीघाटची लढाई संपली. या युद्धांत खुद्द राण्याचे पांचशें सगे रणांगणांत पडले. झालाच्या ठाकुराबरोबर त्याची दीडशें खाशी मंडळी पतन पावली ! याप्रमाणें रजपुतांची मोठी हानि झाली खरी, पण शत्रूचा नाश कांहीं थोडा झाला नव्हता. सेलीमास जय मिळाला, पण दुष्मनाचा पाठलाग करण्याची हिंमत त्याच्यांत राहिली नव्हती. त्यामुळें प्रतापास थोडा विसांवा सांपडला; व तितक्यांत कमळमेरच्या बचावाची तरतूद करून शत्रूशीं पुनः सामना देण्यास तो सज्ज झाला.

पाऊसकाळ संपतांच मोंगल पुनः चाल करून आले. त्यांनीं कमळमेरास वेढा घातला, तो बरेच दिवस चालला. पण पाण्याच्या टंचाईमुळें प्रतापास आपली राजधानी सोडून जावें लागलें, व त्याच्या मागें लवकरच कमळमेर मोंगलांच्या हातीं लागलें. पुढें त्यांनीं प्रतापाचा पाठलाग करण्यास सुरवात केली. शेवटीं त्यास अरवलीच्या डोंगरांतील झाडीचा आश्रय करावा लागला. तेथेंही शत्रूंनीं त्याची लगट केली. तेव्हां या रानांतून त्या रानांत, एका कपारींतून दुसऱ्या कपारींत जाऊन

त्यास आपला व आपल्या कुटुंबाचा बचाव करणें भाग पडे; व तृण-धान्यें व रानभाज्या यांवर उपजीविका करावी लागे. फक्त पावसाळ्यांत त्याला उसंत मिळे. तथापि असल्या हालअपेष्टांस न जुमानतां पुन: पुन: सवड करून शत्रूवर छापे घालण्यास तो चुकत नसे. असा क्रम वर्षानुवर्ष चालला. अकबराचें म्हणणें येवढेंच होतें कीं, "प्रतापानें मला शरण यावें; मग त्याचें त्यानें राज्य खुशाल करावें." पण प्रताप कसला कट्टा स्वदेशभक्त व अभिमानी पुरुष! "मी **बाप्पा रावळ**चा वंशज असून शत्रूपुढें मान वाकवूं कीं काय?" असें तो म्हणे! अशा बाण्यानें या स्वाभिमानी वीरानें वर्षेंचीं वर्षें रानावनांत हालअपेष्टेंत काढिलीं, पण तो शरण म्हणून गेला नाहीं. स्वदेशाची शत्रूपासून सुटका केल्याशि-वाय सोन्यारुप्याचीं भांडीं न वापरतां पानावर जेवण्याची, वाडे हवेल्यांत न राहतां झोंपड्यांत दिवस काढण्याची, व गाद्या रुजाम्यावर शयन न करितां गवताच्या चटयांवर गुजारा करण्याची प्रतिज्ञा त्यानें पूर्वींच केली होती, ती त्यानें यावज्जीव पाळिली. वरी, नागलीसारख्या तृणधान्याच्या पिठाच्या भाकरी त्याच्या राणीनें व सुनेनें भाजाव्या, पण त्याही स्वस्थ-पणें खाण्यास कधीं कधीं त्यास अवसर मिळूं नये! कधीं कधीं फाकेही पडावे, इतका मोंगलांनीं त्याचा पिच्छा पुरविला होता!

एके दिवशीं त्याची एक लहान मुलगी आपल्या भाकरीचें एक अर्ध दुपारीं खाऊन दुसरें संध्याकाळासाठीं ठेऊन देणार, तों तें एका रान-मांजरानें झडप घालून अर्धा कोस पळवून नेलें. झडपेबरोबर तिनें किंकाळी फोडली! राणा जवळच सचिंत बसला होता. ही आपल्या मुलीची किंकाळी त्याच्या हृदयास फार झोंबली; व त्याचें हृदय त्या प्रसंगीं कळवळलें. "लोकोत्तर पुरुषांचीं अंत:करणें वज्रापेक्षांही कठिण, व फुलापेक्षांही कोंवळीं असतात" असें जें एका कवीनें म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. प्राणावर गुदरलेलीं शेकडों संकटें व हालअपेष्टा या

राण्यानें शांतपणें सोसल्या पण आपल्या आवडत्या मुलीच्या दुःखाक्रोशानें एकदम त्याच्या चित्तास मोह पाडला ! आणि "या पोकळ राज्यपदांत काय अर्थ आहे ? मजपेक्षां रानांत राहणारे भिल्लही अधिक सुखी नाहींत काय ?" असें त्यास वाटूं लागलें ! त्या दुःखावेशांत त्यानें "मला जरा फुरसत द्यावी" अशा आशयाचें पत्र अकबरास लिहिलें !

हें पत्र वाचतांच अकबर फार खुश झाला, व तो भरदरबारांत म्हणाला "यावरून प्रताप लवकरच शरण येईल असें मला वाटतें." तेव्हां बहुतेक सरदारांस—रजपूतांसही—फार आनंद झाला. पण बिकानेरचा **पृथ्वीराज राठोड** यास मात्र वाईट वाटलें. त्यानें अकबरास अर्ज केला कीं, "सरकार, माफ करा; मला या पत्राचा संशय येतो. असें पत्र प्रतापाकडून येईल असें माझें मन घेत नाहीं; हें बहुधा बनावट असून त्याच्या कोणीतरी दुष्मनानें लिहिलें असावें. सरकार परवानगी देतील, तर मी खरा शोध आणवितों." अकबरानें हा अर्ज मंजूर केला. मग पृथ्वीराजानें प्रतापास एक दोहोऱ्यांचें पत्र लिहिलें. त्यांत असा भाव दर्शविला कीं "सर्व हिंदूंची, सर्व रजपुतांची मदार प्रतापावर आहे. बाकी सर्वांनीं आपला देश व अब्रू अकबरास विकलींच आहेत. पण प्रतापानेंही जर तसेंच केलें, तर मग हिंदूंची व रजपूतांची जी थोडीशी प्रतिष्ठा बाकी आहे तीही नाहींशी होणार ! असें करणें चितोडच्या राण्यास बरें वाटतें काय ?"

हें उत्तेजक पत्र वाचल्याबरोबर, दहा हजार लोकांच्या साहाय्यानें हुरूप यावा तसा हुरूप प्रतापसिंहास आला ! यामुळें मेवाडची आशा सोडून सिंध प्रांतांत स्वतंत्र राज्य स्थापण्याचे जे विचार अलीकडे त्याच्या मनांत घोळत असत ते पार विरघळून गेले. याच संधीस त्याचा वंशपरंपरागत दिवाण जो **भामाशहा** यानें आपला वडिलोपा-

र्जित द्रव्यसंग्रह त्याच्या स्वाधीन केला. ही कुमक इतकी मोठी होती कीं, तिनें पंचवीस हजार सैन्याचें बारा वर्षें पोषण व्हावें ! ह्या अकस्मात घडून आलेल्या गोष्टींनीं प्रतापची हिंमत दुप्पट वाढली. त्यानें झपाट्यानें देवेर येथील मोंगल लोकांवर हल्ला केला, व लढाईंत त्यांचा चांगला फन्ना उडविला. या गर्दींतून मोंगल सावध होतात न होतात, तों त्यानें कमळमेरही काबीज केलें. फक्त चितोड, अजमेर, व मंगळगड एवढीं ठाणीं खेरीज करून सर्व मेवाडप्रांत लवकरच त्याच्या ताब्यांत आला. लगेच राजा मानसिंग ह्यास त्याच्या प्रतिज्ञेची आठवण देण्याकरितांच कीं काय, त्यानें त्याच्या संस्थानावर स्वारी करून मालपुरा म्हणून त्याचें व्यापाराचें मोठें ठिकाण होतें तें लुटून फस्त केलें.

यापुढें प्रतापसिंहाचे दिवस कांहींसे स्वस्थतेंत जाऊं लागले. पण त्याच्यासारख्या देशाभिमानी रजपुतास स्वस्थपणा कसा आवडावा ? चितोडगड अजून त्याच्या ताब्यांत आला नव्हता. आणि उदेपुरच्या घाटावरून तर त्या गडाचे तट व बुरूज नेहमीं डोळ्यांसमोर दिसत. ज्याच्या बचावासाठीं आपल्या पूर्वजांनीं आपल्या रक्ताचे पाट वाहवून आपल्या प्राणाच्या आहुति दिल्या, तो चितोडगड आपल्या हातीं कधीं येईल, असा त्यास ध्यास लागला होता. या काळजीनें व तारुण्यांत भोगलेल्या कष्टानें लवकरच त्याची प्रकृति खंगत चालली. त्याच्या पराक्रमाला यशाची भरती नुकती कोठें येऊं लागली होती, अशा वेळीं तो मृत्युपंथास लागला. पण त्याचा प्राण जाईना ! त्याची तंद्री चितोडकडे लागली होती. त्याचे जिवलग सोबती त्याच्या झोंपडींत जमून ही त्याची तळमळ पाहून अस्वस्थ झाले. शेवटीं साळुंब्र्याच्या ठाकुरानें प्रश्न केला, "राणाजी, आपणास आतां कोणत्या कारणानें क्लेश होत आहेत ? आपण सुखानें व शांततेनें कां प्रयाण करीत नाहीं ? " प्रतापानें सावरून उत्तर केलें, " चितोडकडे पहा, मी तर आतां जातोंच; पण

आपला देश तुर्कांच्या हातीं जाऊं देणार नाहीं असें जर मला कोणी आश्वासन देईल, तर मी सुखासमाधानानें प्राण सोडीन ! पण मला असें वाटतें कीं आमचे चिरंजीव, व त्यांचें पाहून तुम्ही सर्व सरदार, या झोंपडयांच्या ठिकाणीं मोठमोठया हवेल्या उठवून त्यांत आपले दिवस खुशालचंदींत घालवाल; व ज्याच्या स्वतंत्रतेसाठीं तुम्हीं आम्हीं आज इतकीं वर्षें जिवापाड मेहनत केली, व ज्याच्यासाठीं प्राणही देण्यास मागें पुढें पाहिलें नाहीं, तो हा देश तुम्ही तुर्कांच्या हातीं द्याल ! ही गोष्ट मनांत येऊन फार क्लेश होत आहेत ! " हें भाषण ऐकून सर्व सरदारांना फार गहिंवर आला व त्यांनीं प्रतिज्ञापूर्वक सांगितलें कीं "आम्हीं आपल्या देशाचें स्वातंत्र्य मिळवीपर्यंत हवेल्या बांधणार नाहीं, व कोणत्याही प्रकारची चैन करणार नाहीं ! व युवराज **अमरसिंह** याजबद्दलही आम्ही तशीच हमी घेतों. आपण बिलकुल चिंता करूं नये. " हे शब्द ऐकून प्रतापाचें समाधान झालें व त्यानें सुखानें प्राण सोडला ( इ. स. १५९७ ).

धन्य त्या प्रतापसिंहाची, कीं ज्याची अजरामर कीर्ति हिंदूंनींच काय, पण त्याचे कट्टे शत्रू जे मोंगल त्यांनींही प्रांजलपणें गाइली आहे !

रा. ब. **का. ना. साने** यांच्या " चित्रमयजगत् "
या मासिकांतील लेखावरून थोडा संक्षेप करून.

---

## धडा ३२

# नैनीताल

पर्वतराज हिमालयाच्या पायथ्याशीं असलेलीं अनेक थंड व सृष्टिसौंदर्ययुक्त ठिकाणें गेल्या शंभर वर्षांत इंग्रज सरकारनें शोधून काढून त्या जागीं वस्ती वसविली आहे. अशा ठिकाणांत **नैनीताल** हें अनेक दृष्टींनीं फार रमणीय व चित्ताकर्षक असल्यामुळें त्याचें त्रोटक वर्णन खालीं दिलें आहे.

नैनीताल हें हिमालयाच्या पायथ्याशीं वसलेलें आहे असें म्हटलें खरें; परंतु हिमालयाच्या उंचीच्या मानानें जरी तें पायथ्याशीं असलें, तरी समुद्राच्या सपाटीपासून तें सहा हजार फुटांवर उंच आहे. आपल्या मध्यप्रांतांतील थंड हवेचीं ठिकाणें--**पचमढी** व **चिखलदरा** हीं फार तर तीन साडेतीन हजार फूट उंच आहेत. यावरून नैनीतालच्या उंचीचा व तेथील थंड हवेचा बराचसा अंदाज येईल.

नैनीताल हें ठिकाण संयुक्त प्रांताच्या हद्दींत आहे. मुरादाबादपासून काथगोदामपर्यंत रेलवेनें जाऊन पुढील प्रवास तांग्यानें किंवा एक्क्यानें करावा लागतो. संयुक्तप्रांत हा गंगा व यमुना या दोन नद्या व त्यांना मिळणाऱ्या अनेक लहानमोठ्या नद्या यांच्या उतरणीवरील विस्तीर्ण मैदानांत वसला आहे हें प्रसिद्धच आहे. पण प्रत्यक्ष पाहीपर्यंत त्या प्रांताच्या सपाटीची आपणास फारशी कल्पना यावयाची नाहीं. आपल्या महाराष्ट्र देशांत असा प्रदेश क्वचितच दिसतो; व तो इतका विस्तीर्णही नसतो; जिकडे दृष्टि फेंकावी तिकडे सपाट मैदानच मैदान; कोठें उंच-वटा किंवा टेकडी म्हणून दिसावयाचीच नाहीं. मधून मधून कालवे मात्र पुष्कळ दृष्टीस पडतात. पण रेलवेनें काशीपुरपर्यंत गेलें म्हणजे पुढें हा देखावा बदलण्यास सुरवात होते. प्रथम गर्द झाडींतून प्रवास होऊं लागतो; हिमालयाच्या पायथ्याच्या पहिल्या हिरव्या गार टेंकड्या अगदीं समोर दिसूं लागतात; व त्या टेंकड्यांना लागून एका स्फटिका-प्रमाणें शुभ्र अशा नदीचें रुंद पात्र आपणास दिसूं लागतें. वरच्या बाजूस हिरवें गार रान, त्याच्या पायथ्याशीं पांढऱ्या शुभ्र दगडांनीं भर-लेली नदी—हा देखावा फारच आश्चर्यकारक भासतो. या नदीचें नांव "गोला" नदी. काथगोदाम याच नदीच्या किनाऱ्याला आहे. हा देखावा म्हणजे नैनीताल व हिमालय या सृष्टिसौंदर्याच्या आगरांचें प्रसादचिन्हच असें वाटतें.

काथगोदामपासून बीरभट्टीपर्यंत तांगे किंवा एक्के जातात. पुढें सामानाच्या गाड्या जाण्यास नऊ मैलपर्यंत रस्ता आहे. पण त्यानें माणसें जात नाहींत. माणसें पायीं, घोड्यावर किंवा दांडीनें जातात. दांडी हें एक माणसांनीं नेण्याचें सोईस्कर वाहन आहे. बीरभट्टीपासून नैनीताल तास दीडतासांत येतें.

महाबळेश्वर, सिमला, किंवा आपल्या प्रांतांतील पचमढी, वगैरे थंड हवेचीं ठिकाणें, व नैनीताल यांत एक मोठा फरक आहे. वरील ठिकाणें डोंगरावरील पठारावर आहेत, पण नैनीताल हें शहर दोन टेकड्यांच्या उतारावर वसलेलें आहे. यामुळें शहरच्या कोणत्याही ठिकाणीं उभें राहिलें तरी तेथून सर्व पर्वतांची व शहराची शोभा पहावयास मिळते. येथें म्हणण्यासारखी सपाट जागा नाहींच. घरें व बंगले हे एकाच्या डोकीवर दुसरा असे आहेत. यामुळें शहरांत या बंगाल्यावरून त्या बंगाल्यावर जाणें झाल्यास वाहन दांडी हेंच होय. येथें एकही गाडी किंवा बायसिकल दृष्टीस पडावयाची नाहीं. कारण सपाट रस्तेच नाहींत.

नैनीतालची विशेष गोष्ट म्हटली म्हणजे येथला तलाव किंवा सरोवर होय. तलावावरूनच या शहराला हें नांव मिळालें आहे. “ नैना देवीचा तलाव ” हा या शब्दाचा अर्थ आहे. हा तलाव म्हणजे खरोखरी या ठिकाणाचें एक अद्वितीय भूषण होय. पूर्व पश्चिम जाणाऱ्या दोन समांतर टेकड्यांच्या मिलाफानें हा तलाव बनला आहे. नैनीतालची सर्व वस्ती या तलावासभोंवार टेंकड्यांच्या उतारावर दक्षिणोत्तर आहे. तलावाचा पृष्ठभाग समुद्राच्या पृष्ठभागापासून ६३५० फूट उंच आहे. व सभोंवार टेकड्यांची उंची सरासरी १००० फूट आहे. अर्थात् येथील बंगले ६५०० फुटांपेक्षां जास्त उंचीवर आहेत असें झालें. तलाव लंबवर्तुळाकार आहे. परंतु तलावाच्या मधोमध एका टेंकडीचा भाग बराच पुढें आल्यामुळें या ठिकाणीं तलावाची रुंदी बरीच कमी होऊन त्याला

दोन डोळ्यांचा किंवा डोळ्यांवर घालण्याच्या आरशीचा आकार आला आहे असें म्हटलें तरी शोभेल. सर्व तलावाभोंवतीं एक सुंदर रस्ता आहे. या रस्त्यानें तलावाभोंवतीं प्रदक्षिणा केली म्हणजे सर्व शहराची निरनिराळ्या ठिकाणाहून निरनिराळी शोभा दिसते. लोकांचा सहल करण्याचा हाच एक रस्ता होय. बाकी कोठेंही चार पावलेंसुद्धां सपाट रस्ता नाहीं; सारखी चढउतर आहे. यामुळें संध्याकाळीं येथें बरीच गर्दी असते. व त्या वेळचा देखावा फारच प्रेक्षणीय असतो.

या सुंदर तलावाचा व्यायामप्रिय युरोपियन लोकांनीं नौकाक्रीडे-करितां उपयोग करून घ्यावा हें अगदीं साहजिक आहे. येथें अनेक बोटक्लब आहेत. व सकाळ संध्याकाळ पुष्कळ लोक बोटी वल्हवीत आनंदानें व्यायाम घेतांना दिसतात. संध्याकाळीं मासे पकडण्यांतही पुष्कळ लोक गुंतलेले दृष्टीस पडतात.

उत्तरेकडील टेकडीकडून आल्मोऱ्याला जाण्याचा रस्ता आहे व या रस्त्यानें जरा पुढें गेलें म्हणजे खालीं काथगोदमपर्यंतची अवर्णनीय शोभा दिसते. डोंगरांच्या सारख्या रांगाच्या रांगा अगदीं सपाटीपर्यंत गेलेल्या दिसतात, व त्यावरून आपण किती उंच ठिकाणीं उभे आहों याची कल्पना येते. येथील दुसरी प्रेक्षणीय गोष्ट म्हटली म्हणजे "शिपाई धारा" ही होय. हा एक उत्तम पाण्याचा झरा आहे. या झऱ्याच्या धारा मुसळधारांसारख्या वाहतांना दृष्टीस पडतात. व पाणी स्फटिकासारखें स्वच्छ व निर्मळ असून बर्फासारखें थंड आहे. व मधुर तर इतकें आहे कीं, तें प्यालें म्हणजे कल्पनातीत आनंद होतो. हें पाणी बारा महिने तेरा काळ सारखें वहात असतें, व पुष्कळ लोक पिण्यास हेंच वापरतात. हें पाणी खालीं सर्व रस्त्याच्या बाजूनें खेळविलें आहे; यामुळें घाटाच्या सर्व रस्त्यावर फारच कमी खर्चानें पाणी शिंपडतां येतें. बीरभट्टीहून चढून दमून मनुष्य वर येतांच त्याला या झऱ्याचें दर्शन

होतें व गायमुखांतील तें अमृततुल्य पाणी प्याल्याबरोबर सर्व थकवा नाहींसा होऊन माणूस ताजातवाना होतो.

परंतु नैनीताल येथील सर्वांत प्रेक्षणीय स्थळ म्हटलें म्हणजे **चायना पीक** ( चिनी टेकडी ) हें होय. हें नैनीतालच्या उत्तरेस आहे व त्याची उंची समुद्रसपाटीपासून ८५६८ फूट आहे. या ठिकाणीं जाण्याचा रस्ता तलावाच्या पूर्वेकडील टोंकापासून निघतो, व तो सारखा चढत चढत जातो. व जसजसें आपण वर जावें तसतसा तलावाचा व शहराचा देखावा प्रतिक्षणीं कांहीं निराळाच दिसूं लागतो. चढ एकंदरीनें बराच कठिण आहे; व रस्ता कांहीं ठिकाणीं दोन मनुष्यें जातील इतकाच रुंद आहे. एका बाजूला उंच व सुळक्यासारखें टेंकाड, तर दुसऱ्या बाजूला भयंकर खोल दरी, असाच बहुतेक हा मार्ग आहे. इकडे रानही फार दाट आहे व वृक्ष खरोखरच गगनचुंबी आहेत कीं काय असें भासतें. टेंकडीवर पोंचल्यावर थंडी फार वाजते; येथें वाराही फार वाहत असतो. यामुळें माणसांस अगदीं हुडहुडी भरते. येथें बरेच वेळां धुकें इतकें पडतें कीं भोवतालीं सर्व समुद्र असून आपण मध्यें एका बेटावर आहों कीं काय असा भास होतो. येथें एक विलक्षण अनुभव येतो तो हा कीं, आपण फार उंचावर उभे असल्यामुळें धुकें व ढग आपल्या पायांखालीं आहेत असें दिसतें, व धुक्याचे लोटच्या लोट दरींतून बाहेर पडतांना अवर्णनीय शोभा दिसते. या वरचेवर बाहेर पडणाऱ्या धुक्याच्या लोटांनीं क्षणार्धांत सर्व नैनीताल स्पष्ट दिसतें, तर पुनः क्षणार्धांत तें अदृश्य होतें! प्रत्यक्ष हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखरांचें येथून दर्शन होतें; व त्या नगाधिराजाच्या प्रचंडतेची, भव्यतेची, व त्यावरील सृष्टिसौंदर्याची बरीच स्पष्ट कल्पना येते. एकीकडे दृष्टी फेंकावी तर स्फटिकासारख्या शुभ्र बर्फमय हिमालयाची रांगच्या रांग दृग्गोचर होते; तों दुसरीकडे हिरव्यागार गर्द झाडीनें अच्छादिलेले पर्वत

दृष्टीस पडतात. एकीकडे भयंकर खोल दरी, तर दुसरीकडे उघडा बोडका एकच सुळका; एकीकडे पहाडांमधून नागमोडीप्रमाणें वहाणारी नदी, तर दुसरीकडे अगदीं दूर सपाट मैदान, असे जे भिन्न भिन्न देखावे दिसतात त्यांचें खरोखर शब्दांनीं वर्णन करतां येण्यासारखें नाहीं!

नैनीताल हें जिल्ह्याचें मुख्य ठाणें असून संयुक्तप्रांताच्या सरकारचें उन्हाळ्यांतील हवा खाण्याचें ठिकाण असल्यामुळें येथें बाराही महिने वस्ती असते. हें ठिकाण व इतर थंड हवेचीं ठिकाणें यांत मोठा महत्वाचा फरक हाच आहे. इतर ठिकाणें फक्त उन्हाळ्यांत गजबजलेलीं व पावसाळ्यांत व थंडींत अगदीं शुष्कच असतात. तसें नैनीतालचें नाहीं. यामुळें येथील वस्ती एकाद्या लहानशा शहराप्रमाणें वसलेली आहे. मात्र वस्ती जास्त वाढावयाची सोयच नाहीं. कारण एकंदर ठिकाण स्वाभाविक चतु:सीमांनीं मर्यादित झालेलें आहे, हें वरील वर्णनावरून कळून आलेंच असेल.

नैनीताल जिल्हा ज्या भागांत आहे तो कमाऊन भाग नेपाळच्या लढाईनंतर ( १८१५ ) इंग्रज सरकारकडे आला. इ. स. १८३९ पर्यंत तें एक जंगली व बिनवस्तीचें ठिकाण होतें. शेजारच्या खेडयापाडयांतील धनगर गुरांना पाणी पाजण्याकरितां कधीं कधीं नैनीतलावावर येत असत. पण तेथें भुतेंखेतें आहेत अशी त्यांची समजूत होती. १८३९ सालीं मि. **बॅटन** नांवाचे एक साहेब आपले मेहुणे मि. बॅरन यांना घेऊन शिकार करीत असतां त्यांनीं हें सुंदर स्थळ पाहिलें. व लगेच वर्तमानपत्रांतून त्याचें वर्णन प्रसिद्ध केलें. १८४१ पासून तेथें थोडी वस्ती होण्यास सुरवात झाली. इ. स. १८५७ सालपर्यंत थंड हवेचें ठिकाण म्हणून याची बरीच प्रसिद्धि झाली होती, व त्या सालच्या बंडाच्या धामधुमींत बऱ्याच युरोपियन लोकांना तेथें आश्रय मिळाला होता. पुढें लौकरच हें संयुक्त प्रांताच्या गव्हर्नरांचें उन्हाळ्यांतील वसतिस्थान झालें, व तेव्हांपासून त्याची सारखी भरभराट होत आहे.

हें वर्णन संपविण्यापूर्वीं एका महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. इकडील पर्वतांच्या टेंकड्या फार ठिसूळ अशा दगडांच्या बनलेल्या आहेत. सह्याद्रीच्या खडकासारखा काळा भोर कठिण खडक इकडे मुळींच नाहीं. सर्व खडक पांढरा व मुरमासारखा भुसभुशीत आहे, व कांहीं ठिकाणीं तर स्लेटीच्या दगडासारखा पत्र्यापत्र्याचा झालेला आहे, व थरांथरांमधून माती आहे. या कारणानें येथें पावसाळ्यांत पाणी खडकांत मुरतें, व असें पुष्कळ पाणी मुरलें कीं कडेच्या कडे कोसळून पडतात. अशा प्रकारची **कडेकोसळ** किंवा **धरकोसळ** या टेकड्यांवरून पुष्कळ वेळां झालेली आहे. व तिनें कित्येक वेळ प्राणहानीही बरीच झालेली आहे. सन १८८० सालीं एक प्रचंड धरकोसळ होऊन कित्येक बंगले ढासळून पडले, व सुमारें दीडशें माणसें दगावलीं ! परंतु सरकारनें शक्य तितकी सुरक्षितता आणण्याकरितां हल्लीं ठिकठिकाणीं संरक्षक बांधकामें केलीं आहेत; पावसाचें पाणी भर्रकन् निघून जाण्याच्या सोई जागोजाग केल्या आहेत. सर्व रस्त्यावर देखरेखीला माणसें ठेवलेलीं असतात. त्यामुळें अपायकारक धोका होण्याचा संभव आतां बराच कमी झाला आहे, व म्हणून या रमणीय व थंड ठिकाणचें दर्शन घेणें फार सुखाचें झालें आहे.

**प्रो. गो. चि. भाटे** यांच्या "**माझा उत्तर हिंदुस्थानांतील प्रवास**" वरून
थोडा फेरफार करून.

---

## धडा ३३

# धेनुहरणप्रयत्न

### गीति

पार्थ म्हणे तो कोण ब्रम्हर्षि असे ? मनोरमहि म्यां तें ।
तद्यश नसे परिशिलें; सांग सख्या तूं तदीय महिम्यातें ॥ १ ॥

गंधर्व म्हणे, होता कुशिकतनुज गाधि कान्यकुब्जपती ।
तत्सुत विश्वामित्र प्रभु, यत्सेवेसि नृप सदा जपती ॥ २ ॥
सबळ सचिव तो भूपति मृगया करितां वनीं बहु श्रमला ।
दैवें वसिष्ठमुनिचें पुण्याश्रमपद विलोकितां रमला. ॥ ३ ॥
स्वपदनतगाधिजातें सत्कारुनि मुनि म्हणे, अगा राया, ।
जावें न क्षुधितें त्वां येउनियां आमुच्या अगारा या ॥ ४ ॥
वाल्मीकिच्या जन जसा तृप्तिस पावे कुळासकट कवनीं ।
मुनिच्या उटजीं तैसा तो गाधिजभूपही सकटक वनीं ॥ ५ ॥
नृपति म्हणे कोठुनि हें आलें साहित्य जेवणा रानीं ।
अस्मद्गृहींहि न कधीं वरिली हे तृप्ति जेवणारांनीं ॥ ६ ॥
जें न नृपप्रासादें तें मुनिच्या भुक्तिसुख दिलें उटजें ।
हें मोठें नवल अहो, लाजविला पारिजात कीं कुटजें ! ॥ ७ ॥
वल्कलरुद्राक्षधर ब्राह्मण अकृतान्ययत्न हा रानीं ।
बळ पूजिलें कसें हो, बहुमूल्य दुकूलरत्नहारांनीं ॥ ८ ॥
करितां शोध कळे कीं, उटजीं सुरधेनु नंदिनी आहे; ।
पाहे तीस, नृप म्हणे मग मुनिला, "गाय मागतों द्या हे. ॥९॥
अर्बुद गाई देतों, अथवा देतों स्वराज्य भोगाया ।
दे गाय, काय विनिमय हा भवदर्थोन ? मान्य हो गा या"॥ १०॥
मुनिवर म्हणे " नृपा हें वचन तुझें मन्मनासि कंपा दे; ।
या धेनुबळें माझा हा आश्रमधर्म सांग संपादे ॥ ११ ॥
कोण ज्ञाता राज्य स्वीकार करील आधि ज्यामाजी ।
मागों नको न देया हेया हे धेनु गाधिजा माजी." ॥१२॥
विश्वामित्र म्हणे "मी क्षत्रिय आधार जाण तेजाचा ।
आज्ञामानसभंग न करिती भद्रेच्छु जाणते ज्याचा ॥१३॥

स्वाध्याय तुझें बळ, तूं ब्राह्मण, कैचें असह्य तेज तुला ? ।
पिप्पलजत्व सम असो, दहनीं तेजस्विता न ते जतुला ॥१४॥
मानधनप्रभु मी जें वदलों कर्तव्य तें करीन खरें ।
ऐसा कोण प्राणी ज्यातें न करील वश हरी नखरें?" ॥ १५ ॥
भगवान् वदे, " बळी तूं तुझिया चतुरंग सैन्य सांगातें ।
तुज कर्तव्य असे जें सिद्ध न करिसी अभीष्ट कां गा तें?" ॥१६॥
कौशिक अनुगांसि म्हणे, "सोडा हो धेनु ही चला हाका; ।
हा काय रत्नभोक्ता ? मारू अनुताप पावुनी हाका !" ॥१७॥
दंडें ताडुनि नेतां फोडी ती धेनु फार हंबरडे ।
तेव्हां आश्रमवासी द्विजमृगखगदेवताकदंब रडे ॥ १८ ॥
नेतां बळेंचि धांवत येउनि ती मुनिपुढें उभी राहे; ।
आणूनि लोचनीं जळ, बहुदीनत्वें मुखाकडे पाहे. ॥ १९ ॥
धेनु म्हणे "स्वामी त्वां पालन केलें करी न बाप तसें ।
कां मज उपेक्षिलें हो? मी खळदंडें उदंड तापतसें" ॥२०॥
साधु म्हणे, "मज हृदयीं शांत, तुज बाहेर हे कशा लागे ।
मी ब्राह्मण क्षमावान्, माते रडतीस तूं कशाला गे ?॥२१॥
क्षत्रियतेज असे हें, जें तुजला पीडितें कशापातें; ।
मत्तेजक्षांति मला म्हणति, अहाहा, न ओक शापातें ॥ २२॥
मन्मतिदरींत न शिरे कोप मतंगज विवेक हरि जागे ।
म्यां न त्यजितां नेतो भूप बळें, तुज रुचेल तरि जा गे" ॥२३॥
गाय म्हणे, "भगवंता आज्ञा नसतां तुझी न मद्धरणीं ।
काळहि बळी, किती हा? न तृणबळें वन्हि होय बद्ध रणीं" ॥२४॥
विप्र म्हणे, "नेला कीं दृढ बद्ध करूनि वत्स दाव्यानें ।
स्वबळें नृपें, मदाश्रम देह तसा व्यापिला सदा व्यानें ॥ २५॥

शक्य असेल तरि रहा," ऐसें मुनि बोलतांचि ती क्षोभे ।
ग्रीष्मगमध्यान्हार्कप्रतिम तिचा देह तेधवां शोभे ॥ २६ ॥
धेनुमिषें त्या मुनिची सुतपस्यासिद्धि कोपली वाटे ।
फाटे गाधिजबळतम त्या चपळेच्या धरूनियां वाटे ॥ २७ ॥
अंगापासुनि केले प्रकट तिनें म्लेंच्छ यवन शबर शक ।
बळ उडविलें तिहीं, खगपतिपक्षांहीं जसें सहज मशक ॥ २८ ॥
जेविं दिगंताप्रति ने तिमिरा तूळा रविप्रभा वात्या ।
सेना तसी नृपबळा, निस्तुळ म्हणती कवि प्रभावा त्या ॥
"पकडो लियो हकालो बे बिसवामितर भाग जावेगा" ।
यवन म्हणति, दाखविती शब्दीं हरि करिवरासि ज्या वेगा ॥३०॥
मागें पाहों न दिलें, तीं बारा कोस पळविलीं कटकें ।
यश हारविलें, तेथें किति शस्त्रें हार कुंडलें कटकें ? ॥ ३१ ॥

**मोरोपंत**

---

## धडा ३४

# भूकंप व ज्वालामुखी पर्वत

आपल्या ह्या एरव्हीं शांत दिसणाऱ्या, व धन, धान्य, पाणी वगैरे पदार्थ देऊन आपलें रक्षण करणाऱ्या पृथ्वीमातेच्या उदरांत क्षणार्धांत अनेक जीवांचा संहार करतां येण्याची सामग्रीही किति विपुल आहे याची प्रतीति आपणास भूकंप व ज्वालामुखी पर्वत फार चांगली देतात.

भूकंप म्हणजे जमिनीला बसलेला हादरा किंवा धक्का. सृष्टींत जे मोठे भयंकर व अनर्थकारक उत्पात होतात त्यांतच भूकंपाची गणना केली पाहिजे. भूकंप होतो म्हणजे काय होतें, व त्यानें केवढाले अनर्थ ओढवतात, याची खरी कल्पना ते प्रत्यक्ष अनुभविल्याखेरीज यावयाची

नाहीं; ( आणि ती आमच्या वाचकांस कधीं न येवो अशीच आमची इच्छा आहे. ) तथापि खालील वर्णनावरून थोडी बहुत कल्पना येईल म्हणून तें दिलें आहे.

यूरोपांत पोर्तुगाल देशाची राजधानी लिस्बन नांवाचें शहर आहे. तेथें वारंवार भूकंप होतात. पण त्यांत इ. स. १७५५ सालीं जो भूकंप झाला, त्याची सर दुसऱ्यास येणें नाहीं. त्या वर्षाच्या नवंबर महिन्याच्या पहिल्या तारखेस एकाएकीं सर्वांस मोठा धक्का बसला. तो एक पळ-



भरही टिकला नसेल; पण तेवढ्यानें तेथील राजवाडा, मोठमोठीं घरें व देवळें हीं पार जमीनदोस्त होऊन गेलीं. असें सांगतात कीं, या वेळीं शहरांतील तीन चतुर्थांश घरें पडून अदमासें बत्तीस हजार लोक चिरडून मेले. तो दिवस सणाचा होता म्हणून देवळांतून हजारों लोक प्रार्थनेसाठीं गोळा झाले होते. इतक्यांत हा धक्का बसला, व त्यानें घुमटासुद्धां देवळें ढांसळलीं. मग त्या वेळीं जो हाहाकार झाला असेल तो काय वर्णावा? पहिल्या धक्क्यामागून पुनः लागलेच दुसरे दोन धक्के बसले,

ते दहापंधरा पळांपर्यंत बसत होते. आणखी असें झालें कीं, शहरांत तीन ठिकाणीं मोठी आग लागली, व तिनें राहिलेल्या घरांचा फडशा पाडला. हें होतच आहे इतक्यांत समुद्राला इतकी मोठी भरती आली कीं, नित्यापेक्षां पाणी सुमारें बावीस हात उंच वाढलें. व त्यानेंही शहरांतील कित्येक घरें वाहून गेलीं. एका घटकेच्या आंत याप्रमाणें साठ-हजार पर्यंत माणसें प्राणास मुकलीं !

इटली देशांत कालेब्रिया म्हणून जो प्रांत आहे, तेथें इ. स. १७८३ सालीं जो भूकंप झाला, त्यानें त्या देशाच्या भूमीचा फार चमत्कारिक फेरफार झाला. १७८३ ते १७८६ सालापर्यंत हे धक्के मधून मधून बसतच होते. सर्वांत आपीनाइन्स म्हणून जो पर्वत आहे त्याच्या दक्षिण-टोंकाजवळ फार मोठे धक्के बसले. ह्या डोंगराच्या पायथ्याशीं व वर जीं शहरें, खेडीं, व शेतकऱ्यांचीं घरें होतीं, तीं सारीं पहिल्याच धक्क्यानें पडून मोकळीं झालीं. जमीन सारखी हादरत होती. या वेळेस पाऊस फार मोठा पडला, विजा फार झाल्या, व वारा फार जोराचा सुटला. किती एक टेंकडया खचल्या, व कितीएक जमिनीबरोबर झाल्या. मैदानामध्यें कोठें कोठें इतक्या मोठ्या व रुंद भेगा पडल्या कीं, त्यामुळें तेथला रस्ता बंद झाला. मोठे उंच पर्वत आंतल्या आंत खचून जाऊन त्यांत खिंडी पडल्या. त्यांतील कांहीं खिंडी पुनः तेथलेच दोहोंबाजूंचे दगड माती ढासळून भरल्या. पुष्कळ नद्यांचे ओघ फिरले, व जेथें पूर्वीं सुकी जागा होती तेथें नवे झरे उत्पन्न झाले !

इ. स. १८१९ सालीं भूकंपानें आपल्या हिंदुस्थानांतील कच्छ भूज प्रदेशांत सिंधु नदीच्या मुखाजवळ एक शहर होतें तें, आणि त्या सभोंवतालच्या जमिनीचा प्रदेश एकदम खचून जाऊन त्या ठिकाणीं मोठें सरोवर झालें !

याप्रमाणें भूकंपानें मनुष्यें व इतर प्राणी यांचा नाशच होतो असें नव्हे, तर उंच जमीन असेल तेथें नीच व नीच असेल तेथें उंच अशी विल-

क्षण उलथापालथ होऊन पृथ्वीच्या पृष्ठभागाचें रूप, एका अर्ध्या घटकेंत, ओळखूं न येण्याइतकें बदलून जातें.

असें कां होतें याचें कारण शोधण्यापूर्वी या उत्पाताचा सख्खा भाऊच कीं काय असा जो ज्वालामुखीचा स्फोट, त्याची थोडीशी माहिती असणें जरूर आहे, म्हणून तिकडे वळूं.

---

## धडा ३५

# भूकंप व ज्वालामुखी

### भाग २ रा

ज्वालामुखी पर्वत म्हणजे ज्यांतून आगीच्या ज्वाला निघत आहेत, असा पर्वत. असे पर्वत पृथ्वीवर अदमासें चारशें आहेत. त्यांपैकीं सुमारें सवादोनशें जागृत अवस्थेंत आहेत, व ते राहून राहून पेट घेतात. पासिफिक महासागराच्या विशाल पात्रास दोहोंबाजूंनीं जणुं कांहीं या ज्वालामुखी पर्वतांनीं वेढून टाकलें आहे. जगांतील सर्व ज्वालामुखींपैकीं नववा हिस्सा इतर भागांत, व बाकी सर्व पासिफिक महासागराच्या कांठाशीं अगर पात्राच्या मध्यें असलेल्या बेटांत आहेत. सर्वांत उंच ज्वालामुखी दक्षिण अमेरिकेंतील आंडीज पर्वतांत किटो शहराजवळ **कोटोपाक्सी** या नांवाचा आहे. त्याची उंची १९००० फूट आहे. याशिवाय हवाई बेटांतील **मौनालोवा,** जावा बेटांतील **क्राकाटोआ, पापडयंग,** व इटली देशांतील **व्हेसुव्हियस,** हे ज्वालामुखीही फार प्रसिद्ध आहेत. नमुन्यादाखल यांपैकीं एकदोन ज्वालामुखींच्या स्फोटाचें वर्णन खालीं दिलें आहे.

इ. स. १८८३ सालीं जावा बेटांत खालील प्रकार घडला. प्रथम भूकंपाचे धक्के अनुभवास येऊं लागले; ते चालू असतां मेघगर्जनेप्रमाणें भयंकर गर्जना होत होत्या, व पृथ्वीच्या पोटांत कांहीं विलक्षण घडामोड सुरू आहे असें भासत होतें. हे भूकंपाचे धक्के भोंवतालीं शंभर

मैलांपर्यंत अनुभवास आले. नंतर **क्राकाटोआ** नांवाच्या ज्वालामुखीचें—आतांपर्यंत शांत असलेलें—तोंड उघडून त्यांतून राखेचे व धुराचे लोट एकाएकीं सोसाट्यानें निघूं लागले; व तापून लाल झालेल्या दगडांची वृष्टि होण्यास आरंभ झाला. कांहीं वेळानें आणखी पंधरा सोळा ज्वालामुखीं-नींहि आपले जबडे उघडले व अग्निप्रळयाचा भयंकर खेळ सुरू झाला. पहिल्या दोन रात्रीं तांबड्या लाल तेज:पुंज धूमराशींनीं आकाश कित्येक मैलपर्यंत आच्छादिलेलें दिसे. तिसरे दिवशीं हवेंत इतकी राख व धूर भरून गेलीं कीं, भरदिवसा अमावास्येच्या मध्यरात्रीप्रमाणें, तीस मैलपर्यंत अंधकार पडला होता. समुद्रावर इतकी राख सांचली कीं, भोंवतालच्या पन्नास मैलांच्या टापूंत अदमासें पंधरा फूट जाडीचा तिचा थर बनला; व जहाजांस पुढें सुमारें महिनाभर त्या राखेंतून आपला मार्ग काढावा लागला.

आणखी दोनतीन दिवसांनीं **पापडयंग** नांवाच्या थोरल्या ज्वाला-मुखीनें पेट घेतला. याला मदत करण्यासाठींच कीं काय, या दिवशीं तुफान वारा सुटला होता. त्यानें माणसें व जनावरें दूर झुगारल्याप्रमाणें उडून गेलीं, घरें पडलीं, व हजारों झाडें मोडून पडलीं. प्रथम ज्वाला-मुखीच्या पायथ्याशीं एक प्रकारच्या तांबडया लाल व रसरशीत उष्ण द्रवाचे लहानसे प्रवाह वाहूं लागले. परंतु लवकरच मोठा आवाज होऊन त्या पर्वताच्या शंकुसारख्या शिखराचे तुकडे तुकडे उडाले, व त्यामध्यें धग-धगीत व लाल रसाचें एक तळें बनलें. या तळ्यामधून चोहों बाजूंनीं हा रस वाहूं लागला. त्याचे लोंढ्यांत सांपडून कित्येक शहरें गडप होऊन गेलीं. या अग्निप्रळयानें सुमारें एक लाख माणसें व असंख्य पशुपक्षी नाश पावलीं असावीं, असें त्या वेळचें अनुमान आहे. या वेळीं भूकंपाचे धक्केही बसले हें वर सांगितलेंच आहे. त्यांपैकीं एक एवढा मोठा होता कीं, त्यानें संडाच्या सामुद्रधुनी जवळील रस्ते, पूल, वगैरे पार मोडून जमीनदोस्त झाले. समुद्र खवळून पर्वतप्राय लाटा येऊं लागल्या व त्यांनींही फार

नुकसान केलें. सर्व पंचमहाभूतेंच या वेळीं खवळलीं आहेत कीं काय असा भास झाला !

ज्वालामुखी हा **पर्वत** असतो असें वर म्हटलें आहे; व बहुतेक ज्वालामुखींच्या बाबतींत हें खरेंही आहे. पण प्रत्येक ज्वालामुखी पर्वतावरच असतो असा मात्र नियम नाहीं. पृथ्वीच्या पृष्ठभागावर कोठेंही तो असूं शकेल. वस्तुस्थिति अशी आहे कीं, ज्वालामुखीच्या तोंडांतून जो तांबडालाल व जळजळीत रस बाहेर पडतो तो त्याच्याच भोंवतालीं पसरतो, व त्याचे एकावर एक असे थर जमून, ते पुढें थंड व घट्ट झाले, म्हणजे त्यांची एक शंक्काकार टेंकडी तयार होते. वारंवार स्फोट होऊन तप्त शिलारसाचे थरावर थर जमून ते फिरून थंड झाले म्हणजे या टेकडीचा आकार व उंची हीं दोन्ही वाढत जातात, व पुढें त्यांचा एक डोंगर बनतो. एखाद्या साधारण टेंकडीप्रमाणें या टेंकडीच्या किंवा डोंगराच्या शेवटास निमुळतें होत गेलेलें शिखर मात्र नसतें. तर एक कुंडासारखा उघडा खळगा असतो. हेंच ज्वालामुखीचें **मुख** अथवा **द्वार** होय. व यांतूनच वर वर्णिलेला तप्त रस बाहेर पडतो. ज्वालामुखी ज्या वेळीं शांत असतो त्या वेळीं येथें नुसता खळगाच दिसतो. व केव्हां केव्हां तर अनेक वर्षेंपर्यंत शांतता राहिल्यामुळें, ह्या खळग्यांत पाणी सांचून त्याचें तळें बनतें किंवा तो एक सुपीक व वृक्षलतांनीं आच्छादलेला भूमिभाग होऊन बसतो.

आतां ज्वालामुखींतून जी राख, व तांबडा लाल रस बाहेर पडतो तो असतो तरी कशाचा? असा प्रश्न येणें साहजिक आहे. याचें उत्तर असें आहे कीं पृथ्वीच्या पाठीवर दगड, माती, धातू वगैरे जे पदार्थ घनावस्थेंत दिसतात त्याच जातीच्या पदार्थांचा हा रस असतो. अत्यंत उष्णतेनें सर्व पदार्थांस द्रवावस्थेंत नेतां येतें हें अनुभवसिद्ध आहे. आंतून येणारी राख व पातळ रस हीं येतात तेव्हां अत्यंत कढत असतात, व बाहेर येऊन थंड झालीं म्हणजे त्यांचे दगड बनतात. आपणाला परिचित

असलेले कित्येक दगड, ( उदाहरणार्थ सह्याद्रि पर्वतांत जो एक अत्यंत कठिण व काळाभोर दगड सांपडतो तो; ) अशाच प्रकारचा शिलाद्रव थंड व घन होऊन बनले आहेत असें शास्त्रज्ञांचें मत आहे.

ज्वालामुखीची राख अत्यंत हलकी असते व तिचे कण धुरळ्यांप्रमाणें सूक्ष्म असतात. यामुळें वाऱ्यानें ते कित्येक मैल लांब जाऊं शकतात. या राखेनेंसुद्धां केव्हां केव्हां शहरेंचीं शहरें गडप होतात असें म्हटलें तर खरेंसुद्धां वाटावयाचें नाहीं. परंतु सुमारें दोन हजार वर्षांपूर्वीं ( इ. स. ७९ ) इटली देशांतील **व्हेसुव्हियस** नामक ज्वालामुखी जेव्हां प्रज्वलित झाला होता, त्या वेळीं राखेचे जे लोट बाहेर पडले, त्यानें **पांपिया** व **हरक्यूलेनियम** हीं दोन मोठीं व भरभराटींत असलेलीं रोमन लोकांचीं शहरें व त्या भोंवतालचा बराच प्रदेश राखेंत बुडून गडप झाला. हा स्फोट होण्यापूर्वीं कित्येक शतकें तो पर्वत अगदीं शांत होता. त्याच्या वरल्या बाजूस कुंडासारखें दिसणारें एक विवर होतें खरें. पण त्यांत नाना प्रकारच्या वनस्पतींचें रान माजलेलें असून, त्यांत हिंस्र पशूंची वसतीही झालेली होती. यामुळें यांतून पुढें मागें अग्नीचा वर्षाव होईल असें स्वप्नही कोणास पडलें नव्हतें. पण जेव्हां कां एकदा स्फोट होऊन त्यांतून तप्त शिलाद्रवाचा व राखेचा वर्षाव सुरू झाला, तेव्हां तीं शहरें इतक्या जलद गाडलीं गेलीं कीं, मनुष्यांस व जनावरांस बाहेर पडण्यासही संधि मिळाली नाहीं. लोक जागच्या जागीं, ज्या अवस्थेंत होते तसे,—कोणीं श्रीमंत मिजासी रोमन चैनीनें पलंगावर पडला आहे, कोणी स्त्री वेष परिधान करीत आहे, कुत्रीं पुढच्या ओटींवर भुंकत आहेत, संत्री पहारा करीत आहेत, अशा स्थितींत—पुरले गेले !

पुढें सोळा सतरा शतकेंपर्यंत इतिहासांत या शहरांचें नुसतें नांव सांपडे, पण ठिकाण मात्र सांपडत नव्हतें. अलीकडे शोधक लोकांनीं हीं ठिकाणें शोधून, त्यांवरील माती, राख वगैरे खणून काढून या जुन्या

शहरांचे कित्येक भाग लोकांच्या दृष्टीस पडतील अशी तजवीज केली आहे. चमत्कार असा कीं या राखेच्या दडपणाखालीं पूर्वींचे कित्येक पदार्थ व माणसांचे सांगाडे अगदीं जशाचे तसे, ज्या स्थितींत वर राख पडली त्याच स्थितींत, पहावयास मिळाले! यामुळें प्राचीन रोमचा इतिहास, त्या लोकांचे पोषाख, घरांतील वस्तु, राहण्याची पद्धति वगैरेंबद्दल फारच मनोरंजक माहिती मिळाली आहे.

---

## धडा ३६

# भूकंप व ज्वालामुखी

### भाग ३ रा

वरील दोन भागांतील वर्णनावरून धरणीकंप व ज्वालामुखी यांचा कांहीं तरी संबंध असला पाहिजे ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत आली असेल. जेथें ज्वालामुखीचा स्फोट होतो, तेथें बहुधा धरणीकंपाचा धक्काही बसतो. व धरणीकंप होतात त्या सर्व ठिकाणीं ज्वालामुखीचा स्फोट होतो असें जरी म्हणतां येत नाहीं, तरी इतकें बिनधोक म्हणतां येईल कीं, ज्या मुलखांत धरणीकंप फार होतात त्याच मुलखांत ज्वालामुखीही आढळतात.

ज्वालामुखी जी आग ओकतो ती सर्व पृथ्वीच्या पोटांतून बाहेर पडते हें उघड आहे. पण हें कसें? थंडगार पृथ्वीच्या पोटांत असे उष्ण पदार्थ आहेत कीं काय? होय, हें खरें आहे. पृथ्वीचा एक फारच पातळ पापुदरा (सर्व पृथ्वीच्या आकाराच्या मानानें याला पापुदराच म्हणावयास काय हरकत आहे?) थंड व घनावस्थेंत आहे. आंतील भाग अत्यंत उष्ण, व द्रवावस्थेंत नसला तरी जवळ जवळ तशाच स्थितींत आहे, असें अनेक प्रमाणांनीं दाखवितां येतें. खाणींत काम करणाऱ्या लोकांना असा अनुभव येतो कीं, पृथ्वीच्या पृष्ठभागापासून जों जों खालीं जावें,

तों तों उष्णता अधिक भासूं लागते. दुसरें प्रमाण ऊन पाण्याच्या झऱ्यांचें. यांना **उन्हाळीं** म्हणतात. आपल्या हिंदुस्थानांतही कोंकणांत राजापूर, वज्रेश्वरी वगैरे ठिकाणीं अशीं उन्हाळीं आहेत. व कोठें कोठें यांतून आधणापेक्षांही कढत पाणी बाहेर येतें. कांहीं ठिकाणीं तर हें पाणी इतक्या जोरानें वर येतें कीं, उडत्या पाण्याचा एक प्रचंड स्तंभच आपणास पहावयास मिळतो. युरोपच्या उत्तरेस आइसलंड बेटांत व अमेरिकेंत "यलोस्टोन पार्क" नांवाच्या प्रदेशांत असले कढत पाण्याचे उडते फवारे फार मोठाले आहेत. त्यांची उंची शंभरसवाशें फूटपर्यंत आहे. या झऱ्यांच्या पाण्यास बहुधा गंधकाचा वास येत असतो. यावरून पृथ्वीचा अंतर्भाग अत्यंत उष्ण, व ज्यांची वाफ जलद होते अशा गंधक वगैरेसारख्या पदार्थांनीं भरलेला आहे हें उघड होतें.

आतां भूकंप व ज्वालामुखीचे स्फोट हे कां होतात हें पाहूं. आंतील उष्णतेनें गंधकासारख्या पदार्थांची वाफ होते; व वाफ ही वायुरूपी असल्यामुळें तिला जागा जास्त लागते. पण पुरेशी जागा नसल्यानें थोडया जाग्यांत कोंडलेली वाफ जोरानें आपणाकरितां सांपडेल तिकडे जागा शोधून काढण्याचा जेव्हां प्रयत्न करते, तेव्हां आजूबाजूस अर्थात्च धक्के बसतात. हेच भूकंपाचे धक्के होत. भाताच्या भांडयावर ठेवलेलें झांकण आंतील वाफेच्या जोरानें कसें थडथड उडतें, हें ज्यानें पाहिलें असेल त्याला वरील चमत्कार सहज समजेल. वाफेचा जोर केव्हां केव्हां इतका होतो कीं, पृष्ठभागावरील खडकांचें आवरण फोडून व एकदम तें बाजूला सारून ती बाहेर पडते; व मग आंतील अत्यंत उष्ण द्रव पदार्थांना बाहेर उसळी मारण्यास अवकाश सांपडतो. यासच आपण ज्वालामुखीचा स्फोट असें नांव देतों. पृष्ठभागाला भेगा पडलेल्या असल्या तर त्यांतून केव्हां केव्हां वरील पाणी पृथ्वीच्या अंतर्भागापर्यंत पोंचतें. व त्याची तेथें ताबडतोब वाफ तयार होऊन ती जोरानें बाहेर पडण्याचा यत्न करते. या वाफेचीही वरील स्फोटास मदत होत असली पाहिजे.

वरील विवेचनावरून भूकंप ज्या प्रदेशांत होतात त्याच प्रदेशांत ज्वालामुखी कां असतात हें ध्यानांत येईल. प्रत्येक धरणीकंप एखादा ज्वालामुखी उत्पन्न करण्याचा यत्न करीत असतो. कारण आंतील वाफ व जळजळीत द्रवपदार्थ बाहेर पडण्याचें, ज्वालामुखीचें तोंड हें एक द्वार आहे. पण अशा तऱ्हेचें तोंड प्रत्येक भूकंप पाडीलच असा नियम नाहीं. आंतील वाफेचा जोर जर बेताचाच असेल, किंवा वरील खडक भक्कम असेल, तर ज्वालामुखीचा स्फोट न होतां, नुसत्या धरणीकंपावरच वेळ निभावून जाईल.

---

## धडा ३७
## नेपोलियन बोनापार्ट

युरोपखंडाच्या, किंबहुना सर्व जगाच्या, इतिहासांत **नेपोलियन बोनापार्ट**च्या तोडीचा मोठा पुरुष झाला नाहीं असें म्हटलें तरी शोभेल. आपल्या असामान्य धैर्यानें व रणकुशलतेनें त्यानें दहावीस वर्षांत सारा युरोप उलथापालथा केला; व आपल्या अद्वितीय बुद्धितेजानें सर्व जगाचे डोळे दिपवून सोडून विद्या, कला, राजनीति वगैरे सर्व बाबतींत त्यानें अल्पावधींत फ्रान्स देशाची विलक्षण उन्नति केली. व शेवटीं त्याच्या अनावर महत्वाकांक्षेनें जर त्याला भलत्याच मार्गानें नेलें नसतें, तर कदाचित आजमितीस युरोपांत फ्रान्स देशाचेंच वर्चस्व दिसून आलें असतें.

फ्रान्सच्या दक्षिणेस भूमध्यसमुद्रांत **कार्सिका** नांवाचें एक बेट आहे. तेथें नेपोलियनचा जन्म इ. स. १७६९ सालीं झाला. त्याचें शिक्षण फ्रान्समध्यें ब्राएनी नांवाच्या शहरीं एका लष्करी शिक्षणाच्या शाळेंत झालें. नंतर तो **पारीस** येथील लष्करी शिक्षणाच्या एका कॉलेजांत गेला. तेथें असतांना त्यानें आपल्या अधिकाऱ्यांजवळ एकदा अशी तक्रार केली कीं, त्या शाळेंतील शिक्षणपद्धति अतिशय

खर्चाची, व काटक शिपायांच्या ऐवजीं नाजूक अमीरउमराव तयार करणारी अशी आहे. सोळा वर्षांच्या एखाद्या चिमुरड्या पोरानें वृद्ध व अनुभवी समजल्या जाणाऱ्या अधिकाऱ्याजवळ असा बुद्धिवाद करावा या गोष्टीचा त्यांना अर्थातच राग आला; व त्यांनीं लवकरच त्याची परीक्षा घेऊन एकदाची त्याची शाळेंतून रवानगी केली. त्या बिचाऱ्यांना काय माहीत कीं बुद्धीचें तेज हें वयावर अवलंबून नसतें! तेथून निघाल्यावर त्याला तोफखान्यावरील एक लहानसा अधिकारी नेमण्यांत आलें.



फ्रान्स देशांत ही वेळ मोठी धांदलीची होती. कित्येक शतकांच्या अन्यायानें व जुलमानें फ्रान्समधील लोक राजसंस्थेवर व बड्या लोकांवर नाराज होऊन गेले होते. त्यांचा द्वेषाग्नि बरेच दिवस धुमसत होता. त्यानें शेवटीं १७८८ सालीं एकदम जोरानें पेट घेतला, व एक मोठी राज्यक्रांति होऊन अविचाराच्या भरांत लोकांनीं राजा व राणी या

उभयतांना ठार मारलें, व एका प्रजासत्ताक राज्याची स्थापना केली. यानंतर फ्रान्समध्यें कित्येक दिवस फारच घोटाळा माजून अतोनात रक्तपात झाला. आज एकाचा लोकपक्षाचा पुढारी म्हणून जयजयकार व्हावा, व उद्यां त्याला खालीं ओढून त्याच लोकांनीं शिव्याशापांचा वर्षाव करीत त्याचा खून करावा, असा अनर्थापात चालू झाला. आज फ्रान्सच्या राजावर जी आपत्ति आली तीच उद्यां आपल्यावर येणार, म्हणून हें फ्रान्सदेशांतील प्रजासत्ताक राज्यपद्धतीचें बंड मुळांतच चिरडून टाकणें चांगलें असें वाटून आस्ट्रिया, स्पेन वगैरे देशांनीं राजवंशाचा पक्ष उचलला व फ्रान्सवर स्वारी केली. इंग्लंड प्रथम यांत सामील झालें नव्हतें. पण लवकरच त्यास तसें करावें लागलें.

या राज्यक्रांतीच्या सुरवातीला नेपोलियन काय काय होतें तें शांतपणें पहात होता. त्याचें वय या वेळीं सारें एकोणीस वर्षांचें होतें. पण चमत्कार हा कीं, आणखी दहाच वर्षांनीं तो फ्रान्सचा बादशहा झाला! एक गरीब शिपाई इतक्या थोडया अवधींत येवढ्या मोठ्या योग्यतेस कसा चढला, याचें तुम्हांस आश्चर्य वाटेल! पण त्याचा निश्चय फार दांडगा होता. कच खाणें व मागें घेणें हें त्याला स्वप्नांतही माहित नव्हतें. त्याची बुद्धिमत्ता व उद्योगतत्परता हींही लोकोत्तर होतीं. कामाला लागला म्हणजे त्याला जेवणही सुचत नसे. व अगदीं यःकश्चित वाटणाऱ्या गोष्टीपासून तों अत्यंत महत्वाच्या गोष्टीपर्यंत सर्वांकडे तो लक्ष पुरवी. त्याच्या भाषणांत अशी कांहीं विलक्षण मोहिनी होती कीं, त्याला सर्व वश होत, व शिपायांचें तर त्यावर असें प्रेम असे कीं, त्याच्याकरितां ते आपले प्राण खर्ची घालण्यास मागें पुढें पहात नसत. त्याला माणसाची पारख विलक्षण असे. यामुळें एखाद्या क्षुद्र दिसणाऱ्या शिपायाला तो एकदम मोठा अधिकार देई! व आश्चर्य हें कीं ही निवड कधींही चुकीची ठरली नाहीं.

राज्यक्रांतीनंतर फ्रान्समध्यें जें सरकार स्थापन झालें होतें त्यानें नेपोलियनास इ. स. १७९३ सालीं **टूलन** बंदराचें रक्षण करण्यास पाठविलें. तेथें त्यानें जें कौशल्य दाखविलें त्यानें दरबारांत त्याचें इतकें वजन बसलें, कीं पुढील घडामोडींत त्याच्यावांचून चालेनासें झालें. होतां होतां त्यास लोकांनीं राज्याचा **पहिला कान्सल** ( प्रजासत्ताक राज्याचा मुख्य अधिकारी ) नेमिलें. दहाबारा वर्षांच्या अराजक स्थितीनें लोक अगदीं कंगाल होऊन गेले होते. नेपोलियनच्या एकतंत्री पण सुव्यवस्थित अमलानें देशास शांति व सुरक्षितता मिळून त्याला परकीय शत्रूशीं टक्कर देण्याचें चांगलेंच सामर्थ्य आलें.

याची प्रतीति नेपोलियननें आस्ट्रियाची खोडकी मोडण्याकरितां लवकरच जी इटली देशावर स्वारी केली त्या वेळीं आली. एक मोठें सैन्य घेऊन आल्पससारखा प्रचंड व बर्फाच्छादित पर्वत चढून जाणें हें काम इतकें कठिण होतें कीं, आस्ट्रियन सैन्य पलीकडच्या बाजूस निश्चितपणें बसलें होतें. पण नेपोलियन म्हणे–" 'अशक्य' हा शब्द मुळीं भाषेंतून काढूनच टाकला पाहिजे !" त्यानें अखेरीस आपलें म्हणणें खरें करून दाखविलें. अवजड तोफखान्यासह आपलें सैन्य पलीकडे नेऊन त्यानें एकदोन लढायांतच आस्ट्रियन सैन्याचा फडशा पाडला. लढाईचे वेळीं शिपायांत तो कसा उत्साह उत्पन्न करी, याचें एकच उदाहरण बस्स आहे. या इटलींतील स्वारींत त्याला एकदा एक पूल ओलांडून जावयाचें होतें. पण पलीकडच्या बाजूकडून आस्ट्रियन तोफांचा मारा असा भयंकर होत होता कीं, नेपोलियनच्या लोकांनीं एकामागून एक बरेच हल्ले केले तरी पटापट अनेक लोक पडून त्यांना परतावें लागे. अर्थात् लोक पुढें पाऊल टाकण्यास धजेनात. तेव्हां नेपोलियननें निशाणवाल्याच्या हातून आपल्या सैन्याचें निशाण हिसकून घेतलें, व स्वतः पुढें होऊन तो म्हणाला "हा मी स्वतः शत्रूवर तुटून पडणार, आपल्या देशाच्या निशाणाचा ज्याला

अभिमान असेल त्यानें मजबरोबर यावें!" या धाडसाचा परिणाम विलक्षण झाला; व लोक शत्रूवर इतक्या निकरानें तुटून पडले कीं त्यांनीं थोड्याच वेळांत त्यांचा धुव्वा उडवून पूल सर केला! तोफांच्या व गोळ्यांच्या वर्षावांत जरी नेपोलियन लढत होता तरी त्याला यत्किंचितही इजा झाली नाहीं. व युद्धप्रसंगीं आपल्यास कधीं अपाय होऊं नये असाच आपला दैवयोग आहे अशी नेपोलियनची श्रद्धा होती.

या स्वारीनंतर थोड्याच दिवसांत नेपोलियनला फर्स्ट कान्सलच्या जागेवर तहाहयात कायम करण्यांत आलें; व तो लवकरच इतका लोकप्रिय झाला कीं, लोकांनीं त्याला आपला **बादशहा** नेमिलें. केवळ राजवंशांत जन्मला म्हणून बादशाहा, अशी आपली स्थिति नसून **आपण लोकनियुक्त बादशहा आहों असें म्हणवून घेण्यांत नेपोलियनला मोठा अभिमान वाटे.**

या सर्व अवधींत फ्रान्सचें इंग्लंड देशाशीं राहून राहून युद्ध चाललेंच होतें; व एका अर्थानें इंग्लंडच त्या वेळीं फ्रान्सचा मोठा शत्रु होतें. म्हणून कांहीं तरी करून इंग्लंडची खोडकी मोडावी--किंबहुना इंग्लंड व फ्रान्स या दोन देशांमधील अरुंद सामुद्रधुनी ओलांडून त्या देशावर स्वारी करावी, अशी नेपोलियनची फार इच्छा होती. तीप्रमाणें त्यानें एक आरमार तयार केलें, व इंग्लंडवरच्या स्वारीची तयारी चालविली. परंतु नेपोलियनचा हा हेतु साध्य व्हावयाचा नव्हता. त्याची पुरती तयारी होण्यापूर्वींच इंग्लंडचा प्रसिद्ध आरमारी सेनापति **नेलसन** यानें **ट्राफल्गार** येथील लढाईंत फ्रान्सच्या आरमाराचा अगदीं चुराडा करून टाकला (१८०४). यामुळें इंग्लंडवर स्वारी करण्याचा बेत नेपोलियनास सोडून द्यावा लागला.

तथापि जमिनीवरच्या लढायांत मात्र त्याचा कोणीच हात धरूं शकत नव्हतें. इंग्लंडचा मुत्सद्दी **पिट** यानें प्रशिया, आस्ट्रिया, रशिया वगैरे

राष्ट्रांशीं संगनमत करून जुटीनें नेपोलियन विरुद्ध लढण्याकरितां सैन्यें पाठवावीं, व नेपोलियननें आपल्या कुशलतेनें त्या सर्वांचा फडशा पाडावा असा क्रम सारखा चालला होता. होतां होतां, खुद्द फ्रान्स खेरीज नेदर्लंड, इटली, स्पेन, जर्मनी व रशिया यांपैकीं कांहीं भाग, इतका मुलुख नेपोलियननें फ्रान्सच्या राज्यास जोडला. जुनें जर्मन



ट्राफल्गारचा वीर—नेल्सन्

साम्राज्य मोडून टाकून जर्मनींतील अनेक संस्थानिकांस त्यानें आपले मांडलिक बनविले. इटली, स्पेन, बव्हेरिया वगैरे देशांवर त्यानें आपले भाऊ व इतर भाऊबंद राजे नेमिले. याप्रमाणें युरोप देशांत नेपोलियन करील ती पूर्वदिशा, अशी स्थिति झाली !

## धडा ३८
# नेपोलियन बोनापार्ट
### भाग २ रा

नेपोलियन नुसता लढवय्या वीरच होता असें नव्हे तर तो उत्कृष्ट मुत्सद्दी व कुशल राजनीतिज्ञ होता. त्याच्या अमलाखालीं लोक अत्यंत सुखी असत. शेतकी, व्यापार, कलाकौशल्य, विद्यावृद्धि, शास्त्रीय ज्ञानाची वाढ या सर्व गोष्टींकडे नेपोलियन स्वतः लक्ष पोंचवी. तो फर्स्ट कॉन्सल असतांच त्यानें "कोड नेपोलियन" या नांवाच्या नव्या कायद्यांच्या संग्रहाची रचना, स्वतःच्या देखरेखीखालीं, विद्वान् न्यायकुशल पंडितांकडून करविली. हे कायदे इतके उत्कृष्ट ठरले कीं, पुढें युरोपमधील सर्व देशांतल्या लोकांनीं त्यांची नक्कल केली. खुद्द नेपोलियनही अभिमानानें म्हणे कीं "पुढील पिढ्या ह्या कायद्यानेंच माझी आठवण काढतील." यावरून आपण मिळविलेल्या मोठमोठ्या विजयांपेक्षां या शांततेंतील कामगिरीची किंमत त्याला अधिक वाटत होती हें स्पष्ट होतें.

तथापि त्याची विलक्षण महत्वाकांक्षा त्याला असल्या सुधारणा करीत स्वस्थ बसूं देईना. युरोपमधील राज्यांशीं कांहीं तरी करून कुरापत काढ, व आपला मुलुख वाढीव, असें यापुढें नेपोलियननें सुरू केलें. यामुळें त्याविरुद्ध कट स्थापन होण्यास पुनः फुरसत मिळाली. खुद्द नेपोलियनची राज्यव्यवस्था जरी उत्तम असे, तरी त्याचे भाऊ तितके शाहाणे नव्हते. त्यांनीं स्पेन, इटली वगैरे देशांतील प्रजेस लवकरच नाखूष करून टाकलें, व तेथें बंडाळी माजली. तिचा फायदा घेऊन इंग्लंडनें आपला प्रख्यात सेनापति **ड्यूक ऑफ वेलिंगटन** यास स्पेन देशावर स्वारी करण्यासाठीं पाठविलें. लोक त्याला अनुकूल होतेच; अशा स्थितींत फ्रेंच सैन्याचा पराजय करून त्याची स्पेनमधून हकालपट्टी करणें वेलिंगटनला फारसें जड गेलें नाहीं. ही बातमी नेपोलियनास

कळतांच तो अगदीं संतापून गेला. व दिवस थंडीचे असून पिरीनीज पर्वतांत चोहोंकडे बर्फ पडलें असतांही तो पर्वत ओलांडून त्यानें स्पेन-मध्यें प्रवेश केला.

पण इंग्रज लोकांना शासन करून त्यांची स्पेनमधून हकालपट्टी करण्याचा नेपोलियनचा बेत मात्र सिद्धीस गेला नाहीं. कारण तो तेथें



प्रख्यात इंग्रज सेनापति—ड्यूक आफ वेलिंग्टन्.

पोंचतो न पोंचतो इतक्यांत आस्ट्रियानें लढाई सुरू केल्याची खबर त्याला कळली. तेंव्हां स्पेनमधील कामगिरी एका हाताखालच्या सेनापतीवर टाकून त्याला परतावें लागलें.

आल्याबरोबर त्यानें आस्ट्रियाशीं दोनतीन लढाया करून त्यांची अशी कत्तल केली कीं पुनः वठणीला येऊन त्यांनीं नेपोलियन सांगेल तसा तह मान्य केला.

तथापि नेपोलियनच्या नशीबानें आतां उलट खाल्ली होती. लवकरच रशियाशीं लढाई सुरू झाली. नेपोलियननें पांच लाख लोकांचें एक प्रचंड सैन्य तयार केलें, व रशिया पुनः डोकें वर न करील अशी त्याची खोडकी जिरवावयाची असा बेत त्यानें योजिला. पण रशियन लोकांनीं एक अजबच युक्ति काढली. लढाई दिली कीं नेपोलियन आपला फडशा पाडणार ही गोष्ट त्यांना पक्की माहीत होती. म्हणून तो मार्गच त्यांनीं टाळला. उघड्या मैदानावर लढाई न देतां, आपला मुलुख अगदीं उजाड करून टाकावयाचा, म्हणजे शत्रूस दाणापाणी कांहीं एक मिळूं नये, व उपासमारीनें व रशियामधील भयंकर थंडीनेंच त्याचा संहार व्हावा अशी योजना त्यांनीं केली. व तींत त्यांना यशही उत्कृष्ट आलें.

नेपोलियन शत्रूशीं सामना देण्याकरितां म्हणून जों पुढें आला, तों त्यास मैलचे मैल उजाड, निर्जन व वैराण असा मुलुख लागला. एवढें दांडगें सैन्य पण दाणापाण्यावांचून काय करणार ? तथापि तशाही स्थितींतून त्यानें पांचशें मैलांचा प्रवास करून **बोरोडिनो** येथें रशियन सैन्याचा चांगलाच पराजय केला, व मग रशियाची राजधानी जें **मास्को** शहर त्यावर चाल केली. रशियन लोकांनीं शहर लढविण्याचा प्रयत्नच केला नाहीं. त्यांतील धान्य वगैरे सर्व उपयुक्त वस्तूंचा नाश करून त्यांनीं शहर सोडून पळ काढला, व शहर अर्थात्च खटपट न करतां नेपोलियनास मिळालें! पण उपयोग काय ? धान्याचा अगर चाऱ्याचा एक कण सांपडेल तर शपथ ! इतक्यांत रात्रीं शहरास आग लागली. सर्व शहर जळालें ! त्या आगींतून आपल्या सैन्यास काढतां काढतांच नेपोलियनास बेजार झालें !

थंडी इतकी पडली होती कीं जिकडे पहावें तिकडे बर्फ ! नद्या, तळीं वगैरे सर्व गोठून गेलीं होतीं. अशा स्थितींत यापुढें जाणें योग्य नाहीं असा विचार करून नेपोलियन परत फिरला. नेपोलियनचा खरा पराभव

या भयंकर थंडीनें केला. परत जातेवेळीं त्याच्या सैन्याच्या ज्या हाल अपेष्टा झाल्या त्याचें नुसतें वर्णन वाचलें तरी अंगावर कांटा उभा राहतो. बर्फावरून चालतांना एका आठवड्यांत त्याचे बहुतेक घोडे मेले. पोटांत अन्न नाहीं व बाहेरून थंडीचा मारा, यामुळें नानाप्रकारच्या रोगांनीं माणसेंही पटापट मरूं लागलीं. ही संधि साधून रशियन लोकांनीं मागून त्यांच्यावर सारखे हल्ले सुरू केले. एक हल्ला करावा, पुनः मागें जाऊन लपावें, शत्रु बेसावध आहेत असें पाहिलें कीं फिरून घाला घालावा असें करून आधींच उपासमारीनें हैराण झालेल्या लोकांस, नको हा जीव, असें त्यांनीं करून सोडलें. अखेरीस या उपासमारीनें, थंडीच्या कडाक्यानें, रोगराईनें, व रशियनांच्या हल्ल्यांनीं नेपोलियनच्या सैन्याचा इतका संहार झाला कीं, रशियाच्या हद्दींतून परत फ्रान्समध्यें पांच लाखां-पैकीं एक लाख सैन्यही पोंचूं शकलें नाहीं.

या पराभवानें आतांपर्यंत नाइलाजानें हात चोळीत बसलेल्या युरोप-मधील संस्थानांनाही हुरूप चढला, व त्या सर्वांनीं एक होऊन आधींच दुर्बल झालेल्या नेपोलियनच्या सैन्याचा **लाइप्झिग** येथें पूर्ण पराभव केला. या सारख्या चाललेल्या मारामारीनें व मनुष्यनाशानें फ्रान्समधले लोकही कंटाळले होते. अशा स्थितींत, फ्रान्समधील पूर्वीच्या राजाच्या भावानें पुनः फ्रान्सच्या गादीवर बसावें, व नेपोलियननें " **एल्बा** " म्हणून इटली शेजारीं एक लहानसें बेट आहे तेथील राजा होऊन रहावें, असें यूरोपम-धील प्रमुख राष्ट्रांनीं ठरविलें.

ही गोष्ट मान्य करून नेपोलियन एल्बा बेटांत जाऊन राहिला; पण फ्रान्समधील लोकांस अठराव्या लुईचें राज्य नापसंत आहे, व आपण पुनः गेलों तर आपणास यश मिळेल असें जाणून एका वर्षाच्या आंत नेपोलियन गुप्तपणें फ्रान्समध्यें परत आला. आल्याबरोबर त्याच्या भोंवतीं लोक पुनः भराभर गोळा झाले. लुईराजा पळून गेला व नेपोलियन पुनः बादशहा झाला !

ही बातमी पसरतांच सर्व युरोप हादरून गेलें. पुनः सर्व राष्ट्रांनीं जंगी तयारी करून नेपोलियन विरुद्ध कमर कसली. नेपोलियननेंही आपला काय तो सोक्षमोक्ष आतांच होणार हें लक्षांत ठेवून खूप खटपट करून लाख दीडलाख सैन्य जमविलें. पण यांत जुन्या अनुभविक योद्ध्यां-पेक्षां अर्धकच्च्या बांडांचीच भरती जास्त होती. इंग्लंडनेंही स्पेनमध्यें विजय संपादून आलेल्या ड्यूक ऑफ वेलिंगटनला नेपोलियनवर पाठविलें. थोड्याच दिवसांत इंग्लंड व प्रशिया एकीकडे, व फ्रान्स एकीकडे अशीं सैन्यें **वाटरलू** येथील जगत्प्रसिद्ध समरभूमीवर एकमेकांशीं भिडलीं. प्रशियन सैन्याची मदत मिळण्यापूर्वीं इंग्रज सैन्याच फडशा पाडण्याचा नेपोलियनचा बेत त्याच्या हाताखालील एका सेनापतीच्या दिरंगाईनें साधला नाहीं; व अखेरीस या लढाईत नेपोलियनचा पूर्णपणें पराभव झाला ( १८१५ ).

या उपर आपणांस कांहीं करतां येणार नाहीं हें जाणून राज्याचा राजीनामा देऊन तो आपण होऊनच इंग्रज लोकांच्या स्वाधीन झाला. तथापि त्याच्या कारस्थानीपणाची इंग्रजांस व इतर सर्व राष्ट्रांस इतकी धास्ती पडली होती कीं, त्यांनीं त्याला दूर, आफ्रिकेच्या पश्चिमेस, **सेंट हेलिना** नांवाचें एक बेट आहे, तेथें नेऊन कडेकोट बंदोबस्तांत ठेविलें! खेदाची गोष्ट अशी कीं, दैवयोगानें आपद्ग्रस्त झालेल्या या जगज्जेत्या बादशहास त्या वेळच्या सेंट हेलिनाच्या गव्हर्नरानें वाईट रितीनें वागविलें! व उगीच हलक्यासलक्या बाबतींतही त्याला त्रास दिला! येथें आल्या-वर सहाच वर्षांनीं नेपोलियन मरण पावला ( १८२१ ).

अशा रीतीनें या लोकोत्तर व्यक्तीला आपल्या आयुष्याचा शेवटचा भाग दुःखांत काढावा लागला. कोणीकडे त्याचे बेत व महत्वाकांक्षा, व त्यांचा शेवट कसा झाला! मानवी आशा व मनोरथ यांचा हा असा शेवट पाहिला म्हणजे मन उद्विग्न होतें!

नेपोलियनचे उपकार फ्रेंच लोक मात्र विसरले नाहींत. फ्रान्समधील परिस्थिति बदलतांक्षणीं त्यांनीं नेपोलियनचें शव सेंट हेलिना मधून मोठ्या समारंभानें आणून पारिस शहरांत पुरलें, व तसें करण्यास इंग्रज सरकारनेंही मोठ्या आनंदानें परवानगी दिली. फ्रान्स व इंग्लंड या देशांतील जुनें वैर तर आजमितीस राहिलें नाहींच; पण आज हीं दोन्ही राष्ट्रें प्रेमानें खांद्यास खांदा लावून जर्मनांशीं लढत आहेत!

---

## धडा ३९

## उज्जयिनी

उज्जनी शहरापासून थोडया अंतरावर एक विस्तीर्ण मैदान आहे. त्या स्थळीं पूर्वींचें उज्जयिनी शहर वसलेलें होतें. कोणी देशाभिमानी पुरुष त्या ओसाड मैदानांत फिरत असतां प्राचीन उज्जयिनी शहराचें वैभव ध्यानांत आणून म्हणतो —

**श्लोक**

जातां अस्ताहि तेजें दिपवि रवि, जसा संकटीं थोर लोक;
क्षिप्रेच्या पृष्ठभागीं चमकति किरणें पीत त्याचीं सुरेख;
ऐशा वेळीं तिथें मी भटकत असतां फार झालों उदास,
तेव्हां नाना विचार प्रकटुनि करिती क्षुब्ध माझ्या मनास. १
शास्त्रें, विद्या, ललित कविता, धर्मनिष्ठा, प्रताप,
होतीं जेव्हां करित वसती हिंदुलोकीं अमूप;
जेव्हां होता विलसत जगीं **विक्रमादित्य** राया,
तेव्हां नांदे प्रथित भुवनीं **उज्जनी** याच ठायां. २
पुरी पूर्वीं गर्वें निरुपम निजैश्वर्य मिरवी,
जिला वर्णूं जातां थकति सुकृती संस्कृत कवी;

तिच्या स्थानीं आतां पसरत असे निर्जन वन,
बघोनी हें झालें मम समयिं त्या दुःखित मन. ३

कोठें ते कांचनाचे कळस चमकती उंच देवाल्यांचे?
हर्म्य प्रासाद कोठें असति? पसरलें थोर ऐश्वर्य ज्यांचें;
कोठें त्या नाट्यशाला? दिसति न नयना चंद्रशाला विशाला,
रत्नांनीं पूर्ण गेले विपणि, तळ जणों अब्धिचे ते, लयाला. ४

प्रातःकाळीं नगरवनिता कुंकुमाच्या सड्यांनीं,
रांगोळ्यांनीं अधिकाचि तयां देति शोभा झटोनी;
नाना यानीं धनिक बसुनी जात होते जयांत,
आतां कैसे दिसति न इथें रम्य ते राजपंथ? ५

जेथें नाचति मोर मंजुळ रवें, गातात जेथें पिक,
वापींच्या तटिं खेळती सुखभरें चक्रांग हंसादिक;
पुष्पांनीं लवल्या लता तरुवरां जेथें मिठी घालिती,
उद्यानें दिसती न तीं वसति जीं क्षिप्रा नदीच्या तटीं. ६

विद्याधर्मसुकर्मतत्पर असे होते इथें ब्राह्मण,
तैसे क्षत्रिय शूर मानधन ते ज्यां जीव वाटे तृण;
अर्थोत्पादक वैश्य शूद्र खपले सेवावया भूमिला,
कोठें उज्जयिनीमधील जन ते गेले? कळेना मला! ७

ज्यांस **विक्रम** पराक्रमी गुणी,
तोषवी झटुन नित्य रक्षुनी;
स्वामिभक्तिवश धन्य लोक ते,
होति या नगरिं पूर्वि राहते. ८

लोकीं पावसि तूंच विक्रम नृपा! धन्यत्व या जन्मुनी,
काव्याभिज्ञ जनांत तूंचि पहिला दात्यांमध्यें अग्रणी;

वाणीकंठमणी कवीश्वर गुणी **शाकुंतलाचा पिता,**
होता आश्रय पूर्ण पावत तुझा विद्वत्सभासंगता ! ९

शृंगारवीरकरुणारसपूर्ण काव्यें
श्री**कालिदास** तुज ऐकवि नित्य नव्यें;
गंभीर सुस्वर रसाळ अशी सुवाणी,
त्याची नृपा! परिसली असशील कानीं. १०

सांगाया निजवल्लभेस वदला ता यक्ष जें जें घना,
सीतेचा पतिला निरोप, रतिचा तो शोक, भेदी मना;
ज्यांतें ही कविच्या मुखेंच कविता ऐकावया सांपडे,
त्यांचें भाग्य विशेष! दुर्लभ जगीं तो लाभ त्यांतें घडे. ११

ज्यांनीं गर्वभरें शिरें उचलिलीं आकाश भेदावया,
जाती पर्वत उंच थोरहि असे ज्याच्या प्रभावें लया;
किंवा घोर अपार सागरजलें ज्यानें बळें शोषिलीं,
तो हा धन्य अचिंत्य काल-महिमा स्वच्छंदचारी बळी ! १२

**महाकाल** रक्षावया सिद्ध नित्य,
अवंतीस हें बोलती लोक सत्य;
कसा काल नाशावया तीस पाहे ?
अहो थोर आश्चर्य हें वाटताहे ! १३

कविवर चिर गाती कीर्ति ज्याची अमूप,
त्यजुन भुवन गेला विक्रमादित्य भूप;
कवण रसिक भोक्ता आपणा होय आतां,
म्हणुन सुकविता ही पावली स्वर्गपंथा ! १४

श्रीविक्रमाग्रज नृपाल उदार शुद्ध
राज्यें प्रजा सुखवि **भर्तृहरि** प्रसिद्ध,

तो आपुल्या प्रियपुरास विनाशकाल
येणार जाणुन असें वदला असेल ! १५
“ ती रम्या नगरी, महानृपति तो सामंतचक्रावृत,
त्याची राजसभा विशाल, जवळी चंद्रानना त्या स्थित,
शौर्यें गर्वित राजपुत्रगण तो, ते भाट, तीं भाषणें,
ज्या काळें सगळें लया दवडिलें, माझीं तया वंदनें ! ” १६
गेली उज्जयिनी ! तिच्या धरितसे नांवास जें लोकिं या
आहे सांप्रत उज्जनी नगर तें राज्यांत **शिंद्या**चिया;
आहे नांव, परंतु वैभव दिसे कोठें न तें त्या परी,
नामैक्यें समता चुन्यास अमृता येईल कैशी तरी ? १७
कोठें उज्जयिनी पुराण नगरी संपन्न राजन्वती
ज्ञानी शूर सुखी स्वधर्मनिरता जेथें प्रजा नांदती;
कोठें उज्जयिनी नवी जन जिथें दारिद्र्यचिंताकुल
राजे दुर्जन दुष्ट जीस लुटिती होती रणें तुंबळ ! * १८

**वासुदेव वामनशास्त्री खरे**

---

### घडा ४०

## राजभक्तीचा कडेलोट

[ खालील उतारा रा. वासुदेवशास्त्री खरेकृत “ **तारामंडळ** ” नांवाच्या नाटकांतून घेतलेला आहे. विक्रमसिंगाचा बाप इतबारराव हा महामंडलेश्वर नांवाच्या राजाचा सेनापति होता. त्याला दुर्जनसिंग नांवाच्या एका दुष्ट मनुष्याच्या खोट्यानाट्या चाहाड्या ऐकून राजानें शिरच्छेदाची शिक्षा दिली. महामंडलेश्वराविरुद्ध बंड करून आपल्या पित्याला सोडविण्याचा विक्रमसिंगानें बेत केला. तथापि स्वामिनिष्ठ इतबाररावानें या निश्चयापासून विक्रमसिंगाला परावृत्त केलें. हा उदात्त प्रसंग खालील उताऱ्यांत वर्णिला आहे.]

---

* हें शेवटल्या पद्यांतलें वर्णन अर्थातच इंग्रजसरकाराचें राज्य होण्यापूर्वी व पेशवाईच्या अखेरीस जो अंदाधुंदीचा काळ गेला त्यास अनुलक्षून आहे.

( विक्रमसिंग येतो. )

**वि०**—काय बिशाद आहे महामंडलेश्वराची ! मी जवळ नाहींसें पाहून त्यानें वडिलांना धरून नेऊन शिरच्छेदाची शिक्षा फर्मावली; पण ती अमलांत आणण्यापूर्वींच मी त्यांना सोडवून नेईन, हें त्या मूढाला कसें कळलें नाहीं ? महामंडलेश्वरानें हुकूम केला म्हणजे कांहीं गगन-मंडल कडाडून भूतलावर आदळलें नाहीं, किंवा खगोलाच्या अनंत पोकळींत चंद्रसूर्य अंतर्धान पावले नाहींत ! कोण विचारतो त्या हुकमाला ? ( दुर्गपाळास येतांना पाहून हातपाय आपटून ) अथवा कोण विचारतो तरी कसा म्हणूं ? असले जुलमी हुकूम निमूटपणें कबूल करणारे, आणि त्याप्रमाणें आपल्या परमप्रिय मित्राचा शिरच्छेद करण्यास तयार झालेले हे दुर्गपाल आले !

( दुर्गपाल येतो. )

**दुर्ग०**—विक्रमा शांत हो, शांत हो ! थोडा विचार कर.

**वि०**—दुर्गपाल, राजाची मर्जी संभाळून तुम्ही धनदौलत व अधिकार पुष्कळ मिळवाल; पण या वार्धक्यांत मित्रद्रोहाचें महापातक करून आपण कोणता पारमार्थिक लाभ मिळवणार हें मला समजलें नाहीं !

**दुर्ग०**–( हुंदका आवरून ) विक्रमा बोल, बोल, जितका बोलशील तितकें थोडेंच आहे. सेनापतींवर गहजब गुदरला त्यानें माझें मन आधींच पोळून गेलें आहे. त्यांतच आणखी तूं वाग्बाणांचा वर्षाव माझेवर न करावास तर कोणचा पुरुषार्थ करावास ?

**वि०**—आपणाला दुखवावें अशी माझी इच्छा नाहीं. पण मी विचारतों कीं, राजाचा हुकूम आपण मान्य कसा केलात ?

**दुर्ग०**—यांत माझ्याकडे काय दोष आहे ? मी निमित्तमात्र आहें ! जें कांहीं झालें तें सारें सेनापतींच्याच इच्छेमुळें झालेलें आहे.

**वि०**—कोणत्याही हेतूनें आपण होऊन संकटांत पडण्याची वडिलांची इच्छा असली, तरी त्यांना सोडविणें माझें—त्यांच्या पुत्राचें—कर्तव्य

आहे ! वडिलांना सोडविण्याच्या कामांत मला राजद्रोह करावा लागला तरी हरकत नाहीं ! जे चांडाळ माझ्या निरपराधी पित्याचा छळ करून, त्याच्या जिवाचा बळी घ्यावयाला तयार झाले, त्यांचे तिळातिळाएवढे तुकडे केल्याशिवाय माझा जीव स्वस्थ राहील काय ? वडिलांना मुक्त करणें म्हणजे राज्यक्रांति करणें आहे, हें मी समजतों. पण त्याला मी तयार आहें येवढेंच नव्हे, तर सूड उगविण्यासाठीं अशी क्रांति मी घडवून आणणार ! [ पडद्यांत शब्द होतो. " धिक्कार, धिक्कार तुझ्या जन्माला ! धिक्कार असो तुझ्या पराक्रमाला ! ] ( क्रोधानें ) कोण म्हणतो धिक्कार तुझ्या जन्माला व धिक्कार तुझ्या पराक्रमाला म्हणून ?

( इतबारराव, शिपाई वगैरे प्रवेश करतात. )

इ०—( पुढें येऊन ) मी म्हणतों धिक्कार तुझ्या जन्माला आणि धिक्कार तुझ्या पराक्रमाला म्हणून ! जर तूं बोलतोस याप्रमाणें करणार असशील, तर तुझ्या जन्माला व पराक्रमाला धिक्कार असो !

**वि०**—माझ्या जन्माला आणि पराक्रमाला धिक्कार ! आणि तो धिक्कारही आपणाकडून ! याला मी कसा पात्र होतों तें समजत नाहीं. आपणच विचार करावा कीं, मी आजपर्यंत कसा पुत्रधर्मानें वागत आलों आहें ? आपलें वांछित कशाप्रकारें सिद्धीला जाईल, आणि आपली प्रीति व प्रसन्नता कशा तऱ्हेनें वृद्धिंगत होतील, याखेरीज अन्य वस्तूचें चिंतन मी केलेलें आपणाला आठवतें काय ? जसे आपण या राज्यांतील परमपूज्य विभूति आहां, तसेंच या भूतलावरचें माझें परमपूज्य दैवत आहांत. अशा विभूतीला व दैवताला जर अन्यायानें दिलेल्या शिक्षेंतून मी सोडविलें नाहीं, तर माझ्या जिण्यांत पुरुषार्थ तो काय राहिला ? असें जर मी न करीन, तर माझ्या नामर्दपणाचा डांगोरा तमाम दुनियेंत पिटला जाईल ! मी इशारा देतांच जीवास जीव देणारे शेंकडों सरदार व शिपाई माझा हुकूम मानण्यास तयार होतील. असें जर आहे तर आपली सुटका मी कां करूं नये ?

इ०—राष्ट्राच्या कल्याणासाठींच जर मी आपण होऊन हें संकट पतकरलें आहे, तर यांतून माझी सुटका ती काय करायची, आणि ती कशी करायची, हेंच मला समजत नाहीं!

वि०—आपलें प्राण वांचावे व राष्ट्राचेंही कल्याण व्हावें हेंच मला पाहिजे आहे.

इ०—प्राण वांचवून राष्ट्राचें कल्याण करण्याची वेळ असती, तर मी तसेंच केलें असतें. परंतु तसें ज्या अर्थीं होऊं शकत नाहीं, त्या अर्थीं प्राण गमावूनसुद्धां राष्ट्राचें कल्याण साधावें, हा माझा निश्चय वज्रलेप झाला आहे.

वि०—वज्रलेप!

इ०—होय. हा निश्चय वज्रलेपाप्रमाणें अढळ आहे.

वि०—( इतबाररावाच्या पायावर डोकें ठेवून ) बाबा! नका, नका असें बोलूं! महामंडलेश्वर हा अन्यायी, दुर्वृत्त व मूर्ख राजा आहे. त्याच्या ठिकाणची स्वामिभक्ति अस्थानीं झाली आहे. आतां पितृभक्तीचा जाज्वल्य पराक्रम दाखविण्याची मला कृपा करून संधि द्या, एवढेंच मागणें आहे.

इ०—**स्वामिभक्ति हें आमच्या कुळाचें ब्रीद आहे. आणि त्याच्या आड येणारी ही तुझी पितृभक्ति ही मुळीं पितृभक्तीच नव्हे.** ही मी कधींच मान्य करणार नाहीं. मला सोडविण्याची व्यर्थ आशा या उपर तूं करूं नको.

वि०—( रागानें ) ही आशा मी धरूं नये काय? आपणाला जर असेंच वाटलें तर माझा नाइलाज आहे. जगांत लक्षावधि पोरें पोरकीं होतात त्यांपैकींच मी आहें असें मला याउपर समजलें पाहिजे. कांहीं चिंता नाहीं. मी पोरका झालों तरी अन्यायाचें स्मरण माझें कोणी नेलें नाहीं! माझें सर्व बळ व बुद्धि खर्चून या राजाला गादीवरून काढण्याचा प्रयत्न मी अव्याहत चालवीन. व अन्यायाचा सूड घेईन तेव्हांच माझे प्रयत्न थांबतील!

इ०—राजाचा अन्याय आणि त्याबद्दल प्रजेवर सूड ! अरेरे, बाळा विक्रमा, अविवेकानें या वेळीं तुझी दृष्टि किती अंध झाली आहे, हें पाहून मनाला फार वाईट वाटतें ! महामंडलेश्वराला पदच्युत करणें मला योग्य वाटतें, तर ती गोष्ट मला सहज करतां आली असती. सैन्याचा आणि प्रजेचा कल माझे बाजूचा किती आहे, हें तुला ठाऊकच आहे; पण मीं असें केलें असतें, तर आमच्या राज्यांत परक्यांचा रिघाव होऊन हं राज्य उध्वस्त झालें असतें. आपल्या एकट्याच्या रक्षणासाठीं राज्य उध्वस्त करण्यापेक्षां, प्राण गेला तरी जावो, असें म्हणून राष्ट्रदेवतेला या देहाचा बळी अर्पण करण्यास मी सिद्ध झालों. अशा रीतीनें वागणारा जो मी, त्या माझ्या पुत्रानें अहंमन्यतेच्या भरीस पडावें, आणि या संपन्न राष्ट्रांत रक्ताचे पूर वाहवून आपला पराक्रम गाजवावा, यापेक्षां या सेनापतीच्या वंशास लांछनास्पद गोष्ट ती कोणती? बाळा, मी काय करतों आहें, व तूं कोणीकडे भटकत चालला आहेस?

वि०—( गोंधळून ) बाबा, काय करूं, सूड घेण्याच्या विचारांनीं माझें मन क्षुब्ध होऊन गेलें आहे. या वेळीं कसें वागावें हें मला सुचेनासें झालें आहे.

इ०—माझ्या स्थितींत जर इतर कोणी असता तर तो तुला असें सांगता कीं, जेथें हल्लीं सेवेची व गुणाची पारख होत नाहीं, असें हें राज्य सोडून तूं दूरदेशीं जाऊन रहा. परंतु सेनापतीच्या कुळांत जे उत्पन्न झाले आहेत, त्यांनीं असा उपदेश सांगूंही नये, व ऐकूंही नये. माझें सांगणें तुला असें आहे कीं, तुझ्या कुळाच्या परंपरेप्रमाणें तूं याच राजाची एकनिष्ठपणें सेवा करीत जा.

वि०—( हात जोडून ) बाबा दया करा, दया करा. पोटाची खळगी भरण्यासाठीं अन्नाचा घास पाहिजे खरा, पण तो मागण्यासाठीं, ज्या राजानें आपला खून केला त्याच्या दारांत मला उभा करूं नका.

त्या राजाविषयीं द्वेषाग्नि माझे मनांत धुमसत असतां खोटा विनय, खोटी प्रीति, खोटें हास्य याचें नाटक त्यापुढें माझे हातून करवूं नका. महामंडलेश्वराचा द्वेष न करण्याविषयींची आपली आज्ञा जर मला पाळायची तर मी त्यापासून जितकें दूर राहावें तितकें चांगलें!

इ०—विक्रमा, तुझे हे निराशेचे उद्गार ऐकून मोठें आश्चर्य वाटतें! अरे, इतक्या लढाया मी मारल्या तींतल्या एखादींत मीं मेलों असतों तर माझ्या मृत्यूनेंसुद्धां तुला फार धन्यता वाटली असती, आणि त्या मृत्यूचे तूं देव्हारे माजविले असतेस; ते कां म्हणून? राज्याच्या रक्षणाकरितां मी मेलों एवढ्याच करितां ना? मग हल्लीं तरी मी याच श्लाघ्य हेतूनें, आपण होऊन, मरत आहें, याचें दुःख तुला कां वाटावें? लढाईत मरण आलें काय, आणि राजानें वध करविला काय, राज्यरक्षण हें दोहोंचें फळ एकच आहे. **तुला राजा या व्यक्तीची सेवा करायला मी सांगत नाहीं व ती तूं करूं नकोस. राजसेवेच्या द्वारें तुला राष्ट्रसेवा करावयाची आहे; आणि ती सेवा करणें हें तुझ कर्तव्य आहे.**

वि०—पण महामंडलेश्वराची चाकरी करण्यानें राष्ट्राचें कल्याण तें कितीसें होणार?

इ०—तसें कल्याण जर होणारें नसतें, तर मीं तरी तुला संकटांत कां घातलें असतें? ऐक. माझ्या बाबतींत जो हा महाराजांनीं अन्याय केला आहे, त्यायोगानें सारें राज्य खळबळून जाऊन सैन्यांतले लोक बिथरले आहेत, व तुझी यत्किंचित जरी अनुकूलता दिसली तरी हे लोक बंडावा करतील. त्यांतच आपल्या राज्याचा शत्रु सामंत हा सरहद्दीवर सैन्याची तयारी करून राहिला आहे. या संकटाचे वेळीं तूं जर महाराजांच्या पक्षाचा अवलंब केलास तर हे बिथरलेले लोक आपोआप शांत होतील, व मग शत्रूचेंही भय नाहीं. ज्या राष्ट्रांत तूं जन्म पावलास त्यावरील हा आणीबाणीचा प्रसंग निभावून नेण्याचें श्रेय तुला

प्राप्त होऊन लाखों लोकांचा दुवा मिळेल. इतकें सारें होण्यास तूं राजसेवा करावीस हा एकच मार्ग आहे. व ती तूं कर, हीच अंतकाळीं माझी मागणी तुजजवळ आहे. ही माझी अंतकाळची मागणी तूं मान्य करणार कां अमान्य करणार ?

**वि०**—बाबा, नका हो असें बोलूं ! जन्मांत मी कधीं आपली आज्ञा अमान्य केली नाहीं, ती या वेळीं तरी कशी करीन ? आपल्या आज्ञेवरून महाराजांविषयींचें वैर मी मनांत ठेवीत नाहीं. वैऱ्यावर सूड घेण्याची इच्छा आतां मला दुर्जनसिंगाचा उच्छेद करूनच भागविणें प्राप्त आहे.

**इ०**—छे, छे ! तीही तुला मोकळीक नाहीं. दुर्जनसिंगाच्या वाटेला तूं जातां कामा नये.

**वि०**—( उसळून ) काय ? ज्या अधमानें दरबारांत नाना प्रकारचीं दुर्भाषणें व आरोप करून महाराजांकडून आपला प्राण घेवविला, तो माझा वैरी दुर्जनसिंग रात्रंदिवस माझ्या डोळ्यांसमोर उभा असतां, त्याच्याकडे वांकड्या नजरेनें बघावयाचें सुद्धां नाहीं ? हा केवळ जुलूम आहे, बाबा ! हा आत्मसंयम देवांचा किंवा ऋषींचा आहे. माणसांना तो शक्य नाहीं.

**इ०**—हा आत्मसंयम कोणाचाही असो, तो तुला केलाच पाहिजे. कारण कीं यासंबंधानें दरबारांत मी वचन दिलें आहे. दुर्जनसिंग महाराजांशीं जोंपर्यंत इमानानें वागेल, निदान वागतो असें तरी दाखवील, तेथपर्यंत तूं त्याच्या वाटेला जायचें नाहींस !

**वि०**—( स्वगत ) **या दुनियेंत मनुष्याला खरें महत्व प्राप्त करून घेण्याचे मार्ग किती दुर्गम व क्लेशदायक आहेत !** (उघड) बाबा, ज्या राजानें माझें कुळ धुळीला मिळविलें, त्याचे अपराध गिळून मी त्याची एकनिष्ठपणें सेवा करावयाची; आणि त्या राजाच्या दुष्ट कर्माला प्रवृत्त करणारा कलिपुरुष दुर्जनसिंग याच्याही वाटेला मी जावयाचें नाहीं,

या दोन्ही गोष्टी फारच दुष्कर आहेत. तथापि आपली आज्ञा म्हणून या दोन्ही गोष्टी मी मान्य करितों.

इ०—पुरे; मला इतकें पुरे. माझ्या पायांवर हात मार, आणि घे शपथ !

वि०—ही घेतली शपथ ( इतबाररावाच्या पायांवर हात ठेवितो. ) दोन्ही बाबतींत आपल्या आज्ञेप्रमाणेंच मी वागेन, याला हेच पाय साक्ष !

इ०—माझ्या स्वार्थत्यागाचें फळ मला आतां मिळालें. मी कृतार्थ झालों !

वि०—पण बाबा माझ्या अंतरात्म्याची तळमळ अजून चालूच असतां मी कृतार्थ कसा होईन ? शिवाय आपण सांगितलेलें हें असिधाराव्रत आचरीत असतां केव्हां माझ्या हातून प्रमाद होईल याचें भय वाटतें !

इ०—राष्ट्राच्या कल्याणाकरितां हें व्रत आचरणें तुला प्राप्त आहे. तुझी विद्या, विनय, पौरुष, व चारित्र्य हीं बहुधा तुला भलत्याच मार्गानें जाऊं देणार नाहींत. शिवाय पूर्वजांनीं माझ्या हवालीं केलेली एक देणगी तुला मी आतां देतों. राजानें माझी सर्व मालमत्ता जप्त केली, तरी एवढी अमोल वस्तु तुला देण्याला माझे जवळ राहिली आहे, ही केवढी भाग्याची गोष्ट आहे ! ( कमरेची तलवार सोडून ) कुलपरंपरेनें माझ्या हातीं आलेली “ **तारिणी** ” नांवाची तलवार मी तुला देतों. आम्ही स्वकर्तव्य बजावीत असतां अनेक घोर संकटांतून हिनें आम्हांस तारिलें आहे, आणि म्हणूनच इचें “ तारिणी ” हें नांव यथार्थ आहे. जेव्हां जेव्हां तुला दुर्निवार मोह उत्पन्न होईल, तेव्हां तेव्हां ही तारिणी तुला या प्रसंगाचें स्मरण देऊन मार्गावर आणील. ( विक्रमसिंगाच्या कमरेस तलवार बांधतो. ) इच्या सहवासानें तूं आमच्या कुळांतला आठवा सेनापति होशील हाच माझा तुला आशीर्वाद आहे. जा; माझ्या लाडक्या, तुझी माझी हीच शेवटची भेट !

**वि०**—( रडत ) काय ? हा आपल्या सहवासाचा शेवटचा क्षण मी समजावयाचा ना ?

**इ०**—होय, आतां मी अशा महायात्रेला चाललों आहें, कीं जेथून पुनः इहलोकीं परत येणें नाहीं. या यात्रेच्या अंतीं ज्याचा मंगलमय सहवास चिरंतन आहे, त्या परमेश्वराच्या चरणाचें ध्यान करण्याकडे मी आतां मन लावीत आहें. याकरितां कोणीं रुदन अथवा विलाप करून माझ्या मनाला विक्षेप होऊं देऊं नये.

**वि०**—( इतबाररावाच्या पायांवर लोळण घेऊन ) आतां हे पाय मला जन्माचे अंतरले !

**इ०**—( आसवें पुसून ) पुरे, पुरे हा मोह; दुर्गपाल, अहो शिपाई, चला, चला आतां येथून लौकर ( इतबारराव व शिपाई जातात. )

**वि०**—( दुर्गपाळास थांबवून ) अहो दुर्गपाळ, एकदां तरी वडिलांचें दर्शन मला डोळे भरून स्वस्थपणानें घेऊं द्या !

**दुर्ग०**—( उसासा टाकून ) आतां कुठचें त्यांचें दर्शन ? पहा ते पार निघून गेले !

**वि०**—गेले ! गेले ! त्यांबरोबरच या दुर्दैवी विक्रमाचे प्राण कां नाहीं गेले ? आतां या परम असह्य दुःखाचा परिहार होण्याला काय हो प्रयत्न करूं ?

**दुर्ग०**—बाबा रे, हा मानवी यत्नाचा विषय नव्हे. या संसाराच्या अनादि महानाटकांत असंख्य सुखदुःखांचे प्रसंग निर्माण करून, त्यांचें अतर्कित प्रकारांनीं पर्यवसान करणारा स्वच्छंदी महानाटककार जो भगवान् **काल**, तोच तुझ्या दुःखाचा परिहार करो ! ( जातो. )

**वि०**—हाय ! हाय ! ( मूर्छित पडतो. )

( पडदा पडतो. )

---

## घडा ४१

# भरतभाव

भरत जवळि नाहीं मातुल-ग्राम-वासी,
भरतजननि धाडी कानना राघवासी;
दशरथ मृत झाला राम जातां वियोगें,
तृण बहुत दिसांचें अग्निच्या जेविं योगें. १

मग भरत वसिष्ठें आणिला जों अयोध्ये,
नगरि गत-धवा तों आणि निर्वीर्य योद्धे
जन मृत-सम देखे, हेतु कांहीं कळेना,
जननि-कृत कुचेष्टा बुद्धितें आकळेना. २

वृत्तांत सांगे भरतासि माय,
स्वानंद जीचा त्रि-जगीं न माय;
भेदूनि वक्षःस्थल शब्द तीचा,
करी महा क्षोभ महामतीचा. ३

जाळील तीतें निज-दृष्टि-पातें,
पाहे असा, हालविनाच पातें;
म्हणे, " अवो, पापिणि, पाप-रूपे,
जळो तुझें तोंड जडस्वरूपे. ४

जाळीन हें तोंडचि जाण आधीं
मुखें जया देशि अनंत आधी;
न माय तूं, वैरिण होसि साची,
माझे मनीं भाव खरा असाची. ५

केला तुवां देखत भर्तृघात,
क्षणें तिवाटा रचिल्या तिघांत;

शत्रुघ्न मी, लक्ष्मण राम, जोडे,
 राजा तिजा, तींस अनर्थ जोडे. ६
वना धाडिलें जेधवां रामराया,
 तुवां हेतु केला स्वभर्ता मराया;
अहा, राम-सीता अशा दंपतीतें,
 वना धाडिलें, मारिलें कां पतीतें ? ७
न कळत पतिताचें खादलें अन्न वोकी
 तरि पतित नव्हे तो, पापरूपे अवो कीं;
म्हणुनि उदरिं तूझ्या देह हा जन्मला गे,
 त्यजिन तरि मला हें पाप तूझें न लागे. ८
मारील सद्य मज खाइन त्या विखातें,
 कीं पापियास निज पातक जेविं खातें;
तूं पापिणी त्वरित जाशिल रौरवासी,
 होसी सदा निरय-दारुण-लोक-वासी. " ९
धिक्कारूनी गोष्टि मातेसि सांगे;
 कौसल्येच्या ये गृहा सानुरागें;
त्यातें देखे जेधवां राममाय,
 श्रीरामाचा शोक लोकीं न माय. १०
मोकळा करुनि कंठ तेधवां
 आठवूनि मनिं जानकी-धवा;
ते रडे, भरतही तसा रडे
 जोंवरी नयन होति कोरडे. ११
म्हणे, " वासरा, घात झाला असा रे !
 तुझ्या माउलीचेच हे खेळ सारे;

वृथा धाडिला राम माझा वनासी
न देखों शके त्या जगज्जीवनासी. १२

जानकी जनक राजकुमारी
पाय कोमल जिचे सुकुमारी;
चालली जसि वना अनवाणी,
बोलली कटकटा जनवाणी." १३

भरत शोक अनेक तिचे असे
परिसतां मग बोलत तो असे;
" जननि, गोष्टि समस्तहि हे खरी
परिस येविषयीं मम वैखरी. १४

मी ब्रह्महत्याशतपाप लाहें
ठावें असे लेश जरी मला हें;
खड्गें वसिष्ठासि अरुंधतीतें
वधीं, जरी ठाउक हें मतीतें." १५

म्हणे राममाता, " अरे वासरा, मी
तुझा जाणतें प्रेमउल्हास रामीं;
तुला रामसेवेविणें काम नाहीं,
न राज्यादिकांची जया कामनाही. " १६

तों वसिष्ठ वदला भरतातें,
रामपाद-निज-लाभ-रतातें,
" पाळि यावरि समस्त धरा हे,
राज-नीति करिं सावध राहे. १७

रायें तुतेंचि दिधलें स्व-नृपासना, रे !
सं-पूर्ण तूं जननिची करि वासना, रे ! "

शब्दार्थ हे न कळती गुरु-लाघवाचे
साचे म्हणूनि पद आठवि राघवाचे ! १८
स्मरोनि ऐसें रघुनंदनातें,
त्या राघवाच्या पदवंदनातें
जावें, असा भाव धरूनि साच
बोले वसिष्ठाप्रतिही तसाच. १९
पायीं निघे भरत सानु-ज राम-वाटे,
रामाविणें इतर इष्ट न काम वाटे;
माथां जटा-मुकुट, वल्कल नेसला, हो !
श्री-राम-वेष, वदनीं प्रभुनामलाहो. २०

**वामनपंडित**

---

### घडा ४२

## संशयरत्नमाला

उठतां बहु त्वरेनें, 'कोठें जातां ?' असें तुम्हां देवी ।
पुसती झाली जाणों, पुसतां ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥
किंवा नारद आला, आलापीत स्वकीय सच्चरितें ? ।
प्रेमळ गीत तुम्हांला हरि ! हरिणापरिस बहुत वश करितें ॥ २ ॥
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गांत आडवें पडलें ? ।
शरणागत-भय-शमना ! यास्तव येणें तुझें नसे घडलें. ॥ ३ ॥
किंवा तुज एकाकी पाहुनि खळ-दैत्य आडवे आले ? ।
फुटतां सागर सिकतासेतूचें काय त्यापुढें चाले ? ॥ ४ ॥
अथवा येतां झाला तन्मय शिवतांडवांत कैलासीं ? ।
केला असेल गरुडें गर्व पुन्हां काय त्याच बैलासीं ! ॥ ५ ॥

किंवा तुज गुंतविलें भजकीं ? परि ते दयार्द्र या रंकीं; ।
उद्धरित्यासि न सज्जन गुंतविती, गाय कष्टतां पंकीं. ॥ ६ ॥
किंवा चुकतें कांहीं स्तवनीं ? तेणेंचि मागुता बससी; ।
तरि हें मन्मूर्खत्व; प्रभु तूं दोषज्ञही तसा नससी. ॥ ७ ॥
'कीं भीतो भ्रांत वृथा, मृग-जल-मग्नासि काय तारावें ?' ।
म्हणतां असें कसें ? शिशु-भय जाया बागुलासि मारावें. ॥ ८ ॥
किंवा बरी परीक्षा केल्यावांचूनि न प्रसाद करां ।
तरि वरि तसाचि आंतहि; उगाळितां कोळसा प्रयास करां ! ॥९॥
कीं कांहीं व्रतनियमें बोलों चालों नये, असें झालें ? ।
तरि दीनरक्षणाहुनि अधिक-फळ-व्रत कधीं मना आलें ? ॥ १० ॥
कीं बहुकाळ विसरला फारचि संकोचला सखा लाजे, ।
येत असेल हळुहळू, म्हणुनचि एकहि न पादुका वाजे ? ॥ ११ ॥
कीं प्रथम मदपराधें 'तारूं ना' म्हणुनि वाहिल्या आणा ? ।
प्रभुजी, पुरे प्रतिज्ञा, भारत-रणवृत्त तें मनीं आणा ! ॥ १२ ॥
कीं वैकुंठीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे, नसावेंचि; ।
वसवा पुरें, पुरे कां म्हणतां ? धनवंत कण कसा वेंची ? ॥ १३ ॥
कीं भेटि बहुदिसां, भय भेटाया दीनबंधुला वाटे ? ।
तरि भेटावें विधिनें गेले जाताति साधु ज्या वाटे. ॥ १४ ॥
कीं भीशी, मज एका उद्धरितां लागतील फार झटे ? ।
तरि कोणाहि न कळतां न्यावा झाकोनि दास पीत-पटें ! ॥ १५ ॥
कीं लक्ष-भोजनापरि केला संकल्प संपला, देवा ? ।
तरि दाते क्षुद्विकळा मग न म्हणाति काय, 'या बसा, जेवा'? ॥१६॥
कीं एक मीच उरलों पापी, हें बीज ठेविलें जतन ।
वतन स्वकीय मज कां करितें त्वन्नाम मंगलायतन ! ॥ १७ ॥

कीं कार्य-बहुत्वें तुज फावेना यावया, जगत्पाळा ? ।
तरि रूप घ्या दुजें, ती विद्या कंठीं वसे, जशी माळा ! ॥ १८ ॥
कीं मागें गुप्त उभा अससि प्रेमें, उभारुनी बाहे ? ।
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकशी बा, हे ? ॥ १९ ॥

मोरोपंत

---

## धडा ४३

## सीतादेवीचें दिव्य

राक्षसाधम रावणानें सीतेचें हरण करून तिला लंकेंतील अशोक वनांत नेऊन ठेविल्यापासून त्या साध्वीचे दिवस अत्यंत कष्टांत जात होते. मध्यंतरीं मारुतीनें येऊन तिला रामाकडील वार्ता सांगितली तेव्हां-पासून तिला आपल्या सुटकेची आशा उत्पन्न झाली होती. परंतु राव-णाकडून आपली स्त्री होण्याबद्दल तिला प्रत्यहीं होणारा जाच, व युद्धांत रामचंद्राला यश मिळेल कीं नाहीं याविषयींची काळजी, यामुळें ती अत्यंत कृश व निस्तेज होऊन गेली होती, व केव्हां एकदा या भयंकर बंदिवासांतून आपली मुक्तता होईल म्हणून एकेक दिवस मोजीत होती.

शेवटीं रावणाचा वध केल्यानंतर राम हनुमानास म्हणाला "बा, हनु-माना, सीतेला ही आनंदाची बातमी सांगून आमचें कुशल कळविण्यास तूंच योग्य आहेस." आज्ञेप्रमाणें मारुती मोठ्या त्वरेनें अशोक वनांत जाऊन सीतेसमोर उभा राहिला; व म्हणाला, "हे वैदेही, रामचंद्रानें तुला असा निरोप कळविला आहे कीं, वानरांच्या व बिभीषणाच्या साहाय्यानें मी रावणास मारिलें आहे. तर आतां तूं काळजी करूं नको." हे शब्द ऐकून सीतेच्या नेत्रांतून आनंदाश्रु घळघळ वाहूं लागले, व कांहीं वेळ तोंडांतून शब्द निघेना. मग ती म्हणाली, "हनुमाना, या आनंदाच्या वार्तेबद्दल मी तुझी कशी उतराई होईन, हेंच मला समजत

नाहीं. आतां रामचंद्रास माझा इतकाच निरोप सांग कीं, मी आपल्या भक्तवत्सल पतीचें मुख पाहूं इच्छितें." मारुतीनें हा निरोप ताबडतोब जाऊन रामचंद्रास कळविला. तो ऐकून रामचंद्र अत्यंत दुःखित होऊन कांहीं वेळ स्तब्ध बसले; व दीर्घ उच्छ्वास टाकून जमिनीकडे डोळे लावून बिभीषणास म्हणाले "बिभीषणा, सीतेला स्नान घालून, व उत्तम वस्त्रालंकारांनीं भूषित करून येथें लवकर आणवा; विलंब करूं नका."

त्या आज्ञेप्रमाणें बिभीषणानें सीतेला स्नान करण्याची विनंति केली. तिची तशी इच्छा नव्हती; तरी भर्त्याची आज्ञा शिरसावंद्य करून, तिनें स्नान केलें; उत्तम वस्त्रें परिधान करून अलंकारही घातले; व शिबिकेंत बसून बिभीषणाबरोबर निघाली. ती वानरसैन्यापाशीं येतांच पालखीजवळच्या चोपदारांनीं हटा, हटा म्हणून वानरांना बाजूला सारण्यास आरंभ केला. तेव्हां किंचित् क्रुद्ध होऊन रामानें म्हटलें; "या वानरांना विनाकारण कां त्रास देतां? सीतेला शिबिकेंतून उतरून येथें पायींच येऊं द्या. जिच्याकरितां वानरांना मी इतका त्रास दिला तिला, त्यांना पाहूं द्या." हें कठोर भाषण ऐकून सर्वांना मोठा अचंबा वाटला. तरी आज्ञेप्रमाणें बिभीषणानें सीतेला पायींच सर्वांच्या समक्ष रामापाशीं आणून उभें केलें.

आपलें परम दैवत म्हणजे पति असें मानणारी सीता मोठ्या प्रेमानें, विस्मयानें व हर्षानें रामाच्या मुखाकडे पाहूं लागली. पण त्या मुखावर या वेळीं तिला प्रीतीची छाया मुळींच दिसेना. उलट त्यावर उदासपणा व रोष यांचीच झांक मारत होती. ती रामाची विलक्षण स्थिति पाहून सीतेचें हृदय भीतीनें कांपूं लागलें. इतक्यांत रामचंद्र म्हणाले:—"सीते, शत्रूला ठार मारून तुला बंदिवासांतून मी सोडविलें आहे. शूर पुरुषानें जें कर्तव्य करावयाचें तें मी केलें आहे. माझ्या शत्रूचा व अपमानाचा

नाश मी एकदमच केला आहे. एका दुराचारी परपुरुषानें माझी स्त्री बलात्कारानें नेली, हा माझ्या नांवाला लागलेला कलंक मी आज माझ्या प्रयत्नानें धुवून टाकला आहे. माझा मित्र हनुमान व इतर वानरगण यांच्या श्रमांचें आज सार्थक झालें आहे;"—याप्रमाणें रामचंद्र बोलत असतां ते पुढें काय बोलतात या जिज्ञासेनें सीतेचें हृदय कंपित होऊन ती त्यांकडे टक लावून पहात होती; तों रामचंद्र पुढें म्हणाले—"पण सीते, हा जो एवढा अट्टाहास मी केला, तो तुझ्याकरितां नव्हे, हें तूं लक्षांत घेतलें पाहिजे. हा खटाटोप माझ्यावर व माझ्या विख्यात कुलावर जो कलंक आला होता तो धुवून काढण्याकरितां होता. कां कीं, तुझ्या शुद्धपणाविषयीं शंका येण्याला जबर कारण उत्पन्न झालें आहे. तूं आतां माझ्यापुढें उभी आहेस, ती मला आनंद देत नसून डोळे आलेल्या मनुष्यास दिवा नकोसा होतो, त्याप्रमाणें तुझें मुख पाहूं नये असें मला वाटतें. तर सीते, तूं येथून वाटेल तिकडे जा. दाही दिशा तुला मोकळ्या आहेत. कोणता कुलीन व तेजस्वी पुरुष परगृहांत बराच काळ कैदेंत टाकलेल्या स्त्रीस लोभांत गुंतून घरांत परत घेईल?" असें म्हणून क्रोधानें लाल झालेलें आपलें मुख रामचंद्रांनीं सीतेकडून दुसरीकडे फिरविलें.

रामाचें हें कठोर भाषण ऐकून सीतेला डोक्यावर जशी वीज कोसळावी तसें झालें! ती दुःखाच्या वेगानें मूर्च्छित होऊन खालीं पडली असती, पण रागाच्या भरानें तिला सांवरून धरलें. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या, व सद्गदित कंठानें ती म्हणाली: "रामचंद्रा, जसा एखादा प्राकृत पुरुष आपल्या बायकोला टाकून बोलतो तसें आपण मला कां बरें बोलतां? जशी तुम्हांला शंका आहे तशी मी नाहीं. रावणानें मला उचलून नेलें, त्याला माझा इलाज नाहीं. पण माझें मन माझ्याजवळ आहे. तें आपणाखेरीज परपुरुषाकडे कधीं गेलें

नाहीं. जर तुमच्याबरोबर इतकीं वर्षें काढूनही माझी ओळख तुम्हांस झाली नाहीं, तर माझें दुर्दैव पुरतेंच ओढवलें असें म्हटलें पाहिजे. मग आपण हनुमानाला माझी स्थिति पाहण्याकरितां वनांत पाठविलें त्याच वेळीं कां माझा त्याग केला नाहीं ? तसें होतें तर मी त्याच्यासमोरच प्राण दिला असता, व आपला हा सर्व खटाटोप वांचला असता! "— पुढें तिच्यानें बोलवेना. कांहीं वेळानें ती लक्ष्मणास म्हणाली, "लक्ष्मणा, आतां यांतून एकच तरणोपाय आहे. काष्ठें आणून तूं मजकरितां एक चिता तयार कर, म्हणजे मी त्या चितेंत उडी घेतें. मी शुद्ध असेन तर **अग्नि-नारायण** मला जाळणार नाहीं; व पापी असेन तर जळून मरणें हेंच मला उचित आहे!"

लक्ष्मणानें अत्यंत दीन मुद्रेनें रामाकडे पाहिलें, तों त्यानेंही खुणेनें परवानगी दिली; तेव्हां लक्ष्मणानें लागलींच चंदनकाष्ठें आणवून चिता पेटविली. चिता तयार होऊन भडका होतांच सीता अधोवदन झालेल्या रामाला एक प्रदक्षिणा घालून अग्नीपाशीं आली; व देवब्राह्मणांना नमस्कार करून व हात जोडून अग्नीला म्हणाली, " हे अग्निनारायणा, तूं सर्व लोकांचा साक्षी आहेस. माझें चित्त जर रामचंद्राशिवाय दुसऱ्याकडे कधींही गेलें नसेल, तर माझें रक्षण कर." याप्रमाणें प्रार्थना करून तिनें निःशंकपणें अग्नींत उडी टाकली! हजारों स्त्रिया व पुरुष तिचें तें दुष्कर कर्म पाहण्यास जमा झाले होते. वानरांच्या व राक्षसांच्या तोंडून एकदम 'हाय हाय' असा शब्द निघून एकच आक्रोश झाला. इतक्यांत भगवान् अग्निदेव स्वतः सीतेला हातांत धरून चितेबाहेर निघाला! मध्यान्हींच्या सूर्याप्रमाणें देदीप्यमान दिसणारी, सुवर्णाच्या दिव्य अलंकारांनीं विभूषित झालेली, तांबडें वस्त्र परिधान केलेली, दिव्य पुष्पमाळा गळ्यांत घातलेली, व निरुपम सौंदर्यवती ती सीतादेवी रामचंद्राच्या स्वाधीन करून अग्निदेव रामाला म्हणाला, " ही आपली सीता सांभाळ.

ही अत्यंत शुद्ध व निष्पाप आहे. हिचा प्रतिपाळ कर." याप्रमाणें अग्नीनें स्वतः सीतेच्या पावित्र्याबद्दल खात्री केल्यानंतर रामाला जो आनंद झाला, तो कोठवर वर्णावा! थोडा वेळ स्तब्ध राहून त्यांनीं अग्नीस उत्तर केलें, "सीतेनें हें दिव्य करणें जरूर होतें, कारण रावणाच्या अंतःपुरांत दीर्घकाल राहिल्यावरही जर मी तसेंच सीतेचें ग्रहण केलें असतें, तर लोक मला मूर्ख व स्त्रीलोभी म्हणाले असते. सीतेच्या शुद्धतेविषयीं मला स्वतःला बिलकुल शंका नव्हती. पण **राजानें लोकांच्या शंकेकडे पाहिलें पाहिजे.** आतां आपण विशुद्ध करून माझी भार्या मला परत दिली आहे, तेव्हां तावून काढलेल्या सोन्याप्रमाणे ती मला अधिकच प्रिय झाली आहे."

रामचंद्र असें म्हणत आहेत तों इंद्रादि देवता आकाशांत येऊन त्यांनीं रामचंद्रावर व सीतेवर पुष्पवृष्टि केली. चोहोंबाजूंनीं 'धन्य' 'धन्य' असा एकच जयध्वनि उठला. सर्व वानर, राक्षस वगैरेंनीं रामचन्द्राभोंवतीं जमून जयजयकाराची एकच गर्जना केली. त्या वेळीं आनंदाची पराकाष्ठा झाली! रामचंद्राला व सीतेला जो आनंद झाला तो शब्दातीत होता. नंतर लवकरच सुमुहूर्तावर बिभीषणाला लंकेच्या सिंहासनावर स्थापून रामचंद्र सीतेसहवर्तमान अयोध्येकडे जाण्यास निघाले.

**रा. ब. चिं. वि. वैद्यकृत**
रामचरित्रावरून.

---

### धडा ४४

## पानपतची लढाई

श्रीमंत **बाळाजी बाजीराव** ऊर्फ **नानासाहेब पेशवे** यांच्या कारकीर्दींत मराठ्यांच्या उत्कर्षाचा कळस झाला. बहुतेक दक्षिण

व कर्नाटक या वेळीं मराठ्यांच्या अमलाखालीं आलीं होतीं. गुजराथेंत त्यांचा अंमल होताच. मध्यहिंदुस्थान व गोंडवण या प्रांतांतही शिंदे, होळकर, भोंसले वगैरे सरदारांनीं मराठ्यांची सत्ता स्थापन केली होती. नागपूरच्या भोंसल्यांनीं तर मराठ्यांचा दरारा कलकत्त्यापर्यंत बसविला होता. चौथ व सरदेशमुखीबद्दलचे जे हक्क मराठ्यांनीं मोंगल बादशहापासून मिळविले होते, त्यांच्यायोगानें सर्व ठिकाणीं आपला हात शिरकविण्याचें साधन त्यांना सांपडलें होतें. व थकलेली बाकी वसूल



नानासाहेब पेशवे

करण्याचे निमित्तानें ते वाटेल त्या मुलखावर स्वारी करून तेथें आपला अंमल बसवीत.

अद्याप मराठ्यांचा अंमल पंजाब प्रांतीं बसला नव्हता. तो मुलुख यावेळीं अफगाणिस्थानचा बादशहा **अहमदशाह अबदाली** याच्या ताब्यांत होता. पण इ. स. १७५८ सालीं, नानासाहेब पेशव्यांचा भाऊ **राघोबादादा** बरोबर मोठी फौज घेऊन तिकडे गेला, व त्यानें अहमदशाहाचा

पुत्र तैमूर यास हांकून लावून लाहोर हस्तगत करून घेतलें, व मराठ्यांचा भगवा झेंडा अटकेपार फडकविला! या स्वारींत मराठी लष्कराची खूब चंगळ झाली. मात्र राघोबाच्या भोळसटपणामुळें पेशव्यांस एक काडीचा लाभ न होतां, बरेंच मोठें कर्ज करून राघोबा भरारी परत आला.

पंजाबचें वर्तमान ऐकतांच अहमदशहा अबदालीस फार क्रोध आला, व बरोबर मोठें सैन्य घेऊन मराठ्यांचें पारिपत्य करण्याकरितां तो निघाला. त्यावेळीं त्याला संधिही फार अनुकूळ मिळाली. दिल्ली येथील वजीराची जागा मिळविण्याचे कामीं मराठे आपल्यास मदत करण्यास तयार नव्हते म्हणून **नजीबखान रोहिल्या**चा त्यांवर दांत होताच. त्यानें अयोध्येचा नबाब **सुजाउद्दवला** यास वश करून घेऊन, हिंदुस्थानांतील सर्व मुसलमानांच्या वतीनें अबदालीस पत्र लिहून विनंति केली कीं, आपण येऊन दिल्लीच्या पातशहास मराठ्यांच्या कैदेंतून सोडवावें. याप्रमाणें हिंदुस्थानांतील मुसलमानांची मदत मिळण्याचें आश्वासन मिळतांच अबदालीस फार उमेद आली, व तो झपाट्यानें चाल करून आला. तेव्हां त्याला अडविण्याचें काम एकट्या **दत्ताजी शिंद्या**वर पडलें. यमुनेच्या कांठीं तुंबळ युद्ध होऊन दत्ताजी पडला; व त्याचा पुतण्या **जनकोजी** जखमी झाला. मागाहून त्यास मदत करण्याकरितां आलेल्या होळकरांच्या फौजेचाही मोड झाला.

ही बातमी पुण्यास समजतांच नानासाहेबांनीं अबदालीचें पारिपत्य करण्याकरितां जंगी तयारी चालविली. या वेळीं अबदालीची खोड मोडली नाहीं तर मराठ्यांच्या शौर्याविषयीं उत्तर हिंदुस्थानांतल्या लोकांचें मन अगदीं वाईट होऊन पुढें तेथें अंमल बसविणें कधींहि शक्य होणार नाहीं, हें नानासाहेब पुरतें ओळखून होते; म्हणून त्यांनीं या कामीं कसलीही कसर ठेवावयाची नाहीं असा निश्चय केला. शूर पण भोळसट

राघोबादादा आतां त्यांच्या मर्जीतून उतरला होता. म्हणून त्यांनीं **सदा-शिवराव भाऊसाहेब** यांची रवानगी या स्वारीवर करावयाचें ठरविलें. भाऊसाहेब फार हुषार होते. व शिवाय कर्नाटकावरील मोहिमेंत व नुकत्याच निजामाशीं झालेल्या उदगीर येथील संग्रामांत त्यांनीं आपलें क्षात्रतेजही उत्तम रीतीनें दाखविलें होतें. तेव्हां या स्वारीवर त्यांचीच नेमणूक होणें साहजिक होतें. त्यांजबरोबर नानासाहेबांनीं खुद्द आपला मुलगा **विश्वासराव** यासही स्वारीवर पाठविलें.

या स्वारीचे वेळीं जेवढें मराठी सैन्य एकत्र झालें, तेवढें पूर्वी कधींही झालें नव्हतें, व पुढें कधींहि झालें नाहीं! स्वार, पायदळ, हत्ती, तोफखाना, व बाजारबुणगे मिळून अदमासें दोन लक्ष फौज जमा झाली होती असें म्हणतात. शिंदे, होळकर, गायकवाड, भोंसले, पुरंदरे, विंचूरकर, मेहेंदळे, समशेरबहाद्दर, पवार, बुंदेले, वगैरे झाडून सर्व सरदार व मानकरी आपापल्या इतमामासह हजर झाले होते. शिवाय कित्येक रजपूत संस्थानिकांनीं आपापलीं लहान लहान पथकें पाठविलीं होतीं. भरतपूरचा **सुरजमल्ल** जाटही येऊन मिळाला. पण निघतांनाच मराठ्यांनीं एक मोठी चूक केली होती. खुद्द भाऊसाहेब, विश्वासराव, मेहेंदळे, वगैरे अनेक सरदारांनीं आपलीं कुटुंबेंही बरोबर नेलीं होतीं. यापैकीं कित्येकांची मंडळी सहज जातां जातां काशीयात्राही करून येऊं म्हणून निघाली होती! बिचाऱ्यांना लढाई म्हणजे काय असतें, व तेथें कसले बिकट प्रसंग येण्याचा संभव असतो याची कल्पनाही नसावी! या लटांबरामुळें मराठ्यांच्या हालचाली फार सावकाश होत; व युद्धाच्या तयारीस व्यत्यय येई. भाऊसाहेबासारख्या नांवाजलेल्या योद्ध्याच्या हातून अशी चूक कशी व्हावी अशी शंका येणें साहजिक आहे. पण एकतर त्यास अबदालीसारख्या कडव्या व कावेबाज शत्रूशीं टक्कर देण्याचा आजवर प्रसंग नव्हता. हिंदुस्थानांत राहून चैन करण्यास

सोकावलेल्या नेभळट मुसलमानांपेक्षां अफगाणिस्थानच्या डोंगराळ मुलखांतले दांडगे व राकट अफगाण किती भिन्न असतात याची त्यांस कल्पना नव्हती. शिवाय आतांपर्यंत एकसारखें यश मिळत गेल्यानें ते जरा गर्वानें फुगून गेल्यासारखेही झाले होते. बायकामुलांस आसपासच्या किल्ल्यांत बंदोबस्तानें ठेवावें, व मग लष्कर पुढें चालवावें, अशी सुरजमल्ल जाटानें सूचना केली; व मल्हारराव होळकरानेंही तीस अनुमोदन दिलें. पण भाऊसाहेबांनीं ती मानली नाहीं.

---

### धडा ४५

## पानपतची लढाई

### भाग २ रा

इ. स. १७६० च्या जुलई आगस्टच्या सुमारास चंबळा उतरून भाऊसाहेब पलीकडे गेले. तत्पूर्वी त्यांनीं **गोविंदपंत बुंदेल्यांस** सुजाउद्दौला यास भेटून आपले पक्षास वळविण्याची खटपट करण्यास सांगितलें होतें. पण गोविंदपंतानें हें काम करण्यांत ढिलाई केली. यामुळें नजीबखानानें सुजाउद्दौल्यास अबदालीचे पक्षाकडे वळविलें. तथापि नजीबखान, सुजाउद्दौला, व अबदाली यांचीं सैन्यें मिळण्यापूर्वी स्वतंत्रपणें एकेकाचा समाचार घ्यावा असा भाऊसाहेबांचा बेत होता. कारण या वेळीं अबदाली अनुपशहरीं होता. नजीब व सुजा बिठूरास ( ब्रह्मावर्तास ) होते, व गोविंदपंत त्या दोघांमध्यें इटाव्यास होता. आग्र्याजवळ यमुना उतरून गोविंदपंताला मिळावें, व त्याच्या मदतीनें प्रथम नजीब व सुजा यांची खोड मोडून मग अबदालीस हात दाखवावा अशी भाऊसाहेबांची योजना होती. यासाठीं आपल्या प्रांतांतील सर्व नावा जमा करून त्या यमुनेच्या दक्षिण तीरास आणून ठेवाव्या, असा त्यांनीं गोविंदपंतांस हुकूम केला. पण याही वेळीं गोविंदपंताच्या हातून सोंपविलेलें काम

पार पडलें नाहीं. त्यानें नावा जमविल्या नाहींत; व नजीब व सुजा अबदालीस खुशाल जाऊन मिळाले !

यानंतर अबदालीचें पारिपत्य करण्यासाठीं भाऊसाहेबांनीं दुसरी एक मसलत योजिली. मथुरा, दिल्ली, कुंजपुरा वगैरे यमुनेच्या दक्षिणेचीं ठिकाणें घेऊन उत्तरेकडून यमुना उतरून अबदालीस रेटावयाचें ठरलें. अबदाली ज्या मुलुखांत होता तो, म्हणजे अलीगडपर्यंतचा अंतर्वेदींतील मुलुख जाळून लुटून फस्त करून अबदालीस तंबी देण्याचें काम गोविंदपंतास सांगून भाऊ उत्तरेकडे चालते झाले. प्रथम बळवंतराव मेहेंदळ्यानें दिल्ली घेतली, व सदाशिवराव भाऊ आल्यानंतर किल्लाही हस्तगत झाला. दिल्ली शहर म्हणजे बादशहाच्या राजधानीचें ठिकाण; तें अबदालीच्या लोकांपासून हिसकून घेतल्यानंतर मराठ्यांचा चहूंकडे वचक बसला. अबदालीच्या पक्षाकडचे कांहीं लोक त्याला धरावा कां सोडावा या पंचायतींत पडले. कांहींनीं तर भाऊंस मिळण्याबद्दल बोलणीं सुरू केलीं. सुजाउद्दौल्यासही आपण नजीबच्या नादीं कोठून लागलों असें झालें. व त्यानें भाऊंशीं सख्यत्वाची भाषा बोलण्यास आरंभ केला. अशी स्थिति पाहून अबदालीसही स्वदेशीं परत जाणें बरें वाटून त्यानें तहाचें बोलणें लावलें. पण उत्तम सैन्य, जंगी तोफखाना, व शिंद्याबद्दलचा सूड उगविण्याची इच्छा या तीन कारणांमुळें, अबदालीस आतां पुरता चिरडल्याखेरीज सोडावयाचा नाहीं असा भाऊंनीं निश्चय केला होता.

येथपर्यंत मराठ्यांची सरशी होती. पण फिरून भाऊसाहेबांनीं कांहीं महत्त्वाच्या चुका केल्या. दिल्लीच्या तक्तावर **शहाआलमास** बसवून वजीरी आपण स्वतः करावयाची असा भाऊंनीं बेत केला. त्यामुळें सुजाउद्दौल्याची वजीरी स्वतः करण्याची आशा नष्ट झाली, व तो फिरून अबदालीशीं संगनमतानें वागूं लागला. लष्कराचा खर्च अवाढव्य अस-

त्यानें जवळच्या शिलकीचा फन्ना उडाला; व सैन्याचा पगार थकूं लागला. तेव्हां दिल्ली येथील प्रसिद्ध **दिवाणीआम**चें चांदीचें सुंदर छत फोडून काढून, तें आटवून त्याचे रुपये करण्याचा त्यांनीं निश्चय केला. या वेळीं सुरजमल्ल जाट म्हणाला, "भाऊसाहेब आपण एवढी गोष्ट करूं नये. पातशाही तक्ताबद्दल लोकांत फार पूज्यबुद्धि आहे; व लोकांच्या मनास दुखविण्यासारखी कोणतीच गोष्ट आपण या प्रसंगीं करूं नये!" पण या पोक्त सल्ल्याकडे साफ दुर्लक्ष करून त्यांनीं तें छत फोडलेंच! त्यानें सुरजमल्ल जाट तर रागावून निघून गेलाच, पण इतर लोकही फार नाखूष होऊन मराठ्यांचा द्वेष करूं लागले!

पावसाळा संपतांच भाऊसाहेब कुंजपुऱ्याकडे वळले. बळवंतराव मेहेंदळे व जनकोजी शिंदे यांनीं थोड्याच वेळांत कुंजपुरा घेतला. यानंतर पूर्वीं ठरल्याप्रमाणें यमुना उतरून उत्तरेकडून अबदालीस रेटण्याचा भाऊचा बेत होता हें वर सांगितलेंच आहे. पण अबदालीनें हें धोरण ओळखिलें होतें. कुंजपुरा शत्रूच्या हातीं लागल्यावर अंतर्वेदींत राहणें धोक्याचें आहे असें वाटून त्यानें मोठ्या कष्टानें बागपताजवळ यमुना ओलांडली व तो पानिपतकडे वळला. ही बातमी समजतांच भाऊसाहेब पूर्वींचा बेत सोडून देऊन तिकडेच वळले. अबदाली या वेळीं चांगला कैचींत सांपडला होता. समोर भाऊची फौज तयारीनें उभी होती. पाठीमागें दिल्लीस नारोशंकर त्यास पायबंद देण्यास तयार होता. अंतर्वेदींतून व रोहिलखंडांतून त्याला मदत मिळण्यासारखी होती हें खरें; पण भाऊसाहेबांनीं गोविंदपंत बुंदेल्यास अबदालीच्या पाठीशीं राहून त्याची रसद बंद करण्याचें काम सांगितलेंच होतें. यावेळीं अबदाली अगदीं भिऊन गेला. मराठी सैन्य व अबदालीचें सैन्य यांमध्यें अंतर सारें दोनचार कोसांचें होतें. अबदालीच्या लष्करांत महागाई अतोनात झाली होती. मध्यंतरीं एक लहानशी चकमक दोन्ही सैन्यांत झाली; तींतही मराठेच विजय पावले!

पण गोविंदपंत बुंदेल्यानें त्याच्यावर सोंपविलेली कामगिरी फारच गचाळ रीतीनें केली. भाऊसाहेबांनीं त्याला पत्रावर पत्रें लिहिलीं. पण अबदालीस रसद पोहोंचणें मुळींच बंद झालें नाहीं. यामुळें त्यानें स्वस्थपणें मराठ्यांस दिल्लीहून जाणारी रसद मारण्याचा क्रम चालविला. यामुळें अबदालीची उपासमार करण्याचा जो बेत भाऊंनीं केला होता तो फसून उलट मराठ्यांनाच उपाशीं मरण्याची पाळी आली. अर्थात् एकदम लढाई न देतां उपासमारीनेंच मराठ्यांची खोड जिरविण्याचा अबदालीनें निश्चय केला.

अशा कोंडमारीच्या स्थितींत न बसतां अबदालीचा शह लवकर उठविण्यांत मराठ्यांचा फायदा होता. मध्यंतरीं गिलच्यांशीं दोन वेळ लढाई झाली; व या दोन्ही युद्धांत मराठ्यांनाच विजयश्रीनें माळ घातली. पण दुसऱ्या लढाईत **बळवंतराव मेहेंदळ्या**सारखा वीर कामास आल्यामुळें मराठ्यांची फार नाउमेद झाली. अशा हलक्या सलक्या लढाया देत न बसतां एकदांच मोठें युद्ध करून काय तो सोक्षमोक्ष करावा असा भाऊंस पुष्कळांनीं सल्ला दिला. पण तसें न करतां भोंवतालीं खंदक खणून बंदोबस्त करून ते निष्कारण दिवस घालवीत बसले. शेवटीं गोविंदपंत बुंदेले कांहीं मदत घेऊन येत असतां वाटेंत एका चकमकींत मारला गेला, व मराठ्यांच्या पोटांत धास्ती उत्पन्न व्हावी म्हणून गिलच्यांनीं गोविंदपंताचें डोकें मराठ्यांच्या गोटांत फेंकून दिलें ! दिल्लीहून रसद व खजीना घेऊन येत असलेला दुसरा एक सरदार चुकून अबदालीच्या गोटांतच शिरला ! याप्रमाणें मराठी लष्करास साहाय्य कांहींच मिळालें नाहीं. धान्य रुपयास तीन शेरही मिळेनासें झालें; लोकांस उपोषणें पडूं लागलीं, व हत्ती, घोडे वगैरे जनावरें पटापट मरूं लागलीं. शेवटीं "अशा रीतीनें उपाशीं मारण्यापेक्षां, भाऊसाहेब, आम्हांस रणांगणीं मारावें," अशी सर्व मराठे सरदारांनीं भाऊसाहेबांस

विनंति केली. तेव्हां नाइलाज होऊन भाऊंनीं शत्रूची कोंडी फोडून दिल्ली-कडे जाण्याचा निश्चय केला!

---

### घडा ४६

## पानपतची लढाई

### भाग ३ रा

पानिपतचें मैदान हें हिंदुस्थानची रणभूमि व्हावें असाच ईश्वरी संकेत आहे कीं काय नकळे! भारती युद्धांतलें प्रसिद्ध कुरुक्षेत्र तें हेंच! पृथ्वीराज व महमद घोरी यांमध्यें युद्ध होऊन हिंदुस्थानांत मुसलमानांचा पाय कायमचा रोविला गेला, तो याच ठिकाणीं. मोंगलसाम्राज्याचा पाया याच रणभूमीवर घातला गेला; व मध्यंतरीं आलेलें गंडांतर टळून याच रणभूमीवर त्याचें पुनरुज्जीवन झालें! व अखेरीस मोगल साम्राज्यामागून स्थापन होऊं पाहणाऱ्या मराठी साम्राज्याला जबरदस्त धक्का याच ठिकाणीं बसावयाचा होता!

बुधवार ता. ७ जानेवारी १७६१ रोजीं पहांट झाली होती. अशा समयीं भाऊसाहेब व विश्वासराव उठले, व त्यांनीं सर्व सरदारांस लवकर निशाणापाशीं येऊन दाखल होण्याचा हुकूम सोडला. आज्ञा होतांच सर्व सरदार भगव्या झेंड्यापाशीं जमा झाले. त्या वेळीं सर्वांस अनुलक्षून भाऊसाहेबांनीं वीरश्री चढविणारें भाषण केलें. ते म्हणाले, "आजची वेळ खरी आणीबाणीची व परीक्षेची आहे. तुम्हीं सतीचें वाण घेतलें, त्यापक्षीं आतां त्याला साजेसेंच वर्तन केलें पाहिजे. आजपर्यंत मालकाचें अन्न खाल्लें, त्याचें सार्थक करून दाखवा. आज यश किंवा अपयश तुमचेवर अवलंबून आहे." यावर सरदारांनींही उत्तर दिलें, "आम्ही जीविताची तमा धरीत नाहीं. महाराजांच्या पायाच्या पुण्याईनें आम्ही दुराणीस धुळीस मिळवून देऊं. आपण चिंता करण्याचें कारण नाहीं."

इतकें झाल्यावर मराठी फौज शत्रूवर चालून जाण्यासाठीं व्यवस्थेनें उभी राहिली. मध्यावर खासे भाऊ व विश्वासराव हुजरातीसह होते. उजवीकडे शिंदे, होळकर; डावीकडे गायकवाड, पवार, विंचूरकर, समशेर बहादर वगैरे मंडळी होती. सर्व सैन्यापुढें तोफखाना असून त्यावर इभ्राहीमखान गारदी होता. अशा तयारीनें मराठी फौज खंदक ओलांडून बाहेर पडली, व दीड कोस पुढें आली. अबदाली वाट देऊन एकीकडे झाला, तर लढाई न देतां तडक दिल्लीस जावें, असा भाऊंचा बेत होता. पण उपासमारीनें जर्जर झालेल्या मराठ्यांस बिनहरकत जाऊं देईल असा कच्चा मुत्सद्दी अबदाली नव्हता. मराठ्यांची हालचाल दिसतांच त्यानेंही आपली फौज सज्ज केली. मध्यें त्याचा वजीर राहिला; उजवीकडे रोहिले सरदार, डावीकडे नजीब व सुजाउद्दौला; पुढें तोफखाना होता, व खुद्द अबदाली मागेंच राहिला होता.

थोड्याच वेळांत दोहीं पक्षांकडून तोफांच्या माऱ्यास सुरवात होऊन दशदिशा धुरानें व धुळीनें धुंद झाल्या. प्रथम इभ्राहीमखानानें तोफांच्या आश्रयाखालीं आपलीं कवायती पलटणें बाहेर काढलीं, व तो रोहिल्यांशीं लढूं लागला. सुमारें प्रहर दिवसास सर्व बाजूंकडे लढाईचें तोंड लागलें. इभ्राहीमखानाच्या निकराच्या हल्ल्यानें रोहिल्यांची फार तिरपीट उडाली. इकडे भाऊसाहेबांनीं मध्यभागीं वजीराचा समाचार असा खरपूस घेतला कीं, वजीराचा मुलगा ठार होऊन त्याचे लोक पळूं लागले. असें पाहतांच नजीबखान भाऊंशीं लढण्यास आला; तेव्हां जनकोजी शिंद्यांनीं भाऊंस मदत केली. रोहिल्यांच्या तोफांनीं शिंद्यांची फौज फार मारली; तरी या वेळीं एकंदरीनें मराठ्यांचें पाऊल पुढेंच पडत होतें. आपली फौज एकंदरीनें मागें हटत आहे असें पाहून अबदालीनें मुद्दाम राखून ठेविलेली फौज पुढें घातली. तेव्हां पुनः लढाईला नेट चढला. इतक्यांत मराठ्यांच्या दुर्दैवानें एक बंदुकीची गोळी येऊन विश्वासरावास लागली

व तो मरणोन्मुख होऊन पडला ! यानें भाऊच्या मनास भयंकर धक्का बसला. भयंकर जखम झाली होती, तरी विश्वासरावानें "तुम्ही चला, नाहीं तर लढाई बिघडेल" असें भाऊंस सांगितलें. विश्वासराव आतां वांचत नाहीं असें पाहतांच भाऊ जिवावर उदार झाले. ते हत्तीवरून उत्तरून घोड्यावर स्वार झाले, व गर्दींत घुसून निकरानें लढूं लागले. इतक्यांत बाजारबुणगे व पिछाडीचे लोक यांनीं पळ काढण्यास सुरवात केली. हें पाहून गिलच्यांस जोर चढून त्यांनीं दोहों बाजूंनीं हल्ला केला, व कत्तल सुरू झाली ! भाऊ, जनकोजी शिंदे, समशेर बहादर, व इब्राहीमखान हे मात्र शेवटपर्यंत लढत होते. 'हाणा,' 'मारा,' म्हणतां म्हणतां भाऊंच्या तोंडास कोरड पडली. शेवटीं आपली बहुतेक फौज गारद झाली असें पाहून ते त्वेषानें शत्रूवर चाल करून जे गर्दींत मिसळले ते पुनः दिसलेच नाहींत. जनकोजी शिंद्यानें या वेळीं खरोखर अभिमन्यूसारखा पराक्रम केला. पण तो शत्रूच्या हातीं लागला, व त्यांनीं त्याला ठार मारलें !

याप्रमाणें सायंकाळीं लढाई आटपून मराठ्यांचा पूर्ण पराभव झाला ! मराठ्यांचें सर्व सामानसुमान शत्रूंच्या हातीं लागलें. रणांगणावर प्रेतांचे ढीगच्या ढीग पडले होते. जे लोक आसपास दडून बसले होते, त्यांस गिलच्यांनीं कैद केलें; व दुसरे दिवशीं सकाळीं त्यांतील बायकांमुलांस गुलाम म्हणून त्यांनीं ठेवून घेतलें, व पुरुषांस एका दावणींत उभें करून त्यांची कत्तल केली; आणि त्यांच्या प्रेतांचे ढीग आपल्या डेऱ्यांपुढें घातले ! या वेळीं दक्षिणची दोन लाख बांगडी पिचली, असें सांगतात, व त्या वेळीं महाराष्ट्रांत बहुधा असें एकही घर नव्हतें कीं जेथून एकादा तरी माणूस कामास आला नव्हता !

पळून आलेल्या लोकांचेही वाटेंत अतोनात हाल झाले. यांत मल्हारराव होळकर, दमाजी गायकवाड, महादजी शिंदे, विठ्ठल शिवदेव

विंचूरकर, नाना फडणीस व भाऊसाहेबांची पत्नी पार्वतीबाई हीं प्रमुख होतीं. महादजी शिंद्याचा जीव तर एका भिस्त्यानें वांचविला, व जानू भिंताडे नांवाच्या एका इमानी मराठ्या शिपायानें पार्वतीबाईस पाठकुळीस घेऊन बराच प्रवास केला. या पळाच्या लोकांस सुरजमल्ल जाटानें फार चांगली मदत केली हें त्यास फार भूषणावह आहे.

भाऊसाहेबांस गिलच्यांनीं घेरलें आहे, व त्यांची स्थिति फार वाईट झाली आहे, अशी बातमी याचेपूर्वीं कांहीं दिवस नानासाहेबांस लागली होती. म्हणून फौज घेऊन ते ताबडतोब निघाले. पण ते नर्मदा पार होऊन सिरोंजेस पोहोंचतात तों त्यांस हें पानपतचें भयंकर वर्तमान समजलें. " दोन मोत्यें गळालीं, सत्तावीस मोहोरा हरवल्या, व रुपये व खुर्दा किती गमावला याचा पत्ताच नाहीं ! " असें पत्र एका व्यापाऱ्यास आलें होतें; तें वाचूनच त्यांना घडलेल्या हकीकतीचा अंदाज झाला. इतक्यांत पळाचे लोकही येऊन पोहोंचले. हें वर्तमान ऐकून त्यांना जो जबर धक्का बसला, त्यांतून ते पुनः सावरलेच नाहींत. त्यांना भ्रम झाला व पुण्यास आल्यावर "भाऊ, भाऊ" म्हणत त्यांनीं पर्वतीवर प्राण सोडला !

" **मुलांचा महाराष्ट्र** " या पुस्तकावरून थोडा फेरफार करून.

---

## धडा ४७

# शाकुंतलाख्यान

( ओंव्या )

कौरववंशीं विख्यातकीर्ति, । **दुष्यंत** नामा गुणैक मूर्ति । श्रेष्ठ भूपाळ चक्रवर्ती । वीर्यें शौर्यें आगळा ॥ १ ॥ प्राची प्रतीची दक्षिणोत्तर । चारी दिशा चतुःसमुद्र । आक्रमूनि मही हे महेंद्र । सुरेंद्र तैसा भूलोकीं ॥ २ ॥ हिंसाकारी अधर्मकारी । अथवा वर्णसंकरकारी । दुष्यंत

राज्यीं अनाचारी । स्वप्नींही परी असेना ॥ ३ ॥ धर्मरीती धर्मधन । सेवूनि संतुष्ट सर्व जन, । स्व-स्वकर्मीं सकळ वर्ण । विहिताचारी वर्तती ॥ ४ ॥ रोग दरिद्र कीं बंधन। दुःख दुर्भिक्ष अकाळ मरण। सर्प वृश्चिक तस्कर जाण। दुष्यंत राज्यीं असेना ॥५॥ विष्णु समान सत्ताबळ । प्रतापें जैसा सूर्य तेजाळ । धरातुल्य सहनशीळ । अक्षोभ जैसा सागरू ॥ ६ ॥

सप्तसमुद्रींचे लोट । धरामंडळीं एकवट । तैसे सेनेचे संघाट । घेवुनी वना चालिला ॥ ७ ॥ वाजी वारण रथ पदाती । संख्या करितां न धरवे गणती। सेनावसनें सर्व जगती। पांघुरविलीं समर्थें ॥ ८ ॥ अनेक शस्त्र-धरांचीं वृंदें। अनेक वाद्यें अनेक शब्दें । गर्जती तेणें विचित्र नादें । नादावलें अंबर ॥ ९ ॥ सेनेसहित सेनानाथ। नगरगर्भीं जात मिरवित । हें देखोनि नारी शतानुशत । माडिया गोपुरीं वळघल्या ॥ १० ॥ कनककुसुमें कनकताटीं । आवडी धरूनि करसंपुटीं । अवलोकूनि राजमुकुटीं । पुष्पांजुळी सांडिती ॥ ११ ॥

मग वनांत गेल्यावर—

देखे प्रचंड महागिरी । विशाळ पर्वताचिया दरी । जळें तुंबलीं सरितांतरीं । समुद्रतुल्य अगाध ॥ १२ ॥ नाना वृक्षांचीं अचाट। डांगें लागलीं घनदाट । माजीं निर्झरोदकाचे पाट । सैरावैरा धांवती ॥ १३ ॥ मस्तकें उचलोनि दिनकर। छायें रक्षिला अंधकार; । माजीं श्वापदगणांचे भार। सुखाडले सुखवस्ती ॥ १४ ॥ प्रस्थानभेरींच्या गर्जनें। वीरमुखींचीं आस्फोटनें । तडक यंत्रें फुटती, तेणें। महा वनचर बुझाले. ॥ १५ ॥ कोंडले देखोनि चौफेरी । मुसांडी मारिती राजभारीं। ते वधिजेती शस्त्रशरीं । महावीरीं असंख्य ॥ १६ ॥ अवलोकोनियां तें वन, । तंव देखिलें कश्यपारण्य । राजा करी पुढारें गमन । सिद्धीं साधकीं बसविलें. ॥ १७ ॥ अवलोकोनि कश्यपाश्रम । अंतरीं पाहे नृपसत्तम । तंव कण्वऋषीचा आश्रम । अति रमणीय देखिला ॥ १८ ॥

आदरें येवूनियां निकटीं । अंतरीं पाहे पर्णकुटीं । मनुष्यात्रीण सर्व सृष्टि । गृहसामग्री दिसताहे ॥ १९ ॥ मग गर्जोनि नराधीशें । म्हणे "या आश्रमीं कोण असे ?" । हें परिसोनी इंदिरावेशें । लावण्यकलिका साजिरी ॥ २० ॥ कनकलतिका सौदामिनी । कीं चंद्रकला तनुधारिणी । सुवर्ण केतकीपत्रवर्णी, । सुगंधखाणी हरिणाक्षी ॥ २१ ॥ रूपयौवनचातुर्यभरिता । बाहेर पातली मुनीश्वरदुहिता । अत्यादरें धरित्रीकांता । पवित्रासन वोपिलें ॥ २२ ॥ 'स्वागत' पुसोनियां वचनीं । अर्घ्यपाद्यादि पूजनीं । राजा तोषवोनि बहुमानी । कुशल विचार कुशलत्वें ॥ २३ ॥ 'दर्शनें स्वानंद झाला नयना । नाम अभिधान करावें श्रवणा । परिचयज्ञानें अंतःकरणा । अष्टभावें भेटविणें ॥ २४ ॥ ऐकोनि चातुर्याच्या गोष्टी । राजा चमत्कारिला पोटीं । म्हणे हे वयें धाकुटी । विचारवृद्ध दिसताहे ॥ २५ ॥ मग म्हणे वो सुलक्षणे । गुणालये कमलेक्षणे । तुझेनि वचनमात्रें क्षणें । श्रम सर्वही हरपला ॥ २६ ॥ मैथलीनरेंद्रपुत्र जगतीं । दुष्यंत राजा चक्रवर्ती । ऐकिला असेल, तरी हे मूर्ति । वोळखें दृष्टीं सुजाणे ॥ २७ ॥ कण्वऋषीचें दर्शन । इच्छूनि येथें आगमन, । केंव्हां होईल ? बोल वचन । विलंबें कीं अविलंबें ?' ॥ २८ ॥ शकुंतला म्हणे नृपती । मम पिता विवेकमूर्ति । वनफळें घेऊन शीघ्रगती । आतांचि येईल आश्रमा ॥ २९ ॥

---

## धडा ४८

# शकुंतलाख्यान

### भाग २ रा

[ येथें दुष्यंतास अशी शंका आली कीं, कण्वऋषी ब्रह्मचारी असतां शकुंतला त्यांची मुलगी कशी होईल ? ही शंका त्यानें शकुंतलेस बोलूनही दाखविली. तेव्हां शकुंतलेनें कण्वऋषीच्याच तोंडून ऐकिलेली आपल्या जन्माची हकीकत दुष्यंतास सांगितली. तीवरून शकुंतला ही विश्वामित्र ऋषीची मेनका

नांवाच्या अप्सरेपासून झालेली कन्या असून, कण्वऋषी हा तिचा फक्त पालक होता, असें दुष्यंतास कळून आलें. अर्थात् ही ब्राह्मणकन्या नसून क्षत्रियकन्या आहे असें कळल्यानें त्याच्या मनांत तिला पाहिल्याबरोबर जें प्रेम उद्भवलें होतें तें अधिकच बळावलें; व "माझ्याशीं गांधर्वविवाह करून तूं माझ्या राज्याची स्वामिनी हो" असें त्यानें तिला आपलें मनोगत कळविलें. शकुंतला प्रथम कबूल होईना; पण शास्त्रानें गांधर्वविवाह श्रेष्ठ व मान्य धरिला आहे अशी दुष्यंतानें तिची समजूत घातली. नंतर, "माझे पोटीं होणारा पुत्र तुमच्या सिंहासनाचा वारस झाला पाहिजे" अशी तिनें अट घातली. ती दुष्यंतानें मान्य केल्यावर त्यांचा गांधर्वविवाह झाला. पण मग आपण कण्वऋषींना न विचारितां शकुंतलेचें मन वळविलें, या गोष्टीचें राजास भय वाटूं लागलें, व ते येण्याच्या आंत तेथून पाय काढण्याचा दुष्यंतानें विचार केला. ]

आवडी देऊनी आलिंगन । म्हणे "आतांच धाडीन तुजलागुन । छत्रचामर शिबिका यान । दासदासी समवेत ॥ ३० ॥" ऐसें बोलोनि जाता झाला । दळेंसी, नगरा प्रवेशला । मागां मुहूर्तानंतरें आला । कण्वऋषी आश्रमा ॥ ३१ ॥ गुप्तविवाहें शंकान्वित । बाहेर नये लज्जाभरित । हें देखोनी सर्वज्ञनाथ । जाणता झाला मानसीं ॥ ३२ ॥ म्हणे माझिये निजात्मजे । बाहेर येईं सांडोनि लाजे । कर्तव्य होतें पैं सहजें । सिद्धी नेलें प्रारब्धें ॥ ३३ ॥ जें झालें तें बहुत बरवें । मान्य केलें माझिये जीवें । कष्टीं न मिळे तें स्वभावें । पूर्वदैवें जोडिलें ॥ ३४ ॥ ऐकोनि पितयाची अभयवाणी । कन्या येउनी लागली चरणीं । म्हणे म्यां वरिला भूपाळ गुणी । तो त्वां मान्य करावा ॥ ३५ ॥ कृपानुग्रह वरप्रसादें । गौरवीं आशीर्वचनशब्दें; । ऋषी बोले परम आल्हादें । चिरंजीव तव भर्ता ॥ ३६ ॥ शचीसुरेशासारखे । दोघे असा अक्षयसुखें । विष्णुशक्तिसमान तुकें । ऐसा पुत्र लाधसी ॥ ३७ ॥

दश मास होतां पूर्ण । पावता झाला पुण्यजनन । धरामंडळीं देदीप्यमान । अपरभानु पैं जैसा ॥ ३८ ॥ कीं प्रत्यक्ष दीप्तानळाची मूर्ति । रूपौदार्यगुणसंपत्ति । शकुंतलेपासाव तो दौष्यंती । **भरत** नाम जन्मला

॥ ३९ ॥ सुलक्षणिक राजकुमर । देखोनि कण्वऋषीश्वर । जातकर्मादि संस्कार । करिता झाला आदरें ॥ ४० ॥ सामुद्रिकें लक्षितां दृष्टीं । परम आल्हाद ऋषीच्या पोटीं । आत्मजेते म्हणे, वो गोष्टी । भविष्याची ऐक पां ॥ ४१ ॥ सागरमेखलांकित पृथ्वी । भाग्य भोगील प्रतापरवी । पौरवराजे याचेनि नांवीं । **भारत** ऐसें पढविती ॥ ४२ ॥ षष्टम वर्ष भरतां गुणी । क्रीडा कौतुकें विचरत वनीं । व्याघ्रसिंहवराहश्रेणी । मत्तकुंजर म्हैसादी ॥ ४३ ॥ धरूनी आणी ऋषीच्या आश्रमीं । बांधोनि घाली एके दामीं । त्यावरी वळघोनि पराक्रमी । सैरावैरा धांवडी ॥४४॥ क्रूर श्वापदांचे गण । बळें करी तयांचें दमन । या लागीं त्याचें ठेविलें अभिधान । **'सर्वदमन'** ब्राह्मणीं ॥ ४५ ॥ धनुष्यकोटीनें आतुर्बळी । गंगा आणिली आश्रमाजवळी । पर्वत लोटुनि महीतळीं । समान करी हिंडावया ॥ ४६ ॥ ऐसीं इंद्रासमान कर्मे । अमानुष्य अतिउत्तमें । ऋषीनें जाणोनि मनोधर्मे । विचार करी शिष्यांसीं ॥ ४७ ॥ अहो युवराज्य देतां समयो । सर्वाविषयीं योग्य तनयो । पृथ्वी जिंकोनि दिग्विजयो । करी ऐसा प्रतापी ॥ ४८ ॥ पितया भेटवावा कुमर । आत्मजेते निजभ्रतार । इतुकेनि कन्येचा ऋणभार । उत्तीर्ण झालों मी येथें ॥४९॥ यालागीं द्विज हो समुदायेसीं । सपुत्र शकुंतला सरसी । नेऊनि निवेदा रायासी । हस्तिनापुरीं अविलंबें ॥ ५० ॥

---

## घडा ४९

# शकुंतलाख्यान

### भाग ३ रा

ऋषि आज्ञेनें तापसमेळा-। सहित भरत शकुंतला । गजसाव्हया पातले, डोळां । लोक देखती कौतुकें ॥ ५१ ॥ सभामंडपीं राजनृपती । मुनिवरांसी राजयुवती । राजकुमर धरूनि हातीं । उभे ठेले सन्मुख

॥ ५२ ॥ आशीर्वचनीं जयजयकार । करूनि, बैसला ऋषींचा भार । शकुंतला आत्मकुमर । करीं धरून साक्षेपें ॥ ५३ ॥ बलौदार्यलावण्य-गुणी । तनुज लाविला जनकचरणीं । म्हणे "राजया अंकासनीं । ठाव देईं बैसावया ॥ ५४ ॥ बहुत दिवस पाहिली वाट । निष्ठुर नोहेसि कां लोभिष्ट ? । आतां गृहस्वामिनी वरिष्ठ । गृहा पातलें आपुलिया ॥ ५५ ॥ सत्यप्रतिज्ञा नरेंद्रोत्तमा । आठवोनियां आपुल्या नेमा । यौवराज्यीं भरत नामा । पुत्र आपुला अभिषेकीं ॥ ५६ ॥ विश्रामोनि कण्वाश्रमीं । जो अर्थ कथिला वाङ्नेमीं । तो ये काळीं क्रियाधर्मीं । करोनि दावीं यथार्थ" ॥ ५७ ॥ ऐकोनि शकुंतलेचें वचन । केल्या कर्माची आठवण । मनें जाणतांही आपण । झाला नेणता ते काळीं ॥ ५८ ॥ म्हणे "तूं कैची दुष्ट तापसी ? । कोण ? कोठील ? कोणे देशीं ? । कोणे काळीं एकांतवासीं । विवाह झाला मी नेणें ॥ ५९ ॥ नेणतां माझिया सुहृज्जना । कैसी झालीस ममांगना ? । ऋषी राजे पातले लग्ना । कोण ? ते येथें दाखवीं ॥ ६० ॥ देव ब्राह्मण अग्नि वेद । साक्षी न करूनि वडील वृद्ध । धर्मकामार्थसंबंध । झाला कैसा मी नेणें ॥ ६१ ॥ पाहतां साक्षीस न मिळे कांहीं । मज तरी अणुमात्र ठाउकें नाहीं । आतां आलेनि पंथें जाईं । शीघ्र येथूनि निर्लज्जे!" ॥ ६२ ॥ ऐसें बोलतां मेदिनीपाळा । क्रोधें संतप्त शकुंतला । जेंवी प्रलयाग्नीच्या ज्वाळा । स्पर्शों धांवती गगनातें ॥ ६३ ॥ आरक्तता येऊनी नयनें । अंजन क्षाळिलें अश्रुजीवनें । अधर स्फुरती, जेवीं पवनें । पद्मपत्रें थरकती ॥ ६४ ॥ म्हणे "धन्य गा! पुरुषोत्तमा ! । उत्तम ऐसेंचि रक्षिती नेमा । कर्मसाक्षी अंतरात्मा । तृप्त झाला या वचनीं ॥ ६५ ॥ मना नेणतां नाहीं पाप । वन्ही नेणतां कैचा दीप ? । जीवनेंवीण वाढलें रोप । पृथ्वीवरी कोठूनी ? ॥ ६६ ॥ जाणोनियां होय अजाण । परिचय असतां पुसे 'कोण' ? । हें तंव अधर्माचें लक्षण । तुज उत्तमा ! योग्य नव्हे ॥ ६७ ॥ ईश्वर

आणि जोडिलें पुण्य । स्मरोनि बोलें यथार्थ वचन । माझी साक्षी तुझेंचि मन । तुझे अंतरीं देताहे ॥ ६८ ॥ यथार्थ जागतां अंतःकरणीं । अन्यथा प्रतिपादी जो वचनीं । तेणें कोणती पापकरणी । केली नाहीं सांग पां ॥ ६९ ॥ पाप एकांतीं करूनि पाहीं । म्हणती 'कोणें देखिलें नाहीं' । इंद्रियदेवता आणि देही । अंतरपुरुष पाहतसे ॥ ७० ॥ वेव्हार न साधे साक्षीवीण । ऐसें बोलती जन अज्ञान । साक्षी परमात्मा आपण । सत्याकडे निर्धारें ॥ ७१ ॥ आतां असत्यपर्वतातळा । उभा न राहें कुंभिनीपाळा । वर पडेल वज्रशिळा । परम अकीर्तिदोषाची ॥ ७२ ॥ सकल ऐश्वर्य घेउनी भेटी । पद्मा पातलिया पायें लोटी । तो सभाग्य कीं अभाग्य सृष्टीं । काय लागे सांगणें ? ॥ ७३ ॥ आतां शेवटीलिया वचना । एकदा ऐकें नरभूषणा । मी जातसें कश्यपारण्या । कण्वाश्रमा सखेद ॥ ७४ ॥ यया आत्मजा आपुलिया । आदरें अंगीकारावें राया । समर्थ नव्हेसी त्यागावया । सत्य सत्य त्रिवाचा" ॥ ७५ ॥ ऐसे शकुंतलेचे बोल । रायें मानिले निरस फोल; । जैसा क्षपणक निरोधी झोल । पिकल्या मधुमोहळार्चा ॥ ७६ ॥ तैसीं प्रियेचीं पवित्र वचनें । दुष्यंतें दूषिलीं आपुल्या मनें । म्हणे "हे बहुभाष कवणें । जिंकिली न वचे बोलतां ॥ ७७ ॥ मातला हस्ती, क्षोभला सर्प । भ्रष्टला ब्राह्मण, पेटला दीप । अमर्याद स्त्रियांचा जल्प । आवरूं न शके विधाता ॥ ७८ ॥ हीन जातीचिया लक्षणा । आतां जाणवलें या मना । मेनका ते पण्यांगना । धर्मनिषिद्ध बंधकी ॥ ७९ ॥ जीचे उदरीं तव उत्पत्ती । तिची निवडिली ऐशी जाती । म्हणोनि 'खाण तैशी माती' । आहाणा लोकीं प्रसिद्ध ॥ ८० ॥ या लागीं बोलती वडील वृद्ध । 'उभय कुळें पाहूनि शुद्ध । कन्या पर्णावी प्रसिद्ध । जेवीं पताका वंशासी' ॥ ८१ ॥ गळां पडोनि विषयस्वार्था । संबंध लाविसी मज समर्था । अविचारबुद्धि सांडूनि आतां । जाईं स्वस्थळा आपुलिया" ॥ ८२ ॥ मंत्रबीजाक्षरांच्या

ओळी। अबद्ध जपतां भद्रकाळी। क्षोभे, तैसी क्रोधानळीं। अंगार टाकी शब्दाचे ॥ ८३ ॥ पवित्र विश्वामित्रबाळा। शकुंतला अलिकुंतला। म्हणे "कुंतलमंडळपाळा। तूंचि अविचारें जल्पसी ॥ ८४ ॥ सर्षपप्राय पराचे दोष। पर्वतप्राय करी अधम पुरुष। आपुलीं दुष्कर्में अशेष। मेरुतुल्य गणीना ॥ ८५ ॥ नरसिंहा सोडोनि कपट। मांडिये बैसवी कुमारश्रेष्ठ। सत्य स्वधर्म करी प्रकट। वडीलवृद्धां देखतां ॥ ८६ ॥ अश्वमेधशतांचें पुण्य। एकीकडे सत्य वचन। तुळितां सत्य आगळें जाण। मेरुसर्षपदृष्टांतें ॥ ८७ ॥ चहूं वेदींचें सांग ज्ञान। सकळ तीर्थांचें अवगाहन। त्यांसीं तुळितां यथार्थवचन। सत्य अगणित आगळें ॥८८॥ कोटिपुण्यें जोडिलीं यत्नीं। तीं जळती एके असत्य वचनीं। जैसी पावक-स्फुलिंगकणी। नाशी कर्पूरगिरीतें ॥८९॥ **सत्यापरता नाहीं धर्म। सत्य तेंचि परब्रह्म। सत्यापाशीं पुरुषोत्तम। सर्वकाळ तिष्ठत ॥९०॥ असत्य तेंचि पैं पातक। असत्य तोचि महानरक। असत्याचेनि संगें दुःख। अनंतजन्मीं भोगिती ॥९१॥** सत्यामृताची कनकवाटी। जोडिली न संडें भूतटीं। असत्यविषाची नरोटी। पवित्र हातें नातळें" ॥ ९२ ॥ भूलिंगासि अधोवदनें। गळल्या लाविल्या अश्रुजीवनें। उष्ण श्वास धूम्रवर्णे। तीव्र सोडी सकोप ॥ ९३ ॥ वाक्यपुष्पें पुष्पांजळी। सत्यसाक्षीनें राजमौळी। वोपितां, तंव तेचि काळीं। अति आश्चर्य वर्तलें ॥ ९४ ॥ सत्य सत्य शूलपाणी। प्रकट झाला तत्क्षणीं;। म्हणोनि अंतरिक्षवाणी। होती झाली तें ऐका ॥ ९४ ॥ "रे रे दुष्यंतराज नृपति। झणीं अवमानिसी हे सती;। हे कोपलिया सर्व जगती। जाळूं शके क्षणार्धें ॥ ९५ ॥ या लागीं पुत्र आपुला घेणें। मानिनी मानें सदना नेणें। आतां प्रतारणेचीं वचनें। न बोलावीं बहुसाल" ॥ ९६ ॥ ऐसी ऐकतां आकाशवाणी। टाळी पिटिली सभास्थानीं। जयजयकाराचिये ध्वनि। परम आल्हाद समस्तां ॥ ९७ ॥ राजा म्हणे

"वृद्ध हो ऐका। हा सर्व अर्थ मज ठाउका। परी शंकोनि मी लौकिका। कृत्रिम वाक्यें बोलिलों ॥ ९८ ॥ आतां ईश्वरवचन साक्षी। अंगीकारीन मृगशावाक्षी"। परिसोनि सुहृज्जन स्वपक्षी। धन्य म्हणती ऋषिवर्य ॥ ९९ ॥ मग उठोनि लवलाहें। पुत्र कडिये घेतला मोहें। आवडी चुंबोनियां पाहे। वारंवार वदनातें ॥ १०० ॥ करूनि मूर्धावघ्राण। स्नेहें देऊनि आलिंगन। यौवराज्यीं अभिषेचन। करिता झाला तात्काळीं ॥ १०१ ॥ आदरें प्रिया धरोनि हातीं। नेली अंतर्गृहाप्रती। आलिंगोनि म्हणे, चित्तीं। विषाद कांहीं न मानावा ॥ १०२ ॥ सत्य प्रकट करावया साचारें। वाक्यें बोलिलों लोकाचारें। तें तूं न मानूनिया चतुरे। क्षमा करणें मजलागीं" ॥ १०३ ॥ म्हणोनि वस्त्रें दिव्याभरणें। वोपिलीं जैशीं शचीही नेणें। राज्यसंपत्ति निज ठेवणें। निवेदिलें तिज हातीं ॥ १०४ ॥ पट्टमहिषीमाजीं मुख्य। पावली अनेक भोगसौख्य। पूर्वींच्या नेमाहूनी अधिक। ऐसें आलें प्रतीति ॥ १०५ ॥

**मुक्तेश्वरकृत** महाभारत—आदिपर्व.

---

धडा ५०

## चंद्रावरील मौज

रात्रींच्या शांत वेळीं आकाशाकडे पहात असतां सर्व नक्षत्रांचा जणूं कांहीं राजाच असा जो रजनीनाथ चंद्र, त्याकडे पाहून कोणाचें हृदय आनंदानें उचंबळून येत नाहीं? शुक्लपक्षांतील प्रतिपदेस अगर द्वितीयेस त्याची बारीक पण शोभिवंत कोर आकाशांत दिसते, व नंतर ती दररोज थोडी थोडी वाढत जाऊन पौर्णिमेस चंद्र पूर्ण वर्तुलाकार बनतो. वद्य प्रतिपदेपासून पुनः थोडथोडा क्षीण होत जाऊन अमावास्येस तर तो मुळींच दिसत नाहीं. याप्रमाणें एका महिन्याच्या अवधींत

त्याची क्षयवृद्धि एकदा पुरी होऊन पुनः पुढील महिन्यांत तोच क्रम सुरू होतो, हा अनुभव सर्वांस आहे.

पांचव्या पुस्तकांत सूर्यमालेचें वर्णन वाचतांना आपण पाहिलेंच होतें कीं, चंद्र हा आपल्या पृथ्वीचा एक उपग्रह आहे, व सर्व आकाशस्थ गोलांत तो आपणास अधिक जवळचा आहे; ह्मणजे तो पृथ्वीपासून फक्त २४०००० मैल अंतरावर आहे! चंद्र आपणांस सूर्याइतकाच



मोठा दिसतो, पण याचें कारण त्याची निकटता हेंच होय. कारण खरें पाहिलें तर ६ कोट चंद्र जेव्हां एकत्र करावे, तेव्हांच एक सूर्य होईल!

चंद्र स्वतः निस्तेज आहे. त्यास स्वतःचा प्रकाश नाहीं. सूर्याच्या प्रकाशानें तो प्रकाशतो. चंद्रतेज सूर्यतेजापुढें इतकें क्षुद्र आहे कीं ६ लक्ष पूर्ण चंद्र एकदम उगवले म्हणजे सूर्यप्रकाशाइतका प्रकाश पडेल!

चंद्र आपल्या पृथ्वीसभोंवतीं फिरतो ही गोष्ट चंद्र ताऱ्यांमधून जातांना दिसतो, यावरून दिसून येते. आज ज्या ताऱ्याजवळ चंद्र आहे, त्याजवळ तो फिरून येण्यास जवळ जवळ तीस दिवस लागतात. यावरून चंद्राची पृथ्वीभोंवतालची प्रदक्षिणा एक महिन्यांत पूर्ण होते असें सिद्ध होतें. पण लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, चंद्र आपल्या आंसाभोंवतींही तितक्याच मुदतींत फिरतो. त्यामुळें चंद्राची एकच बाजू पृथ्वीकडे नेहमीं फिरलेली असते, आणि तेवढीच आपणांस दिसते. चंद्राची दुसरी बाजू आपणास कधींही दिसत नाहीं व दिसणारही नाहीं.*

चंद्रास स्वतःचा प्रकाश नसल्यामुळें सूर्याच्या प्रकाशानें प्रकाशित अशी चंद्राची जी बाजू असेल, तींपैकीं जितका भाग पृथ्वीच्या बाजूला वळलेला असतो तितकाच आपणास दिसतो. जर सर्व प्रकाशित बाजू पृथ्वीकडे वळलेली असेल, तर आपणास पूर्ण चंद्र दिसतो; व त्यास आपण **पौर्णिमे**चा चंद्र असें म्हणतों. निम्मी बाजू वळली असेल, तर त्या वेळेस अष्टमी झाली असें म्हणतों; आणि जर प्रकाशित बाजू आपणाकडे मुळींच वळली नसेल, तर त्या दिवशीं चंद्र मुळींच दिसणार नाहीं. या दिवसास **अमावास्या** म्हणतात. याप्रमाणें चंद्रास कला होतात. या चमत्काराची प्रतीति पाहणें फार सोपें आहे. दिवस व रात्र हीं कशी होतात हें पाहण्याकरितां आपण जसा एक दिवा व एक दाभण टोंच-

---

* एखाद्या टेबलाभोंवतीं आपण टेबलाकडे तोंड करून एक प्रदक्षिणा घालावी. आपणास असें आढळून येईल कीं, अशी एक प्रदक्षिणा झाली म्हणजे आपली आपल्या स्वतः भोंवतींही एक प्रदक्षिणा पुरी होते. चंद्रही याप्रमाणें तीच बाजू पृथ्वीकडे वळवून तिला प्रदक्षिणा घालतो. यामुळें त्याची दुसरी बाजू आपणा पृथ्वीवरील लोकांस कधीं दिसत नाहीं. चंद्राला स्वतः भोंवतीं फिरण्यास ज्या अर्थीं एक महिना लागतो, त्या अर्थीं त्याचे दिवस व रात्र हीं पंधरा पंधरा दिवसांचीं असतात असें होतें.

लेला चेंडू हे घेतले होते, तसेंच आतांही घेऊन, शिवाय चंद्राऐवजीं एक लहानसें लिंबू घ्यावें. दिवा व चेंडू यामध्यें जर लिंबू धरलें तर लिंबाचा प्रकाशित भाग चेंडूवरील कोणत्याही भागावर मुळींच दिसणार नाहीं. हीच अमावास्या होय. लिंबू जर चेंडूच्या मागील बाजूस धरलें तर त्याचा सर्व प्रकाशित भाग चेंडूवर दिसेल; हीच पौर्णिमा होय. आतां लिंबू हळूच चेंडूभोंवतीं फिरवावें म्हणजे क्रमानें पौर्णिमा व अमावास्या या दोहोंमधील कला कशा होतात हें स्पष्टपणें ध्यानांत येईल.

ग्रहणांचा चमत्कारही चंद्राच्या पृथ्वीभोंवतालच्या प्रदक्षिणेमुळेंच होतो. फिरतां फिरतां चंद्र जेव्हां सूर्य व पृथ्वी यांच्या बरोबर मध्यें येतो, तेव्हां सूर्य पूर्णपणें किंवा अंशतः अदृश्य होतो; व त्यामुळें सूर्याचें **खग्रास** अगर **अंशग्रहण** होतें. त्याचप्रमाणें चंद्र जेव्हां फिरतां फिरतां पृथ्वीच्या अंधेऱ्या भागाकडे येऊन तिच्या सावलींत सांपडून पूर्णपणें किंवा अंशतः अदृश्य होतो, तेव्हां चंद्रास खग्रास अगर अंशतः ग्रहण लागतें. चंद्र पृथ्वीच्या व सूर्याच्या मध्यें फक्त अमावास्येलाच येतो, व सूर्यग्रहण अर्थातच अमावास्येखेरीज इतर वेळीं कधीं येत नाहीं. चंद्र-ग्रहणही त्याच कारणास्तव पौर्णिमेखेरीज अन्य दिवशीं होऊं शकत नाहीं. आतां हें खरें कीं, दर पौर्णिमेला व अमावास्येला चंद्राचीं व सूर्याचीं ग्रहणें लागत नाहींत. पण याचें कारण समजणें बिकट असल्यामुळें येथें हा विषय इतकाच सोडून देऊं.

चंद्राच्या योगानें एक फार महत्वाची गोष्ट आपल्या पृथ्वीवर दररोज घडून येते. ती समुद्राच्या पाण्याची **भरती** व **ओहोटी** ही होय. कांहीं कारणानें जर चंद्र नाहींसा झाला तर समुद्रकिनाऱ्यावरील प्रदेशांत एकच हलकल्लोळ होऊन जाईल. "अहो भरती ओहोटी अगदीं बंद झाली" अशी ओरड मुंबई, कराची, मद्रास, कोलंबिया वगैरे बंदरांतून

आपणास ऐकूं येईल. त्यामुळें जहाजें, होड्या बंदरांत येऊं शकणार नाहींत; व आंत आलेलीं बाहेर काढतां येणार नाहींत. कारण भरतीच्या वेळीं किनाऱ्याजवळील पाण्याची खोली वाढते, व शिवाय खाड्यांतून समुद्राचें पाणी जमिनीकडे दूरवर आंत जातें; तेव्हां याचा फायदा घेऊन साधारण मोठीं जहाजें किनाऱ्यालगत आणतां येतात, व लहान बोटींनीं माल बराच दूरवर नेतां येतो. ओहोटीच्या वेळीं पाणी भराभर उतरतें त्याचा फायदा घेऊन आंत आलेलीं जहाजें व बोटी बाहेर काढतां येतात. अर्थात् भरती ओहोटी बंद झाली तर समुद्रावरील व्यापार अगदीं बसून जाईल !

चंद्राचे योगानें भरती ओहोटी कशी होते ती पहा. **सर्व पदार्थ आपापल्या आकाराचे मानानें एकमेकांस ओढीत असतात.** पृथ्वी चंद्रास आपल्याकडे ओढते, चंद्र पृथ्वीस आपल्याकडे ओढतो. सूर्य सर्व ग्रहांस आपल्याकडे ओढतो, व सर्व ग्रहही सूर्यास आपल्याकडे ओढतात. तथापि चंद्र हा पृथ्वीस सर्वांत जवळ असल्यामुळें त्याचाच परिणाम पृथ्वीवर फार होतो, व पाणी पातळ व हलकें असल्यामुळें चंद्राच्या आकर्षणानें तें वर उचंबळून येतें. याप्रमाणें तें वाढूं लागलें म्हणजे भरती होते. सुमारें सहा तास पाणी चढत जातें, व मग तें सहा तास ओसरत असतें. याप्रमाणें बारा तासांत एकदा भरती व ओहोटी पुरी होते. अर्थात् दिवसांतून हा चमत्कार दोनदां होतो. चंद्र ज्या वेळीं एकाद्या स्थळीं बरोबर डोक्यावर येतो तेव्हांच तेथें कमालीची भरती येते. यावरून भरती ओहोटीचा संबंध चंद्राशीं असला पाहिजे हें स्पष्ट होतें, व ही गोष्ट बऱ्याच प्राचीन काळापासून लोकांनीं ओळखिली होती.

---

## धडा ५१

# चंद्रावरील मौज

### भाग २ रा

सर्व आकाशस्थ गोलांत चंद्र हा आपणास जवळचा आहे असें मागें सांगितलेंच आहे. अर्थात् चंद्राविषयीं आपणास जितकी माहिती मिळूं शकते, तितकी इतर कोणत्याही गोलाविषयीं मिळत नाहीं. आजमितीस ज्योतिःशास्त्रज्ञांनीं मोठमोठ्या दुर्बिणींचे साहाय्यानें चंद्राचे खूप बारकाईनें वेध घेऊन त्यावरील प्रदेशांचे बिनचूक नकाशे काढलेले आहेत; व त्यावरील सर्व प्रदेशांस नांवेंही दिलीं आहेत. शास्त्रज्ञांनीं या बाबतींत मिळविलेली माहिती व काढलेले तर्क हीं फार मनोरंजक असल्यामुळें त्यांचा थोडासा नमुना खालीं दिला आहे. चंद्राची एकच बाजू नेहमीं आपल्याकडे वळलेली असल्यामुळें खालील माहिती त्याच भागाविषयीं असणार, हें उघड आहे.

एखादी उत्कृष्ट व मोठ्या शक्तीची दुर्बीण घेऊन जर आपण चंद्राकडे पाहिलें तर आपणास असें दिसून येईल कीं, चंद्राचा पृष्ठभाग उंच उंच पवतांचीं शिखरें व दऱ्याखोरीं यांनीं खचून भरला आहे. पर्वतांचीं शिखरें व टेंकड्या प्रकाशित दिसतात. खोल दऱ्या व मैदानें अर्थात्च अंधकारमय दिसतात.

याशिवाय चंद्रावर अंधुक प्रकाशमय असे कांहीं पट्टे दिसतात. हे समुद्र असावे असा पूर्वी समज होता. व त्यामुळें पृथ्वीप्रमाणेंच चंद्रावरही हवेचें आवरण असावें असा तर्क होता. पण आजमितीस असें निश्चित झालें आहे कीं, चंद्रावर पाण्याचा एक थेंबही नाहीं. यामुळें त्यावर जरी कदाचित् हवा असली, तरी ती अत्यंत रुक्ष व कोरडी ठणठणीत सावी असें म्हणावें लागतें.

चंद्रावरील या कोरड्या समुद्रांना नकाशांत योग्य स्थानें मिळून ते ओळखतां यावेत या हेतूनें ज्योतिःशास्त्रज्ञांनीं त्यांना वेगळीं वेगळीं नांवें दिलीं आहेत. हीं नांवें फार मौजेचीं व काव्यमय आहेत. उदाहरणार्थ एका समुद्राचें नांव "अमृतसागर," तर दुसऱ्याचें नांव "आपत्समुद्र;" तिसऱ्या एकाला "मृत्युसमुद्र" म्हटलें असून, चवथ्याचें नांव "इंद्र-धनुष्याचा उपसागर" व पांचव्याचें "दंहिवराचा उपसागर" असें ठेविलें आहे. चंद्रावरील पर्वतांना मात्र प्रसिद्ध ज्योतिर्विदांचीं किंवा पृथ्वीवरील पर्वतांचीं नांवें देण्यांत आलीं आहेत. जसें—"आल्प्स," "आपीना-इन्स," "टॉलेमी," "न्यूटन," इत्यादि.

चंद्रलोकच्या पर्वतांची आज आपणास पृथ्वीवरील पर्वतांपेक्षां जास्त माहिती आहे असें म्हटलें तरी शोभेल. त्या पर्वतांची उंची जवळ जवळ बिनचूक मोजलेली आहे. व या मोजणीवरून असें दिसतें कीं चंद्राव-रील पर्वत त्याच्या आकाराच्या मानानें फारच उंच आहेत. उदाहरणार्थ, **न्यूटन** पर्वताची उंची २४००० फुटांवर आहे; म्हणजे अर्थात् तो आपल्या आल्प्स पर्वताहून पुष्कळच उंच आहे.

**टायको** पर्वताचें शिखर चंद्रावरील सर्व पर्वतशिखरांत फारच सुंदर व तेजस्वी दिसतें. चंद्रबिंबावरील एका कडेला एखाद्या लकलकीत ताऱ्याप्रमाणें साध्या डोळ्यांनीं सुद्धां पाहतां येण्यासारखा एक सफेत टिपका दिसतो, तोच हें शिखर होय. पौर्णिमेच्या दिवशीं तर हें फारच तेजःपुंज दिसतें, व त्याचा प्रकाश चंद्रलोकीं दूरवर पडतो.

पण चंद्रावरील पर्वतांची सर्वांत आश्चर्यकारक गोष्ट म्हटली म्हणजे त्यांचा **पोकळपणा** ही होय; म्हणजे या पर्वतांचीं शिखरें निमुळतीं होत जाऊन त्यांचा शेवट चिंचोळ्या टोकांत झालेला नाहीं, तर त्यांच्या शेवटीं कमजास्त रुंदीचीं उघडीं तोंडें आहेत. व या तोंडांतून आंत खोल विवरें असलेलीं नजरेस येतात. जशी पर्वतांची उंची मोजावयाची

तशीच या शिखरांच्या मुखांतून दिसणारी खोलीही मोजावयाची, असें दुहेरी मोजणीचें काम या पर्वतांच्या बाबतींत करावें लागतें.

या चमत्कारिक प्रकाराचें कारणही उघडच आहे कीं, हीं शिखरें म्हणजे चंद्रावरील ज्यालामुखी पर्वतांचीं मुखेंच आहेत. चंद्राचा सर्व पृष्ठभाग एका कालीं अशा ज्वालामुखींनीं गजबजलेला होता. हे सर्व ज्या वेळीं प्रदीप्त असतील त्या वेळीं येथें काय भयंकर देखावा दिसत असेल ? पण आजमितीस मात्र हे सर्व ज्वालामुखी थंड झाले आहेत. कारण चंद्राच्या अंतर्भागींतील सर्व उष्णता त्यांचे द्वारें बाहेर पडून आतां जळणारे पदार्थच त्यांत शिल्लक उरले नाहींत.

यांपैकीं एखाद्या विवरांतून जर आपण आंत उतरलों तर आपणास पर्वताच्या पायथ्यावरील प्रदेशापेक्षां किती तरी खोल जावें लागेल ! एखादा प्रवासी जर चंद्रावरील प्रदेश पाहातां पाहातां या विवराच्या एका बाजूला येऊन पोंचला, व त्याला त्याच्या समोरच्या बाजूला जावयाचें असेल, तर त्यानें संबध विवराला प्रदक्षिणा घातल्यावांचून सोयच नाहीं. कारण जर का पुढील खड्डा उतरून पलीकडे जावयाचें तो मनांत अणील, तर त्याला जवळजवळ पाताळ लोकीं जाऊन पुनः परत वर आल्याचें श्रेय मिळेल.

चंद्रावरील प्रदेशाइतका खांचखळग्यांनीं भरलेला, व ओबडधोबड मुलुख पृथ्वीवर तर नाहींच, पण दुसऱ्या कोणत्याही गोलावर सांपडणार नाहीं. त्यावरील पर्वत म्हणजे थंड झालेले ज्वालामुखीच असल्यामुळें एकावर एक अव्यवस्थितपणें रचिलेल्या प्रचंड दगडांच्या राशीप्रमाणें या डोंगरांचा देखावा दिसतो.

येथें हवा मुळींच नाहीं हें आम्ही वर सांगितलेंच आहे. त्यामुळें येथें कधीं धुकें, मेघ, दंहिवर, बर्फ वगैरे कांहीं एक नसतें. आकाश जेव्हां पहावें तेव्हां स्वच्छ व काळें कुळकुळीत दिसत असलें पाहिजे. व त्यामुळें दिवसा सूर्य व रात्रीं नक्षत्रें फारच तेजस्वी दिसत असावीं.

आपण अशी कल्पना करूं कीं एके दिवशीं सूर्योदयापूर्वीं आपण चंद्रावरील एका मैदानांत येऊन पोंचलों आहों. आतां चमत्कार पहा अं ! सूर्योदयाला थोडींशीं मिनिटें राहिलीं असून येथें अरुणाचा तांबडा प्रकाश मुळींच दिसत नाहीं ! येथें हवाच जर नाहीं तर संधि-प्रकाश कसा असावा ? हवेंतून सूर्याचे किरण जेव्हां वांकडे तिकडे होऊन मार्ग काढीत येतात, तेव्हांच सूर्योदयापूर्वीं व सूर्यास्तानंतर त्यांचा थोडासा प्रकाश आपणास मिळतो. येथें पहा, एकदम जो सूर्य येतो तो जिकडे तिकडे सारखाच प्रकाश पाडतो; व तो गेला कीं लगेच अंधार गुडुप ! बरें, हवा असली म्हणजे घराबाहेर जरी सूर्य असला, तरी घराचे आंतही थोडासा प्रकाश पडतो. पण येथें तसें होऊं शकत नाहीं. पर्वतावर डोळे दिपून जाण्यासारखा प्रकाश; पण गुहांत? काळाकभिन्न अंधकार ! या अंधकारमय प्रदेशांत तारेसुद्धां अगदीं स्पष्ट दिसत असतात !

वरील कल्पना अर्थातच चंद्रावर माणूस जाऊं शकेल या समजुतीवर बसाविली आहे; पण वस्तुतः पाहतां मनुष्य चंद्रावर पोहचूं शकणार नाहीं; व पोंचला तरी एक पळभरही जगूं शकणार नाहीं. हवेशिवाय कोणता प्राणी किंवा वनस्पती जगूं शकेल? व फार दांडग्या शक्तीच्या दुर्बिणींतूनही चंद्रावर अद्याप कसल्याही प्रकारची सजीव वस्तु आढळून आली नाहीं.

---

## धडा ५२

## ब्रिटिश साम्राज्याची राजधानी

## लंडन शहर

इंग्लंड देशाची राजधानी जें **लंडन** शहर तेंच सर्व ब्रिटिश साम्राज्याचीही राजधानी आहे. कारण ब्रिटिश साम्राज्यांत जे नानाविध

देश आहेत, त्यांपैकीं कित्येक जरी बऱ्याच अंशीं स्वतंत्र आहेत, तरी त्या सर्वांवर ब्रिटिश पार्लमेंट सभा व इंग्लंडचा राजा यांचें आधिपत्य चालतें. अर्थात् एवढ्या जगड्व्याल साम्राज्याचीं सूत्रें जेथून हालविलीं जातात, तें शहर तसेंच महत्वाचें असलें पाहिजे.

पण लंडन शहराला जें महत्व चढलें आहे, तें केवळ ती साम्राज्याची राजधानी आहे म्हणून नव्हे. तर विस्तारानें, संपत्तीनें, व्यापारानें व लोकसंख्येनें या शहराचा नंबर सर्व जगांत पहिला आहे. सर्व जगाच्या व्यापाराचें हें शहर जणूं कांहीं केंद्र आहे. येथें जगांतील सर्व राष्ट्रांतील लोक कांहीं ना कांहीं तरी कारणानें येतात. कोणालाही येथ परक्या परक्यासारखें वाटावयाचें कारण नाहीं. कारण थोडे तरी आपल्या राष्ट्रांतले व धर्माचे लोक त्याला भेटल्याखेरीज राहावयाचे नाहींत. येथें सर्व जगांतून सर्व प्रकारचा माल येतो; व येथील कारखान्यांतून सर्व देशांस भिन्न भिन्न तऱ्हेच्या वस्तूंचा पुरवठा होतो. लंडनच्या बाजारांत मिळत नाहीं अशी वस्तूच नाहीं; व येथें खपत नाहीं असा मालही नाहीं. सर्व धर्मांचे, सर्व मतांचे, सर्व प्रकारच्या विद्या, कला, शास्त्रें जाणणारे लोक येथें तुम्हांला भेटतील.

विस्तारानें व लोकसंख्येनें तर एवढें मोठें शहर हेंच. याच्या वाढीचा इतिहास फार विचित्र आहे. **एलिझाबेथ राणी**च्या कारकीर्दींत (इ. स. १५५८–१६०३) या नगराचें क्षेत्रफळ सुमारें दोन चौरस मैल होतें. इ. स. १८१८ पर्यंत तें सरासरी सहा चौरस मैल झालें. १८१८ पासून १८३४ पर्यंत त्याची दुप्पट झाली. १८३४ पासून १८८१ पर्यंत ४७ वर्षांत त्याचें क्षेत्रफळ ८० चौरस मैल झालें; व हल्लींतर लंडन शहर व त्याच्या निकट असलेले भाग यांचें मिळून क्षेत्रफळ १२२ चौरस मैल आहे. येथील लोकवस्ती अजमासें ४०–४५ लाख आहे. एकंदर इमारतींची संख्या सरासरी सहा लाख असून शहरांत

८००० वर रस्ते आहेत. एकट्या लंडन शहरांत एडिनबर्गपेक्षां जास्त स्कॉच लोक आहेत, डब्लिनपेक्षां जास्त आयरिश लोक आहेत; पालेस्टाईनपेक्षां जास्त ज्यू लोक आहेत, व रोम शहरापेक्षां जास्त रोमन क्याथलिक धर्माचे लोक आहेत. एवढ्या लोकवस्तीला खाणेंपिणें किती लागत असेल, कपडालत्ता किती लागत असेल, व ऐषआरामाची सामग्री येथें किती खपत असेल, याचा वाचकांनींच अंदाज करावा.

तथापि एक गोष्ट मात्र प्रथम दर्शनीं चमत्कारिक वाटते. हें शहर कितीही अवाढव्य असो, व यांतील व्यापार, संपत्ति व सामर्थ्य कितीही वर्णनीय असोत, एवढें खरें आहे कीं हें प्रथमदर्शनीं प्रेक्षकास मोहून टाकीत नाहीं. लाखों घरांनीं व्यापलेला तो विस्तीर्ण प्रदेश बाहेरून येणारास केवळ अंधक दिसतो. याचें एक कारण धुकें, व दुसरें धूर. प्रत्येक घराच्या अग्रभागीं कमजास्त धूर जाणारे नळ सोडलेले असतात. त्यांतून सारखा धूर निघत असल्यावर सर्व शहर दूरून अंधकारमय दिसेल यांत नवल तें काय? चॅरिंग क्रास स्टेशनावरून शहराकडे नजर फेंकली कीं, लंडन शहराभोंवतालच्या उपनगरांतील लोकांची गर्दी व कामाची एकच धांदल नजरेस पडते. खुद्द शहरांत पुरेशी जागा नसल्यानें फक्त कामाधामापुरतें तेथें जाऊन बरेच लोक या उपनगरांत राहतात; लंडन शहराचा हा भाग हजारों कारखाने, गिरण्या, भट्ट्या, शाळा, दवाखाने वगैरेंच्या इमारतींनीं व त्यांतील घडामोडींनीं अत्यंत गजबजलेला असतो. जिकडे पहावें तिकडे आगगाड्यांचे रस्ते व तारायंत्रें यांचीं जणूं कांहीं जाळींच बनून गेलेलीं दिसतात. जाहीरातींचे मोठमोठे फळे चोहोंकडून आपले नेत्र आकर्षून घेत असतात. आगगाडी कधीं पुलावरून तर कधीं कमानीखालून आपला मार्ग काढीत असते. व चोहोंकडे कानठाळ्या बसविणारे नानाप्रकारचे आवाज, धूळ व धूर यांचा एकच घोंटाळा माजून गेलेला असतो.

तथापि थोड्याच वेळांत ह्या घोंटाळ्यांत मनास आनंद व उपदेश देणारे असे कितीतरी प्रकार आपल्या नजरेस पडूं लागतात. ती लक्षावधि लोकांची गर्दी, त्यांचे हजारों तऱ्हेचे व्यवसाय, व त्यांचीं नानाप्रकारचीं सुखदु:खें यांजकडे लक्ष वेधून आपलें मन गुंग होतें.

आपण आतां शहराच्या निरनिराळ्या भागांत प्रवेश करून त्यांचें थोडेंसें निरीक्षण करूं या. ही पहा, रस्त्यांतून काय विलक्षण गर्दी व धांदल चालू आहे! गाड्या, घोडीं, ट्रॅमगाड्या, मोटारगाड्या यांची रहदारी सारखी सुरू आहे. रस्त्याच्या दोहों बाजूंवरील फरसबंदीवरून माणसांची तर नुसती मुंग्यांसारखी रवण लागलेली आहे. रस्त्याच्या दोहोंबाजूस मोठमोठ्या उंच हवेल्या, व नानाप्रकारच्या मालांनीं भरलेलीं दुकानें लागून गेलेलीं आहेत; पण या सर्व गर्दींत व धांदलींत सहसा घोंटाळा व अपघात झालेले दिसून येत नाहींत. याचें कारण येथील लोकांना शिस्तीचें व कायद्याला मान देण्याचें अगदीं अंगवळणीं पडलेलें असतें. रस्त्याच्या एका कोपऱ्यांत एक निळा पोषाक घातलेला पोलिस शिपाई उभा असतो, तो सर्व गाड्या घोड्यांची व माणसांची रहदारी शिस्तीनें चालवीत असतो. त्यानें हात वर केला कीं सर्व गाड्या एकदम थांबतात!* तुमचा दर्जा कितीही मोठा असो, तुमचें काम कितीही महत्वाचें असो, व तुम्हांला पुढें जाण्याची कितीही घाई असो, शिपायानें खूण केली कीं तुम्ही थांबलेंच पाहिजे. त्यानें हात खालीं केला कीं पुढचा रस्ता मोकळा झाला असें समजावें. मग पुन: रहदारी चालू होते. या बाबतींत कोणीही कुरकुर करीत नाहीं. शिपायाचें करणें बरोबर होतें कां चुकीचें होतें याची कोणी चौकशी करीत नाहीं. हुकूम होण्याचा अवकाश, लोक तो निमूटपणें पाळतात. कारण तो यःकश्चित दिसणारा शिपाई राजाचा शांतता राखणारा अधिकारी आहे, व त्याला मदत करणें हें आपलें काम आहे हें येथील सर्व लोक ओळखून

---

* पृष्ठ १९२ वरील चित्र पहा.

आहेत. म्हणूनच एवढ्या अवाढव्य शहराची प्रचंड घडामोड शांतपणें व धांदल न होतां चालू राहते.

---

### धडा ५३

## लंडन शहर

### भाग २ रा

हें पहा आपण **ट्राफल्गार चौकांत** येऊन पोहोंचलों. हा चौक फारच विस्तीर्ण असून तेथें मधून मधून सुंदर कारंजीं, व मोठमोठ्या लोकांचे पुतळे उभे केले आहेत. त्या सर्वांत एका उंच खांबावर उभा असलेला विख्यात आरमारी वीर **नेलसन्** याचा पुतळा फारच प्रेक्षणीय आहे. या वीरानें ट्राफल्गार येथें जो अद्वितीय विजय मिळविला, त्याचें स्मारक म्हणूनच हा चौक व हा पुतळा करण्यांत आलीं आहेत.

या चौकाच्या उत्तरेच्या बाजूला एक भव्य व लांबलचक इमारत आहे. तेथें इंग्लंड देशांतील व जगाच्या इतर भागांतील नामांकित चित्रकारांनीं काढलेलीं अप्रतिम चित्रें ठेवण्यांत आलीं आहेत. येथें कोणालाही जाऊन हीं सुंदर चित्रें पाहतां येतात. लंडन शहरांत अशीं संग्रहालयें अनेक आहेत. कोठें नाना तऱ्हेचे प्राणी ठेवले आहेत; कोठें सर्व तऱ्हेच्या वनस्पतींचे बाग आहेत; तर कोठें जगांतील सर्व प्रकारच्या चमत्कारिक व दुर्मिळ पदार्थांचा संग्रह केलेला आहे. अशा सर्व ठिकाणांत **ब्रिटिश म्यूझियम** ( अजबखाना ) हा फार महत्वाचा आहे. येथें पहावयास मिळत नाहीं, अशी वस्तु जगांत नाहींच असें म्हटलें तरी शोभेल. येथील पुस्तकालय तर जगांतील कोणत्याही पुस्तकालयापेक्षां मोठें असून तेथें अत्यंत दुर्मिळ अशा जगांतील बहुतेक भाषांतील पुस्तकांचा संग्रह आहे.



ट्राफलगार चौक—नेलसनूचें स्मारक

दक्षिणेकडील बाजूस **वेस्ट मिन्स्टर आबे,** व **पार्लमेंटगृहें** यांजकडे जाणारा रस्ता आहे. व याच रस्त्यावर सर्व प्रकारच्या सरकारी कचेऱ्यांच्या इमारती लागतात. आपल्या हिंदुस्थानचा कारभार चालविणारें "**इंडिया आफिस**" सुद्धां याच रस्त्यावर आहे. या चौकाच्या पश्चिमेस एक सुंदर व भव्य दगडी कमान असून तिच्यापलीकडे दुतर्फा



पार्लमेंट गृह

सारख्या लागून गेलेल्या झाडांच्या कमानीनें आच्छादिलेला एक लांब रस्ता आहे. या रस्त्याच्या अखेरीस "**बकिंगहाम पालेस**" नांवाचा राजवाडा आहे, व आपल्या बादशहांचा मुकाम ज्या वेळीं लंडन शहरांत असतो त्या वेळीं ते येथेंच राहतात. हा वृक्षाच्छादित मार्ग **पुण्यश्लोक महाराणी विक्टोरिया** यांच्या स्मरणार्थ तयार करण्यांत आला

आहे. लंडन शहराच्या या व इतर भागांत प्राचीन राजेराण्या व इतिहासप्रसिद्ध स्त्रीपुरुष यांचीं अशींच निरनिराळीं स्मारकें करून ठेवण्यांत आलीं आहेत. त्यामुळें या श्रेष्ठ विभूतींची स्मृति ताजी राहून लोकांच्या मनास चांगलें वळण लागतें.

आतां आपण **पॉलमॉल** या नांवाच्या भागांत येऊन पोहोंचलों आहों. हा लंडन शहरांतील एक अत्यंत रमणीय रस्ता आहे. लंडन शहरांतील श्रीमान व सुखवस्तु लोकांचीं विश्रामगृहें येथेंच आहेत. येथें त्यांचे वेगवेगळे समाज अथवा क्लब असतात; व या क्लबांतून ऐष आरामाच्या व करमणुकीच्या सर्व साधनांचा संग्रह केलेला असतो.

येथून सेंट जेम्स रस्त्यानें आपण **पिकॉडिली** नामक रस्त्यांत प्रवेश करतों. येथें श्रीमंत व चैनी लोकांना पाहिजे असलेला सर्व प्रकारचा माल सुंदर रीतीनें मांडून ठेवलेलीं दुकान व मोठे मोठे पथिकाश्रम अथवा हॉटेलें आहेत. उंची पोषाक केलेले स्त्रीपुरुष नानाप्रकारच्या वस्तु खरेदी करण्यांत येथें गुंग झालेले दिसतात.

या पिकॉडिली रस्त्यानें पश्चिमेकडेच कांहीं वेळ जावें, म्हणजे डाव्या बाजूस एक मोठी उद्यानभूमि लागते. व भोंवतालच्या इमारतींच्या गर्दींत तर ही खुली व हिरवीगार बाग फारच आनंद देते. उजव्या बाजूस इंग्लंडमधील मोठमोठ्या सरदार घराण्यांतील लोकांचीं प्रशस्त भवनें लागून गेलीं आहेत. समोरच्या बाजूस सेंट जार्जचें हास्पिटल आहे. येथें गरीब व अनाथ रोग्यांची फुकट शुश्रूषा केली जाते. अशीं हास्पिटलें लंडन शहरांत किती तरी आहेत; व लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं त्यांपैकीं बहुतेक, लोकांनीं आपण वर्गणी करून तींतून चालविलीं आहेत.

उत्तरेच्या बाजूस आपण वळलों कीं आपणास **हाइड पार्क** नांवाचें विस्तीर्ण उद्यान लागतें. येथें हिरव्यागार गवतानें झांकलेलीं व मधून

मधून सुंदर कारंज्यांनीं सुशोभित केलेलीं मैदानें असून कांहीं ठिकाणीं खूब उंच व जुनाट अशा वृक्षांची राई लागून गेल्यामुळें, या माणसांनीं गजबजून गेलेल्या शहरांत थोडी मोकळी व स्वच्छ हवा मिळण्याची सोय झाली आहे. अशा तऱ्हेच्या खुल्या व स्वच्छ बागांनींच लंडन शहराचें आरोग्य चांगलें राहूं शकलें आहे. सारा दिवसभर कोंडलेल्या जागेंत काम केलेले लोक संध्याकाळच्या प्रहरीं येथें येऊन थोडा आराम करितात, व ताजेतवाने होऊन घरीं जातात. श्रीमंत लोकही येथें सकाळ संध्याकाळ हवा खाण्यास येतात.

आतांपर्यंत आपण " **वेस्ट एंड** " म्हणजे पश्चिमपुरांत होतों. हा भाग श्रीमान् व ऐषआरामी लोकांचा असल्यामुळें लंडन शहरांतील गरीब लोक कसे राहतात याची आपणास कल्पना आली नाहीं. तर चला आतां, आपण **ईस्टएंड** अथवा पूर्वपुरांत जाऊं. जातांना आपण एका नव्याच प्रकारच्या वाहनांतून जाऊं, म्हणजे त्याचीही तुम्हांस कल्पना येईल. हें वाहन म्हणजे **भुयारांतील आगगाडी** हें होय. एका स्टेशनांत जाऊन आपण तिकीट घेतों; व मग एका खोलींत जाऊन बसतों. लगेच ती खोली खालीं खालीं जाऊं लागते, व शेवटीं आपण एका अंधेऱ्या पण दिव्यांनीं प्रकाशित केलेल्या प्लाटफार्मवर येतों. थोड्याच वेळांत आगगाडी येते तींत बसून आपण आपल्या इष्ट ठिकाणच्या स्टेशनपर्यंत पोंचतों. तेथें उतरून पूर्वींसारख्याच एका खोलींत बसतांच ती खोली वर चढून आपणास पुन: खुल्या हवेंत नेऊन सोडते. या वर खालीं जाणाऱ्या खोल्यांस **लिफ्ट** म्हणतात. सर्व लंडन शहराच्या खालच्या बाजूस याप्रमाणें भुयारांतील आगगाड्या गेलेल्या आहेत. यांनीं जाणें फार सवंग पडत असल्यामुळें गरीब लोक लंडनच्या एका भागांतून दुसऱ्या भागांत जाण्यास यांचाच उपयोग करितात.

---

## धडा ५४

# लंडन शहर

### भाग ३ रा

पूर्वपुरांत पोहोंचतांच आपल्यास किती तरी वेगळ्याच प्रकारचा देखावा नजरेस पडतो. मोठमोठ्या गिरण्या, कारखाने, व त्यांत काम करून पोट भरणाऱ्या लक्षावधि गरीब मजूरांचीं गलिच्छ घरें यांनींच हा भाग भरून गेला आहे. मरे मरे तों काम करूनही पोटभर अन्न व अंगभर वस्त्र न मिळाल्यामुळें, या बिचाऱ्या मजूरवर्गाची स्थिति अत्यंत दैन्यवाणी असते. या पूर्वपुरांतील एखाद्या रस्त्यानें आपण जाऊं लागलों तर हजारों मजूर लोक भराभर आपल्या कारखान्याकडे जात आहेत; कारखान्यांतील यंत्रांची घरघर व ठोकाठोकी यांचे कठोर आवाज आपल्या कानावर पडत आहेत; सूत, कातडीं, लोंकर वगैरे तयार होऊं घातलेल्या मालाचीं दुर्गंधी वस्कन् आपल्या नाकांत शिरत आहे; व धुरळा व धूर आपल्या नाकातोंडांत शिरत आहेत असा अनुभव आपल्यास येईल. दारिद्र्यामुळें चोरी वगैरे करण्याकडे ज्यांचें मन वळलें आहे असे भुरटे चोर पोलिसांची नजर चुकविण्याकरितां अशाच गलिच्छ भागांत येऊन राहतात. लंडन शहरांतील या गरीब पण अत्यंत कष्टाळू मजूर वर्गाचीं दुःखें कशीं निवारण करावीं; त्यांना खाण्याला अधिक पौष्टिक व भरपूर अन्न कसें देतां येईल, व त्यांचीं घरें स्वच्छ व हवाशीर कशीं करितां येतील, इकडे सरकारी अधिकारी व संपन्न परोपकारी लोक यांचें अलीकडे बरेंच लक्ष लागलें आहे, व या दिशेनें कांहीं प्रयत्न झाले असून त्यांस यशही बरेंच येत आहे.

लंडन शहराचा जुना भाग पूर्वपुरांतच आहे, व याला बहुधा नुसतें "शहर" असें म्हणण्याची वहिवाट आहे. हा शहराचा व्यापारी भाग होय; यांतच बहुतेक मालाच्या वखारी, व व्यापाऱ्यांच्या पेढ्या व

आफिसें वगैरे आहेत. अर्थात् हा भाग दिवसा अगदीं गजबजलेला असतो, पण रात्रीं मात्र येथें अगदीं वस्ती नसते. लंडनच्या आसपास जीं छोटीं व स्वच्छ उपनगरें आहेत तेथून आगगाडीनें, मोटारींनें किंवा भूगर्भांतील आगगाड्यांनीं आपापल्या आफिसास लोक जातात.

पश्चिमेकडून आलें म्हणजे आपण प्रथम "टेंपल बार" पाशीं पोंचतों. येथूनच "शहरा"ला सुरवात होते. येथें मुख्य न्यायाचीं कोर्टें आहेत. येथून पुढें "**फ्लीटस्ट्रीट**" नांवाचा रस्ता लागतो. सर्व मुख्य मुख्य वर्तमानपत्रें व मासिकें यांचे छापखाने व आफिसें या भागांत आहेत. बहुतेक तासा तासाला कित्येक पत्रांचे ताजे अंक निघत असतात, व ते घेऊन विकणारीं पोरें ओरडत असतात. त्यामुळें या रस्त्यावर सारखी धांदल सुरू असते. एवढ्या प्रचंड व्यापारी शहरांत व्यापारासंबंधींच्या ताज्या बातम्यांचें महत्त्व फार असावयाचेंच; यामुळें व्यापारी लोक हे ताजे अंक घेण्याकरितां अगदीं टपलेले असतात.

या गडबडीच्या रस्त्यांतून बाहेर पडलें म्हणजे अगदी समोरच एका लहानशा टेकडीवर एक अत्यंत सुंदर व प्रशस्त असें देवालय दृष्टीस पडतें. हेंच विख्यात **सेंट पालचें** देऊळ होय. इंग्लंडच्या राजास अभिषेक झाला म्हणजे त्यानें या देवालयांत येऊन परमेश्वराची आभारपूर्वक प्रार्थना करावी अशी वहिवाट आहे. या देवळाचा घुमट फारच प्रचंड व उंच असून तो कित्येक मैलांवरून दिसतो. व टेम्स् नदीवरून तर याचा देखावा फारच मनोरम दिसतो. इंग्लंडमधील कित्येक सुप्रसिद्ध महात्म्यांना या देवालयाच्या आवारांत पुरण्यांत आलें आहे. विख्यात सेनापति **ड्यूक आफ वेलिंगटन्** यासही याच ठिकाणीं पुरण्यांत आलें !

पण पुरातनत्वाचे दृष्टीनें, अथवा इंग्रजी राष्ट्राच्या इतिहासाशीं एकसारखा दृढ संबंध असल्यानें, "**वेस्ट मिन्स्टर आबे**" या देवालयास जें महत्व आहे, तें इतर कोणत्याही इमारतीस नाहीं. ही इमारत ट्राफल्गार

चौकाच्या दक्षिणेकडून जो रस्ता जातो त्याच्या टोंकास आहे, हें पूर्वी सांगितलेंच आहे. ही ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकांत बांधण्यांत आली, व पुनः अकराव्या शतकांत **एडवर्ड दि कन्फेसर** नांवाच्या साधुवृत्तीच्या राजानें या मंदिराचा जीर्णोद्धार केला. तेव्हांपासून आणखी कित्येक राजांनीं या इमारतीचा विस्तार करून तिच्या सौंदर्यांत भर टाकिली आहे. इंग्लंडचे सर्व राजे व राण्या यांना याच इतिहासप्रसिद्ध



इमारतींत राज्याभिषेक होत आला आहे; व राजघराण्यांतील व इतरही कित्येक श्रेष्ठ स्त्रीपुरुषांच्या समाधि याच मंदिराच्या आवारांत आहेत. विख्यात कवि व ग्रंथकारांच्या दफनाकरितां या ठिकाणीं एक भाग मुद्दाम राखून ठेवण्यांत आला आहे. अर्थात् या ठिकाणीं पुरण्यांत येणें हें एक अत्यंत मोठ्या सन्मानाचें लक्षण समजण्यांत येतें. गेल्या आठ दहा शतकांत जे मोठे राजे, मोठे ग्रंथकार, मोठे शास्त्रज्ञ, चित्रकार, व शिल्पज्ञ होऊन

गेले त्या सर्वांच्या समाधींचें दर्शन आपल्यास या ठिकाणीं होतें; यामुळें या ठिकाणीं मन फार प्रसन्न पण गंभीर व उदात्त विचारांनीं पूर्ण असें होतें. या ठिकाणीं मनावर जो विलक्षण परिणाम होतो तो अनुभवानेंच जाणला पाहिजे; तो शब्दांनीं सांगतां येण्याजोगा नाहीं.

टेम्स नदीवरील **लंडन ब्रिज** नांवाच्या पुलावरून जो देखावा दिसतो तोही मोठा विलक्षण असतो. जगांतील सर्व देशांतून मालाची ने आण करणारीं जहाजें; मालाची चढउतर करण्याचे धक्के व गोद्या; व ती



चढउतर करणाऱ्या मजूरांची गडबड हीं पाहून मन आश्चर्यानें थक्क होतें. पृथ्वीवरील सर्व मालाची ही जणूं काय एकच उतारपेठ आहे कीं काय असा भास होतो. व कांहीं अंशीं तसा प्रकार आहेही. कारण इंग्लंड-च्या अवाढव्य व्यापारानेंच त्यास आज एवढें मोठें ऐश्वर्य व सामर्थ्य प्राप्त झालें आहे, व या सर्व व्यापाराचें टेम्स नदी ही मुखच आहे असें म्हटलें तरी चालेल. इंग्लंडचें सामर्थ्य त्याच्या अजिंक्य आरमाराच्या शक्ती-वर कसें अवलंबून आहे; त्याच्या इतिहासांत, व वाङ्मयांत समुद्राव-

रील सामर्थ्याला व व्यापाराला इतकें महत्व कां आलेलें आढळतें, या गोष्टीची थोडीबहुत तरी कल्पना टेम्स नदीवरील या जहाजांचा देखावा पाहिला म्हणजे आल्यावांचून रहात नाहीं.

---

## धडा ५५

# फ्लारेन्स नाइटिंगेल

मुलांनों, तुम्ही कधीं एखाद्या मोठ्या दुखण्यानें आजारी पडलां असाल त्या वेळीं तुमची अवस्था कशी झाली असेल बरें? अतिशय थकवा आलेला, तहानेनें घसा कोरडा झालेला, झोंप येत नाहीं म्हणून तळमळ चाललेली; अशा स्थितींत रात्र किती लांबच लांब वाटते बरें? पण अशा भयंकर रात्रीं तुमच्या शेजारीं तुमची प्रेमळ आई किंवा दुसरी कोणी मायाळू स्त्री असेल, व मधून मधून तुमचें आंग चेपून, किंवा हातपाय चोळून, किंवा वेळेस पाणी कांजी देऊन तुम्हांला शक्य तितका आराम व धीर देत असेल, तर त्या तशा स्थितींतही केवढें समाधान वाटतें, याची तुम्हांस आठवण असेलच. अशा आजारांत औषधोपचाराचें तर महत्व असतेंच. पण त्याहीपेक्षां प्रेमळ व जाणत्या स्त्रीनें केलेल्या शुश्रूषेचें महत्व फार असतें.

तुमची आई किंवा घरची इतर मायाळू स्त्री तुमची मनोभावें शुश्रूषा करते, म्हणून आजारांत तुमची आबाळ होत नाहीं. पण जवळचें कोणी नातलग नाहीं, म्हणून सरकारी इस्पितळांत पडलेले रोगी, किंवा आपल्या घरापासून शेंकडों कोस दूर रणांगणावर जखमी होऊन पडलेले शिपाई यांना अशीं प्रेमळ व काळजीपूर्वक शुश्रूषा करणारीं माणसें कशीं बरें मिळावींत? या शुश्रूषेच्या अभावीं कित्येक वेळां दवाखान्यांतले रोगी किंवा लढाईतले जखमी लोक मृत्युमुखीं पडतात असा अनुभव आहे. आजमितीस उत्तम शिकलेल्या व केवळ शुश्रूषेच्याच कामीं आपणास

वाहून घेतलेल्या अशा पुष्कळ परोपकारी स्त्रिया युरोप, अमेरिका वगैरे देशांत मिळतात; व म्हणून दवाखान्याची व युद्धांतील जखमी लोकांची स्थिती पुष्कळच सुधारली आहे. पण या स्थितीचें श्रेय कोणास दिलें पाहिजे हें तुम्हांस माहित आहे काय? हें श्रेय **फ्लारेन्स नाइटिंगेल** या अद्वितीय दयाशील व परोपकारी बाईस दिलें पाहिजे!

ही बाई घरची श्रीमंत होती. तथापि रोगी लोकांच्या शुश्रूषेचें जें काम आपण आंगावर घेतलें होतें त्यांत व्यत्यय येऊं नये म्हणून जन्मभर ती अविवाहित राहिली! अगदीं लहानपणींच तिचा परोपकाराकडील कल दिसून आला. एकदा तिला वाटेंत एक कुत्रा लंगडा होऊन पडलेला आढळला. त्याबरोबर तिचें अंतःकरण कळवळलें, व तिनें त्याला उचलून आपल्या घरीं आणून, रोजच्या रोज आपल्या हातानें त्याची जखम धुवून व बांधून त्याला चांगलें बरें केलें. आपल्या शेजारच्या गरीब लोकांच्या घरीं जावें, त्यांच्या आजारी माणसांची चौकशी करून त्यांना औषधपाणी, मलमपट्टी वगैरे देण्याचे कामीं मदत करावी, असा क्रम तिनें लवकरच सुरू केला. थोड्याच दिवसांत तिला असें आढळून आलें कीं, रुग्णशुश्रूषेच्या कामीं आपल्यास चांगलें यश येण्याचा संभव आहे. म्हणून तिनें सतत दहा वर्षें मेहनत घेऊन या विद्येचा चांगला अभ्यास केला. बरेचसे दवाखाने हिंडून तेथील व्यवस्थेचा अनुभव घेतला. नंतर जर्मनी देशांत कैसरवर्थ म्हणून जें शहर आहे, तेथें या शुश्रूषाशास्त्राचें शिक्षण चांगलें देण्यांत येतें असें तिनें ऐकिलें, म्हणून तिकडे जाऊन ती एक वर्षभर राहिली. यानंतर युरोपांतील इतर देशांत प्रवास करून तिनें या विषयाचें ज्ञान शक्य तितकें वाढविलें. ती सधन होती म्हणूनच तिला हें सर्व करितां आलें हें खरें; पण श्रीमंतीचा असा उपयोग करणारे लोक जगांत कितीसे आहेत बरें? "आपण श्रीमंत आहों; आपणास दगदग करून काय करावयाचें आहे?" असें म्हणणारे लोकच जगांत फार असतात.

परत आल्यावर तिनें इंग्लंडमधील दवाखान्यांत मुद्दाम जाऊन तेथील रोगी लोकांची सेवा करण्याची सुरवात केली. तिच्या गांवाशेजारीं शिशाच्या व दगडी कोळशांच्या खाणी आहेत. तेथें नेहमीं अपघात होऊन, कोणाचें डोकें फुटावयाचें, कोणाचा हात मोडावयाचा, असे प्रसंग यावयाचे. असली दुखणाईत मंडळी दवाखान्यांत आली कीं, त्यांच्या जखमा धुवून त्यांस पट्ट्या लावण्यास नाइटिंगेल स्वत: जावयाची. हें काम म्हणजे कमी महत्वाचें होतें असें नव्हे; पण लवकरच असा एक प्रसंग आला कीं, ज्याच्या योगानें तिनें संपादन केलेल्या विद्येची व तिच्या परोपकारित्वाची पूर्ण पारख होऊन तिची कीर्ति दिगंत पसरली.

इ. स. १८५४ सालीं इंग्लंड व रशिया या देशांत युद्ध सुरू झालें. व रशियाचे दक्षिणेस **क्रिमिया** द्वीपकल्प आहे तिकडे इंग्रज सैन्य रवाना झालें. या लढाईत यश अखेरीस इंग्लंड व त्याचें दोस्त फ्रान्स यांसच मिळालें. पण युद्धाचे सुरवातीस सैन्यांतील दाणापाण्याचा पुरवठा करणाऱ्या खात्यांत व दवाखान्यांत इतकी कांहीं अंदाधुंदी व अव्यवस्था होती कीं, खाण्यापिण्यावांचून, व रोगानें हजारों लोक पटापट मृत्युमुखीं पडण्यास सुरवात झाली. या लढाईत एकंदर २०,००० वर लोक मेले. पण त्यांतील सारे अडीच हजार लोक लढाईत कामास आले. बाकीचे सर्व इस्पितळांतच खपले! रोगी एकीकडे तर औषधें एकीकडे; खाण्याची सामग्री सर्व अपुरी व नासकी कुजकी, अशी अव्यवस्था झाल्यामुळें वरील अनर्थ व्हावा हेंच साहजिक होतें.

ही अंदाधुंदीची खबर इंग्लंडांत समजली तेव्हां तेथील लोकांनीं आकाशपाताळ एक करून सोडलें. लोकांना शांत कसें करावें, ही लढाईखात्याच्या प्रधानास मोठी फिकीर पडली. शेवटीं त्यानें नाइटिंगेल बाईस बोलावून सांगितलें कीं, " बाई, आपल्या देशास वेळ मोठी कठीण आली आहे, हें तुम्हांस सांगणें नको. या वेळीं तुम्ही मनावर घेऊन रोग्यांची शुश्रूषा

करण्याचें काम कराल तरच आमची धडगत आहे." नाइटिंगेल बाईनें काम मोठ्या आनंदानें पत्करलें हें सांगण्याची जरूर नाहीं. ती तावडतोब क्रिमियाकडे निघाली, व कान्स्टांटिनोपल शहरीं जाऊन पोंचली. कारण येथेंच आजारी लोकांच्या दवाखान्याची सोय केली होती.

ती वेळ मोठ्या आणीबाणीची होती. अगोदरच दवाखान्यांत २३०० लोक पडले होते. व नाइटिंगेलबाई पोंचली त्याच्या दुसरेच दिवशीं एक भयंकर लढाई होऊन तींत जखमी झालेल्या लोकांचें भलें मोठें भरताड एकदम येऊन दाखल झालें! मग काय विचारतां? दवाखान्यांत एकच गर्दी झाली. नाइटिंगेल व तिची मंडळी नुकतीच थकून आली होती. पण विश्रांति घेण्याची सोयच नव्हती. ती लागलीच कामास लागली. तिची टापटीप, व्यवस्था व सर्वांशीं गोड बोलून आपलें काम करून घेण्याची हातोटी अशी विलक्षण होती कीं, थोड्याच वेळांत तिचा उत्तम जम बसला. ती येतांच अंदाधुंदी जणूं काय पळून गेली. ती काम करूं लागली म्हणजे जशी कांहीं वाघीणच होती; वीस वीस तासपर्यंत खालीं बसत नसे. प्रत्येक रोग्याच्या औषधाची व पथ्याची व्यवस्था ती आपल्या नजरेखालीं करी. एका शेजारीं दुसरा, अशी बिछान्यांची रांग सुमारें अडीच मैल लांबीची होती! यावरून हें काम केवढें अजस्त्र होतें याची थोडीशी कल्पना येईल.

तिच्या प्रेमळ व गोड वाणीनें तेथील आडदांड व हडेलहप्प लष्करी रोग्यांसही तावडतोब वश केलें. केव्हां केव्हां एखाद्या शिपायाचा सडलेला हातपाय कापून टाकण्याचा प्रसंग येई, तेव्हां "मी नाहीं आपला हातपाय कापूं देणार" म्हणून तो हट्ट घेऊन बसे; व प्रसंगविशेषीं दांडगाई व ओरडाओरड करी. परंतु ह्या बाईची नाजूक सडपातळ मूर्ति व तिची शांत व प्रेमार्द्र मुद्रा पाहिली, व तिचे दोन शब्द ऐकिले, कीं तो वाटेल ती शस्त्रक्रिया करूं देई. बरा झालेल्या एका शिपायानें घरीं पत्र लिहिलें

त्यांत तो म्हणतो, "ह्या बाईनें आपणाकडे एकदा पाहिलें तरी मनाला आनंद होतो. आम्हांला प्राणदान देण्याकरितां स्वर्गींहून अमृत घेऊन ही कोणी देवांगना आलेली आहे कीं काय असें वाटतें. आम्हां शेजारून ती इकडून तिकडे हातांत एक दिवा घेऊन जातांना कित्येकांजवळ थांबून त्यांची चौकशी करते, व त्यांकडे पाहून मधुर हास्य करिते. त्या गोड स्मिताचा वांटा आपल्याला मिळावा अशी प्रत्येकाची इच्छा असते. पण ती कशी सफल व्हावी? आम्ही इतकेजण आहों कीं, सर्वांशीं तिनें बोलणें शक्यच नाहीं. तथापि ती इकडून तिकडे जाऊं लागली, म्हणजे तिची नुसती सावली आम्हांवर पडली तरी आम्हाला मोठी धन्यता वाटते."

याप्रमाणें तेथील सर्व रोगी बरे होऊन तो दवाखाना रिकामा पडे-पर्यंत तिनें अश्रांत श्रम केले. मध्यंतरीं या श्रमांनीं ती सडकून आजारी पडली. पण प्रकृति सुधारतांक्षणीं लगेच पूर्ववत् कामास लागली.

इंग्लंडांत परत आल्यावर लोकांनीं तिचें फारच जंगी स्वागत केलें. खुद्द **व्हिक्टोरिया महाराणी साहेबांनीं** तिला एक मूल्यवान् हिऱ्याची आंगठी नजर करून तिचा गौरव केला. सर्व राष्ट्रानें कृतज्ञतापूर्वक तिला अहेर करण्याकरितां सात लक्ष रुपये वर्गणी जमविली. पण ती पैशा-करतां काम करणारी भाडोत्री बाई थोडीच होती? तिनें ती रक्कम स्वतः न घेतां, शुश्रूषाविद्येंत स्त्रियांना शिक्षण देण्याची तजवीज व्हावी म्हणून दोन मोठ्या इस्पितळांत वांटून दिली.

नाइटिंगेल बाईच्या श्रमाचे परिणाम याहीपेक्षां लांबवर गेले. लढा-ईतील जखमी व आजारी लोकांस त्रास देणें हें रानटीपणाचें लक्षण आहे, असें सर्व राष्ट्रांस वाटून सर्वांनीं मिळून असें ठरविलें कीं, सैन्यां-तील डाक्टर व दवाखाने यांजवर उभयतां लढवय्या सैन्यांनीं कधींही शस्त्र धरूं नये. व अमुक ठिकाणीं दवाखाने आहेत असें कळण्याकरितां एक तांबडा क्रास ( × असें चिन्ह ) असलेलें निशाण उभारावें. हा

नियम हल्लीं बहुतेक राष्ट्रें पाळतात. लढाई म्हणजे अर्थातच क्रूर कृत्यांची बनलेली असते. परंतु तींत जर कोठें भूतदया असेल, तर ती या तांबड्या निशाणाखालीं होय. याबद्दल नाइटिंगेल बाईस सगळें जग धन्यवाद देत आहे !

क्रिमियाच्या लढाईनंतर तिची तब्रियत धडधाकड अशी कधींच राहिली नाहीं. तथापि तिचा परोपकारव्यवसाय अखेरपर्यंत चालू होता, व ती अगदीं अलीकडे इ. स. १९१० सालीं इहलोक सोडून गेली. तिच्याच औदार्याचें फळ जें सेंट टॉमस इस्पितळांतील रुग्णशुश्रूषाशिक्षणालय तेथें तिचा एक सुंदर पुतळा करून ठेवला आहे. व ती रोग्यांची शुश्रषा करतांना जो पोषाख घाली तसाच पोषाख व हातांतील दिवा या पुतळ्यांत दाखविला आहे.

**वा. ह. कानेटकरकृत " स्त्रीरत्नहार "** या पुस्तकावरून संक्षेपानें.

---

### धडा ५६

## विमान अथवा आकाशयान

आपल्या पुराणादि ग्रंथांतून देव, दैत्य वगैरे विमानांत बसून आकाशांतून संचार करीत असत, अशीं वर्णनें आढळतात. तीं वर्णनें खरीं किंवा खोटीं हें कांहींच सांगतां येत नाहीं. तरी जी गोष्ट अगदीं परवां परवांपर्यंत असंभाव्य वाटत होती, ती आतां बहुतेक अंशीं साध्य झाली आहे. प्रस्तुत चालू असलेल्या युरोपीय महायुद्धांत ज्या कित्येक नवीन गोष्टी उदयास आल्या आहेत, त्यांत आकाशयानांचा फार मोठ्या प्रमाणांत उपयोग ही एक आहे.

मुलें कागदी दिवे करून ते हवेंत सोडून देतात ही गोष्ट पुष्कळांनीं पाहिली असेल. त्या दिव्यांतील हवा उष्णतेनें भोंवतालच्या हवेपेक्षां हलकी होते, व म्हणून दिवा वर जातो. अगदीं प्रथम प्रथम जीं विमानें करीत तीं या दिव्यांप्रमाणेंच उष्ण हवेनें भरलेलीं असत.

परंतु इ. स. १७६६ सालीं **कॅव्हेंडिश** नामक रसायनशास्त्रज्ञानें सर्वांत हलका **हायद्रोजन** ( उज्ज ) नांवाचा वायु शोधून काढल्यानंतर विमानाच्या रचनेला एक नवें वळण लागलें. हीं विमानें बहुतकरून भोंवऱ्याच्या आकाराच्या पिशव्यांसारखीं असत; व तीं रेशमी कापडाच्या कळ्या एकमेकींस शिवून करीत असत. आंतील हायद्रोजन वायु बाहेर पडूं नये म्हणून विमानास रबराचें पक्कें रोगण देत असत. व त्यास बळकटी आणण्याकरितां बाहेरून एक जाळें त्यावर घातलेलें असे. या जाळ्याच्या दोऱ्या खालीं आणून त्यास नावेच्या आकाराची एक वेताची पाटी टांगलेली असे, व तिजमध्यें विमान उडविणारा बसे. विमानांत वायु भरण्यापूर्वी तें उडून जाऊं नये म्हणून त्याला दोऱ्यांनीं प्रथम खुंट्यांना घट्ट बांधिलेलें असे. या दोऱ्या तोडल्या म्हणजे विमान एकदम उडून उंच जाई, व हायद्रोजन वायु तर फारच हलका असल्यामुळें तें वाऱ्यानें इकडे तिकडे हेलकावे खात जाई. पुढें पुढें यांत हायद्रोजनचे ऐवजीं दगडी कोळशाचा धूर भरूं लागले.

वैमानिक आपल्याबरोबर वाळूनें भरलेल्या कांहीं पिशव्या वेई व यांचा उपयोग विमान खालीं उतरण्याचे कामीं होत असे. विमान खालीं आणावयाचें म्हणजे त्यांतील कांहीं वायु सोडून तें जड करावें लागे. यासाठीं त्याच्या आंतील बाजूस एक पडदा असे, व तो एक दोरी ओढून हलवितां येई. वायु सोडून विमान जड झालें म्हणजे तें फारच झपाट्यानें खालीं येऊं लागे; इतकें कीं तें तसेंच खालीं आलें तर जमिनीवर आदळून माणसाचे तुकडे तुकडे व्हावयाचे! विमानास अशी भयंकर गति आलीशी दिसली कीं, वैमानिक आपल्याजवळची वाळूची एक पिशवी खालीं टाकून देई, व विमान पुन: हलकें करी. अशा रीतीनें थोडा वायु कमी करावा, मग एक पिशवी टाकावी, असें करीत बेताबातानें तो खालीं उतरे. प्रथम प्रथम वैमानिक खालीं आल्यावर गळ

टाकून विमान एकाद्या झाडास अडकवी, व मग एका गाठीगांठीच्या दोरीस धरून खालीं उतरे. पुढें पुढें **पाराचूट** किंवा **विमानाची छत्री*** निघाली; ही एक भली मोठी कापडी छत्री असून हिला मध्यें दांडा नसे; फक्त वरच्या अंगास एक भोंक असे, व कांठाशीं दोऱ्या लाविलेल्या असत, व त्यांच्या तळाशीं एक वेताची नाव असे, तींत वैमानिक बसे. जमीनीपासून विमान अर्धा मैल आलें, म्हणजे पाराचूट विमानापासून



सोडवीत असत. ती खालीं येऊं लागली म्हणजे तींत हवा भरून ती आपोआप उघडे, व हवेच्या प्रतिरोधानें हळूहळू जमिनीपर्यंत येऊन पोंचे.

---

* असली छत्री मुलांना सहज करितां येईल. एक लहानसा वाटोळा कपडा घेऊन त्याला मधोमध एक भोंक पाडावें, व भोंवतालीं बऱ्याच दोऱ्या लावून त्या सर्वांच्या शेवटीं एक लहानसा दगड बांधावा. मग त्या दगडाला त्या कपड्यांत गुंडाळून ती पुरचुंडी वर फेंकावी. म्हणजे आपोआप तो दगड खालीं लोंबकळूं लागून ती छत्री उघडते, व सावकाश खालीं उतरते.

वरील प्रकारच्या विमानांतून खालीं उतरतांना बरेच वेळां मोठमोठे अपघात होत. पण धाडशी लोकांनीं तशाही स्थितींत कित्येक वेळां वर जाऊन अनेक शोध लावले. प्रसिद्ध वैमानिक **ग्लेशर** व **क्लाक्सवेल** यांनीं विमानांत बसून कोठवर उंच जाववतें याची सीमा पहाण्याचा प्रयत्न इ. स. १८६२ सालीं केला. तेव्हां ते ३७००० फूट, म्हणजे सुमारें सात मैल उंच गेले होते! ही उंची हिमालयाच्या अत्युच्च शिखराच्याही वर दीड



मल इतकी झाली. येथें हवा इतकी विरळ व थंड होती कीं, ग्लेशर तर बेशुद्धच पडला, क्लाक्सवेलचीही गत तशीच होत चालली. थंडीनें त्यांचें रक्त गोठून हात काळे ठिक्कर पडले; व अर्धांगवायु झाल्याप्रमाणें त्यांचे अवयव त्यांच्या स्वाधीन राहिले नाहींत. अशी स्थिती होऊं लागतांच क्लाक्सवेलनें वायु कमी करून विमान खालीं उतरविलें.

या तऱ्हेच्या विमानांत एक फारच मोठें व्यंग होतें; तें हें कीं तें पाहिजे तिकडे वळवितां येत नसे. अमुकच दिशेनें मी हवेंतून संचार करीन असें वैमानिकांस खात्रीनें सांगतां येत नसे. वाऱ्याचा झोत जिकडे नेईल तिकडे हीं विमानें भटकत. आतां अमुक वेळीं वारा कोणत्या दिशेनें वहात आहे, आकाशाच्या वरच्या भागांतील वारे कसे वाहतात, वगैरे गोष्टींची माहिती असलेले वैमानिक पुष्कळ वेळां इष्ट दिशेनें विमानें नेत हें खरें, पण असें नेहमींच साधत नसे.

आजमितीस लढायांत किंवा एरव्हीं ज्या विमानांचा उपयोग करण्यांत येत आहे, त्यांची मात्र स्थिति अशी नाहीं. आतां समुद्रांत जशी

नौका वाटेल तशी वळवितां येते, तशींच हवेंतही विमानें वळवितां येतात. आपणास इष्ट असेल त्याप्रमाणें त्यांचा वेग कमी अगर जास्ती करितां येतो. अशा विमानांस खरोखर "आकाशनौका" हें नांव अधिक शोभेल. यांच्या मदतीनें आकाशांतील प्रवास जमिनीवरील अगर पाण्यामधील प्रवासाइतकाच सुखकर व बिनधोक होऊन प्रवासाचें हें एक नेहमींचें साधन होऊन बसेल अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

---

## धडा ५७

# विमान अथवा आकाशयान

### भाग २ रा

अशा प्रकारची आकाशनौका प्रथम **कौंट झेप्लीन** नामक जर्मन



लष्करी अधिकाऱ्यानें तयार केली. त्याचें विमान एकाद्या सिगारेटसारखें लांब व दोहों बाजूस निमूळतें असल्यानें त्यास हवेकडून विरोध कमी होई. पेट्रोलच्या वाफेनें चालणाऱ्या इंजनानें त्याला हवेंत गति मिळे; व एखाद्या नौकेला ज्याप्रमाणें दिशा बदलण्यासाठीं सुकाणूं असतें, तसेंच त्या विमानालाही असे. तोल सांभाळतां येण्यासाठीं त्याला एक वजन अडकविलेलें असे; असें कीं तें या बाजूकडून त्या बाजूकडे, व त्या बाजूकडून या बाजूकडे वाटेल तसें फिरवितां यावें.

ही सुधारणा फार महत्वाची होती खरी; पण जोंपर्यंत विमानें हवेपेक्षां हलकीं असल्यामुळेंच वर जात असत, तोंपर्यंत हवेवर खरा विजय मिळणें शक्य नव्हतें. या प्रकारच्या अंतरिक्षनौकांत एक मोठा

दोष हा असे कीं, तीं फार मोठीं करावीं लागत. कारण तसें केल्या शिवाय मोठें वजन नेतां येत नसे. बरें, अशीं मोठीं विमानें चालविण्यास यंत्रसामग्रीही तशीच दांडगी लागे. तसेंच, विमानांत वायु जितका अधिक भरलेला असे, तितकी त्याची यंत्रसामग्री आवरतां येणें जास्त कठिण होई. सोसाटयाच्या वाऱ्यापुढें असल्या हलक्या विमानांचें कांहीं चालत नसे, व तीं वाटेल तशीं झुकांड्या खात कोठें तरी आदळण्याचा संभव असे.

यामुळें हवेपेक्षां भारी आकाशनौका करितां येईल कीं नाहीं, इकडे वैमानिकांचें लक्ष लागलें; व आजमितीस बहुतेक विमानें याच तऱ्हेचीं— हवेपेक्षां जड असून वर उडणारीं असतात. तुम्ही पतंग उडतांना अनेक वेळां पाहिला असेल. पतंगही हवेपेक्षां जड असतो. मग तो वर कसा जातो ? आपण असें पाहतों कीं, पतंग उडविण्यापूर्वी आपण तो वर फेकतों, व मग त्याची दोरी धरून खूप जोरानें धांवत सुटतों. यायोगानें असें होतें कीं, **हवेचा दाब खालून पतंगाच्या तिरप्या अंगास लागून त्याला वर उचलतो.** हा जोर जितका जास्त असेल तितका पतंग अधिक वर जातो. ज्या दिवशीं वारा खूब जोरानें वाहात असेल, त्या दिवशीं आपणाला फारसें पळावें लागत नाहीं याचें कारण हेंच होय.

हल्लींचें आकाशयान म्हणजे एक भला मोठा पतंगच असतो असें म्हणण्यास हरकत नाहीं. ज्याच्यावर हवेचा दाब बसतो असा एकच पृष्ठभाग पतंगांत असतो. अलीकडील आकाशयानांत असे पृष्ठभाग अनेक असतात, एवढाच काय तो पतंगांत व त्यांत फरक. या राक्षसी पतंगांच्या पृष्ठभागांवर दाब घालून त्यांना गति देण्यास दोरीऐवजीं दांडग्या शक्तीचीं इंजनें लाविलेलीं असतात.

२१४ व्या पानावर या जातीच्या दोन प्रकारचीं आकाशयानें दाखविलीं आहेत. एकाला **मोनोप्लेन** म्हणजे एकपृष्ठ किंवा एकपत्री विमान म्हण-

तात; व दुसऱ्याला **बायप्लेन** म्हणजे द्विपृष्ठ अगर द्विपत्री विमान म्हणतात. पहिलें **ब्लेरिअट्** नांवाच्या एका कल्पक वैमानिकानें बनविलें, व दुसरें **पॉलहन्** नांवाच्या वैमानिकानें तयार केलें. दोघेही वैमानिक फ्रेंच आहेत ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.



मोनोप्लेन अथवा एकपत्री विमानाला हवेचा दाब घेणाऱ्या पृष्ठांचा एकच जोड अगर संच लावलेला असतो. आकाशांत उडत असलें म्हणजे तें एखाद्या अवाढव्य पक्ष्याप्रमाणें दिसतें. याचें मुख्य अंग लांबलचक असून वाफेचीं इंजनें त्यांतच ठेवलेलीं असतात; व वैमानिक



त्याच्या पुढील टोंकाशेजारीं बसतो. त्याच्या दोहों बाजूंस तीं मोठमोठीं पृष्ठें अगर पत्रें पसरलेलीं असतात; व त्यांच्या मधोमध त्यांना गति देणारा पंखा खूप जोरानें फिरत असतो. मुख्य अंगाच्या मागील टोंकाशीं एक लहान पृष्ठ असतें, तें जणूं कांहीं या प्रचंड पक्ष्याच्या शेपटाप्रमाणें भासतें; व तें खालवर केलें म्हणजे विमान खालीं किंवा वर जातें.

बायप्लेन अथवा द्विपत्री विमानाला एकावर एक असे पृष्ठांचे दोन जोड असतात. पण बाकी सर्व योजना मोनोप्लेनसारखीच असते. या

दोन्ही प्रकारच्या विमानांना खालीं चाकें लाविलेलीं असतात, त्यामुळें हीं जमिनीवरही चालूं शकतात. विमान उडविण्याची तयारी झाली म्हणजे त्याला या चाकांच्या मदतीनें एखाद्या मैदानांत नेतात. मग तीं पृष्ठें जरा तिरपीं करून ठेवतात; अशा हेतूनें कीं, विमान पुढें जात असतां हवेचा आघात या पृष्ठांवर व्हावा. मग इंजन चालू करतात; म्हणजे संचालक पंखे खूप वेगानें फिरूं लागून तें विमान जमिनीवरच पुढें धावूं लागतें. थोड्याच वेळांत पृष्ठांवरचा हवेचा दाब इतका वाढतो कीं त्यानें हें एवढें दांडगें धूड सहज वर उचललें जातें. मग वाटेल तिकडे प्रवास करावा. संचालक पंख्यानें पुढें जाण्याची गति देण्याचा क्रम जोंपर्यंत चालू आहे तोंपर्यंत विमान उडतें राहील. विमान खालीं आणावयाचें असेल तर इंजनाचा जोर कमी करून पंख्याचा वेग मंद केला म्हणजे झालें. आपोआप आपल्या वजनानेंच विमान खालीं उतरतें. सुकाणूं व पृष्ठें यांच्या खुबीदार योजनेनें वैमानिक विमानाला गिरक्या देत देत अशा बेतानें खालीं येऊं शकतो कीं, जराही धक्का न बसतां व विमानाच्या कोणत्याही बाजूस इजा न पोंचतां सर्व सुरक्षितपणें खालीं उतरतात. पण यांत हयगय होऊन विमान जर कां एकदम खालीं आलें, तर मात्र सर्व यंत्रांचे व आंतील वैमानिकांचे ठिकरी ठिकरी एवढे तुकडे होतात!

आकाशयानांच्या आजपर्यंतच्या इतिहासांत अशा तऱ्हेचे अपघात शेकडों झाले आहेत. पण धन्य पाश्चात्य लोकांच्या धैर्याची व चिकाटीची, नवीन नवीन वैमानिक आपल्या जिवाची पर्वा न करितां, नवीन नवीन युक्त्या काढून ही कला पूर्णतेस नेण्याचा सारखा यत्न करीत आहेत; व म्हणूनच त्यांस असें अभिनंदनीय यश प्राप्त झालें आहे. तथापि विमानविद्येची पूर्णता अद्याप भविष्यकालच्या प्रगतीवरच अवलंबून आहे.

---

## धडा ५८

# स्पष्टवक्ता रामशास्त्री

[ खालील उतारा रा. कृ. प्र. खाडिलकर यांच्या "भाऊबंदकी" नाटकांतील आहे. नारायणराव पेशव्याचा खून करून राघोबादादा पेशव्यांच्या गादीवर बसल्यावर, आपली सत्ता कायम राहण्यासाठीं पुण्यांतील लोकांना अनुकूल कसें करून घ्यावें, हा प्रश्न त्याचेपुढें उपस्थित झाला. पुण्यांतील प्रख्यात न्यायाधीश रामशास्त्री यास वश करून घेतलें म्हणजे सर्व कार्यभाग साधेल असा सल्ला त्याची महत्वाकांक्षी व दुष्ट स्त्री आनंदीबाई इनें त्याला दिला. म्हणून त्यानें रामशास्त्री यांस बोलावून आणलें. त्या वेळचा संवाद या उताऱ्यांत दिलेला आहे. ]

**स्थळ**—शनवारवाडा–पुणें.

[ रघुनाथराव व आनंदीबाई बोलत आहेत ]

**आ०**—हे पुण्यांतले लोकच मोठे विक्षिप्त; नसत्या गोष्टीची उठाठेव त्यांना नेहमीं करावयास पाहिजे. नारायण काय ह्यांचा मुलगा, भाऊ, चुलता, मामा, कोण ह्यांचा ? आम्हीं त्याला मारिलें तर त्याच्या शवाला कवटाळून रडत बसणारे हे कोण ?

**रघु०**—तें सगळें खरें; पण आतां जो तो आमच्याकडे खुनी म्हणून बोट दाखविणार ना ?

**आ०**—मी सांगितलें तसें करावें, म्हणजे या सर्वांचीं तोंडें बंद होतील. निजामाशीं लढण्यापूर्वीं पंढरपुरास बरेच दिवस तळ द्यावा. जाण्याबरोबर तेथील सर्व भटाभिक्षुकांना व शास्त्र्यांना मोठमोठ्या दक्षिणा देऊन आपलेंसें करून घ्यावें. श्रीक्षेत्रांतील सर्व लोक आपल्या बाजूचे झाल्यावर मग पुणेकरांचा समाचार घ्यावा. भराभर ब्राह्मणांच्या जमिनी काढून घेऊन वर्षासनें जप्त केलीं कीं आपोआप पंढरपुरीं येतील; व आमच्याविरुद्ध तोंड उघडण्याचें प्रायश्चित्त नाक घांसून घेतील. मग सर्वांचीं उत्पन्नें सोडून द्यावींत; मग आपला बोलबाला चोहोंकडे व्हावयास कितीसा उशीर ?

**रघु०**—तुझ्या विचाराप्रमाणेंच वागण्याचा मी निश्चय केला आहे. पण ह्या सर्व बेतांत मला एक मोठी अडचण दिसते—ही रामशास्त्र्यांची धोंड जेथें तेथें आमच्या आड येत आहे. त्याला कसा दूर करावा हा विचार मनांत आला म्हणजे माझीं सर्व गात्रें गळून जातात !

**आ०**—असें जर आपणांस वाटत असेल, तर रामशास्त्र्यांना बोलावून आणून त्यांचीं पाहिजे तशीं आर्जवें करून त्यांना पंढरपुरास आपल्याबरोबर घेऊन चला.

**रघु०**—पण मी प्रायश्चित्त घेण्याचें कबूल केलें तरच रामशास्त्री येतील पंढरपुरास.

**आ०**—कबूल करावें प्रायश्चित्त घेण्याचें—आपणास काय ? कार्यभाग साधला म्हणजे झालें. आतां रामशास्त्री आले म्हणजे मीदेखील हट्ट घेऊन बसतें, प्रायाश्चित्त घेतलंच पाहिजे म्हणून !

**रघु०**—हो, ही युक्ति बरी. करावें कबूल, सांगाल तें प्रायश्चित्त घेतों. रामशास्त्र्यांना मीं केव्हांचें बोलावणें पाठविलें आहे, अजून कां बरें आले नाहींत ?

( दासी येते. )

**दासी०**—सरकार, रामशास्त्री, सुमेरसिंग, खरकसिंग व कोतवाल आले आहेत. सरकारच्या आज्ञेची वाट पहात आहेत.

**रघु०**—रामशास्त्र्यांना आंत पाठवून दे. व शेजारच्या दिवाणखान्यांत वाट पहावयाला सरदारांना सांग.

[ दासी जाते व रामशास्त्री येतात. ]

**रघु०**—( उठून ) या, शास्त्रीबोवा, या; असें बसावयाचें होतें.

**राम०**—श्रीमंतांबरोबर अर्धासनावर बसण्याची आम्हां गरिबांची योग्यता नाहीं.

**रघु०**—शास्त्रीबोवा, आपणांस माहीत आहे, धनी व नोकर हें नातें आपणासारख्या गुरुवर्यांशीं ठेवण्याची पेशव्यांची रीत नाहीं.

**राम०**—रावसाहेबांबरोबरच* पूर्वींच्या चालीरीति सर्व लयास गेल्या. पुतण्याचा खून करण्याची पद्धत तुमच्या घराण्यांत पूर्वीं होती काय ?

**रघु०**—( बसत ) माझ्या माथीं हा अपराध नाहक आपण मारीत आहां !

**आ०**—शास्त्रीबोवा, गारद्यांच्या हातून गाय चुकून मारली गेली, तर तुम्ही ह्या असल्या बोलण्यांनीं वासरूं जाणूनबुजून मारीत आहां.

**राम०**—बाईसाहेब, मला दोष देण्यापेक्षां आपल्या कर्माला दोष कां देत नाहीं ? कैलासनाथाची इच्छाच तशी आहे; मी खोटें कसें बोलूं ?—नारायणरावांना मारण्याचा हुकूम मी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिल्यावर दादासाहेबांस मी खुनी समजूं नको तर करूं काय ?

**आ०**—अहो, हुकमांत 'धरावें' असें होतें! हें मी माझ्या डोळ्यांनीं पाहिलें आहे. गारद्यांनीं किंवा तुळाजीनें 'ध' चा 'मा' मागाहून केला नसेल कशावरून ?

**राम०**—हुकमांत जर 'धरावें' असें असतें, तर ज्यांनीं हुकूम लिहिला ते हजर असतांना,—दादासाहेब हजर असतांना,—आपण हजर असतांना,—नारायणराव मारले गेलेच नसते !

**आ०**—पण ह्या गोष्टीची वाटाघाट करून आतां काय उपयोग ? खऱ्या गोष्टी काय झाल्या हें एका परमेश्वराला माहीत. तथापि नारायण मारला गेला ह्याबद्दल मला अंतःकरणपूर्वक वाईट वाटत आहे. व आपण सांगाल तें प्रायश्चित्त घेण्याचें आम्हीं ठरविलें आहे. तर आतां पूर्वींच्या गोष्टी विसरा, व ह्या अपराध्यांना प्रायश्चित्ताची शिक्षा सांगा.

---

* श्रीमंत थोरले माधवराव साहेब पेशवे.

**राम**०—दादासाहेब, मी पंढरपुरास कसचा येतों, आणि तुम्हांस प्रायश्चित्त देऊन कसचा शुद्ध करून घेतों !

**आ**०—आपण न्यायाधीश आहां. प्रायश्चित्त द्यावयाचें आपलें काम आहे. आपण पंढरपुरीं आलें पाहिजे, व आम्हांला प्रायश्चित्त देऊन पवित्र करून घेतलें पाहिजे.

**राम**०—माझ्या डोळ्यांनीं मी तो हुकूम पाहण्यापूर्वीं प्रायश्चित्तानें मी आपणांस शुद्ध करून घेतलें असतें; पण आतां काय ?

**आ**०—आतां कोणची हरकत ?

**राम**०—त्या वेळीं खुनाचा नुसता संशय होता. आतां आपण प्रत्यक्ष खुनी ठरलां.—दादासाहेब, पुतण्याचा खून करून गादी बळकावण्याचा भयंकर अपराध आपण केला आहे, त्या अपराधाला शास्त्रांत देहांत प्रायश्चित्ताखेरीज दुसरें प्रायश्चित्त नाहीं !

**रघु**०—काय ? देहांत प्रायश्चित्त !

**राम**०—होय, देहांत प्रायश्चित्त !

**रघु**०—( उठून ) देहांत प्रायश्चित्त !

**राम**०—होय. देहांत प्रायश्चित्त !

**आ**०—( पुढें होऊन ) देहांत प्रायश्चित्त !—नाहीं. आपण चुकून बोललां असाल.—शास्त्रीबोवा, नीट विचार करून सांगा, प्रायश्चित्त कोणतें तें !

**राम**०—बाईसाहेब, नीट विचार करून सांगतों, देहांत प्रायश्चित्ताशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं !

**रघु**०—( बसत दुःखानें ) देहांत प्रायश्चित्ताशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं !

**आ**०—शास्त्रीबोवा, दुसरें प्रायश्चित्त असलें पाहिजे.

**राम०**—नाहीं, बाईसाहेब, नाहीं. दुसरें प्रायश्चित्त नाहीं.—आपणांसारख्या महापातकी खुन्यांची सोय लावण्याकरितां ऋषींनीं शास्त्रें लिहिलीं नाहींत!

**आ०**—( रागानें ) काय ? शास्त्रीबोवा, दुसरें प्रायश्चित्त नाहीं ?—आमची सोय पाहण्याची ऋषींना जरूरी नसली तरी तुम्हांला जरूरी आहे—नीट विचार करून उत्तर द्या.

**राम०**—दुसरें प्रायश्चित्त नाहीं; देहांत प्रायश्चित्ताशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं! मी पुनः सांगतों, देहांत प्रायश्चित्ताशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं!!

**आ०**—( चवताळून ) कोणापुढें, कोठें, व काय बोलत आहां, याची शुद्धि, शास्त्रीबोवा, तुम्हाला नसावीसें दिसतें!—श्रीमंतांना देहांत प्रायश्चित्त सांगणाराची जीभ येथच्या येथें छाटली जाईल, हें ध्यानांत ठेवून, नीट शुद्धीवर येऊन बोला. तुम्ही आमचे नोकर आहां हें विसरलां वाटतें ?

**राम०**—बाईसाहेब, आतां वाड्यांत येण्यापूर्वी मी श्रीमंतांचा नोकर होतों; पण वाड्यांत आलों आहें, तो नोकरी सोडून दिली हें कळविण्याकरितांच आलों आहें.—बाईसाहेब, या जिभेनें या वेळीं सत्य भाषण केलें आहे; पुढें कदाचित् खोटें भाषण करण्याचा मोह तिला उत्पन्न होईल; तेव्हां याच वेळीं तिला छाटून टाकून सत्य बोलण्यांत या जिभेची समाप्ति आपण केली, तर त्यांत मला समाधानच आहे.—राघोबा, पेशव्यांच्या गादीचा नोकर नसलेला हा रामशास्त्री तुला देहांत प्रायश्चित्त सांगत आहे. राजाज्ञेनें तुझें डोकें उडवलें जाण्याचा जर संभव नसेल, तर देहाला झिजवून झिजवून अखेरीस देहाच्या पतनानें पापक्षालन कसें करावें, ह्या तपश्चर्येचा धडा शिकण्याचे उद्योगास त्वां लवकर लागावें हें बरें. मजबरोबर गंगाकिनारीं येत असशील, तर हा

धडा शिकविण्यास मी तयार आहें.—खुनी पेशवा गादीवर असे तों-पर्यंत पुण्याचे हद्दींत पाणी प्यावयाचें नाहीं, ह्या प्रतिज्ञेनें मी घराचे बाहेर आतां पडलों आहें! स्वतः देहांत प्रायश्चित्त कसें घ्यावें हें शिकण्याची जर राघोबा तुझी इच्छा असेल, तर गंगाकिनारीं—

**आ०**—गंगाकिनारीं तपश्चर्या करण्याच्या गोष्टी, शास्त्रीबोवा, आतां विसरा. पेशव्यांचा असा उपमर्द करणारांना गंगाकिनारीं स्वस्थ बसण्याची फुरसत मिळत नसते.—तुम्ही आम्हांला कोण प्रायश्चित्त सांग-णार?—विद्वत्तेची खोटी घमंड तुम्हाला झालेली, निस्पृहतेचा नसता टेंभा तुम्ही मिरविणारे, तपश्चर्येच्या व देवधर्माच्या वल्गना तुमच्या तोंडांत कशाला? तपश्चर्या आतां अंधारकोठडींत!—कोण आहे रे पलीकडे दालनांत? सुमेरसिंग, खरकसिंग, तुळाजी, या, लवकर या, व या उन्मत्त माथेफिरूला कैद करा—( सुमेरसिंग वगैरे येतात )—शास्त्रीबोवा, पुनः एकवार नीट विचार करा. तुमच्या सांगण्यावरून किरकोळही प्रायश्चित्त आतां आम्ही घेत नाहीं. तुम्हांला जर एखाद्या डोंगरी किल्ल्या-वरील अंधारकोठडी टाळायची असेल, तर नारायणरावाच्या वधासंबंधानें श्रीमंतांची लवलेशही चूक नाहीं, इतकेंच नव्हे, तर असले धर्मभीरु, प्रतापी, व पुण्यश्लोक श्रीमंत पेशव्यांच्या गादीस पुनः लाभणार नाहींत, असें भरदरबारांत जाहीर करण्यास तुम्हीं तयार झालें पाहिजे. ( सुमेर-सिंग वगैरे सरदार रामशास्त्र्यास घेरतात. )

**राम०**—बाईसाहेब, पाहिजे तर माझी जीभ छाटून टाकण्याचा हुकूम करा; पाहिजे तर अंधारकोठडींत कांट्यांच्या पिंजऱ्यांत मला कोंडून ठेवा; पाहिजे तर ज्या ह्या तरवारींनीं नारायणरावांचे तुकडे तुकडे केले, त्याच ह्या तरवारी माझ्याही शरीरावर पाहिजे तशा चालवा. मला कोठेंही न्या, कसाही ठेवा; शब्द उच्चारण्याची शक्ति जिवांत असे तों मोठमोठ्यानें ओरडून सर्व दुनियेला मी जाहीर करणार—“ नारायण-

रावाचा खून राघोबानें केला आहे, व ह्या पापाला देहांत प्रायश्चित्ता-शिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं !"

**आ०**---अरे, ह्या उन्मत्त माथेफिरूच्या अगोदर मुसक्या बांधा---पकडा त्याला,---( रामशास्त्र्यास ) अंधारकोठडींत देहांत प्रायश्चित्त आपणास लवकरच मिळेल बरें !---पकडा त्याला, पाहतां काय ? ( सुमेरसिंग वगैरे पकडूं लागतात. )

**रघु०**---नका, शास्त्रीबुवांना कैद करूं नका ! माझ्या डोक्यावर पूर्वींच्या पातकांचेंच ओझें मोठें आहे--नको, त्यांत रामशास्त्र्याच्या खुनाची आणखी भर नको !---जा शास्त्रीबोवा, जा, आमच्या राज्यांतून एकदम बाहेर निघून जा. आमची निंदा करावयाला जर क्षणभर अधिक आमच्या राज्यांत राहिलां, तर खरोखरच तुमची जीभ छाटली जाईल !---सुमेरसिंग, खरकसिंग, तुळाजी, पुण्याच्या हद्दीबाहेर बंदो-बस्तानें यांना काढून लावा. ( पडदा पडतो ).

---

## धडा ५९
# केकावली

तुझ्या बहुत शोधिले अघनिधी पदांच्या रजें;
    न तें अनृत, वर्णिती बुधजनीं सदाचार जें; ।
असे सतत ऐकते, सतत बोलते, मीच ते
    प्रमाण न म्हणों जरी, उचित माझिया नीचते. ॥ १ ॥
तसाचि उरलों कसा ? पतित मी नसें काय ? कीं
    कृपाचि सरली ? असेंहि न घडे जगन्नायकीं; ।
नसेन दिसलों कसा ? नयन सर्वसाक्षी रवी;
    विषाद धरिला म्हणों ? न सुरभी विषक्षीर वी. ॥ २ ॥
व्रजावन करावया बसविलें नखाग्रीं धरा;
    सलील तइं मंदराख्यहि नग स्वपृष्ठीं धरां; ।

वराहतनु घेउनी उचलिली रदाग्रें धरा;
सुदुर्धर तुम्हां कसा पतित हा ? न कां उद्धरां ? ॥ ३ ॥

" अगा प्रणतवत्सला ! " म्हणति त्या जनां पावलां,
म्हणोन तुमच्याच मी स्मरतसें सदा पावलां. ।
'करूं बरि कृपा, हरूं व्यसन, दीन हा तापला.'
असें मनिं धरा, खरा भरवसा मला आपला. ॥ ४ ॥

मला निरखितां भवच्चरणकन्यका आपगा
म्हण " अगई ! ऐकिलेंहि न कधीं असें पाप " गा ! ।
कर श्रवणिं ठेविते, नुघडि नेत्र, घे भीतिला;
न घालिन भिडेस, मी जरिहि कार्यलोभी, तिला. ॥ ५ ॥

सदैव नमितां जरी पद, ललाट केलें किणें,
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें; ।
नतां करुनि मुक्तही म्हणसि 'मी बुडालों ऋणें,'
अशा तुज न जो भजे मनुज धिक् तयाचें जिणें ॥ ६ ॥

धना, परिजना, घरीं तुमचिया उणें कायसें ?
न लाभ मणिहेमभूपतिस जोडिल्या आयसें;
परि प्रभुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती;
गुणा न म्हणतां उणा अधिक, आदरें सेविती ॥ ७ ॥

प्रभो शरण आलियावरि न व्हां कधीं वांकडे,
म्हणोनि इतुकेंचि हें स्वहितकृत्य जीवांकडे; ।
प्रसाद करितां नसे पळ विलंब बापा ! खरें;
घनांबु न पडे मुखीं उघडिल्याविना पांखरें. ॥ ८ ॥

म्हणा मज उतावळा; गुणचि घेतला; घाबरें
असो मन असेंचि बा ! भजकबर्हिमेघा ! बरें; ।

दिसे क्षणिक सर्व हें, भरवसा घडीचा कसें
धरील मन ? आधिनें बहु परिभ्रमे चाकसें. ॥ ९ ॥
कृतांतकटकामलध्वज जरा दिसों लागली;
पुरःसर गदांसवें झगडतां तनू भागली; ।
सहाय दुसरा नसे तुजविणें बळें आगळा;
न हों जरि उताविळा स्वरिपु कापितो हा गळा. ॥ १० ॥
सुसंगति सदा घडो; सुजनवाक्य कानीं पडो;
कलंक मतिचा झडो; विषय सर्वथा नावडो; ।
सदंघ्रिकमळीं दडो; मुरडितां हठानें अडो;
वियोग घडतां रडो; मन भवच्चरित्रीं जडो. ॥ ११ ॥
न निश्चय कधीं ढळो; कुजन विघ्नबाधा टळो;
न चित्त भजनीं चळो; मति सदुक्तमार्गीं वळो; ।
स्वतत्व हृदया कळो; दुरभिमान सारा गळो;
पुन्हा न मन हें मळो; दुरित आत्मबोधें जळो. ॥ १२ ॥
दयामृतघना ! अहो हरि ! वळा मयूराकडे;
रडे शिशु तयास घे कळवळोनि माता कडे; ।
असा अतिथि धार्मिकस्तुतपदा ! कदा सांपडे ?
तुम्हां जड भवार्णवीं उतरितां न दासां पडे. ॥ १३ ॥

**मोरोपंत**

---

## धडा ६०

## म्हातारपणाचे फायदे

( विनोदी लेख )

ह्या विलक्षण जगांत प्रथमदर्शनीं त्याज्य वाटणाऱ्या प्रत्येक वस्तूंत विचारांतीं कांहीं ना कांहींतरी ग्राह्यांश सांपडतोच. कडूझर औषधापासून

मोठमोठे रोग नाहींसे होतात; अति घाणेरड्या पदार्थापासून खत तयार होतें; व लाखों रुपयांच्या मालमत्तेची व हजारों माणसांची आहुति घेणाऱ्या आगीपासून हवा शुद्ध होते.

अशा दृष्टीनें विचार केला असतां म्हातारपणांतही कित्येक फायदे असल्याचें लक्षांत येईल.

म्हातारपणाचा पहिला मोठा फायदा म्हटला म्हणजे त्यामुळें दांत कधींही घांसावे लागत नाहींत; आणि राखुंडीचा व दंतमंजनाचा खर्च वांचतो. राखुंडीच्या पायीं तरुणांकडून हजारों गोंवऱ्या अग्नये स्वाहा करण्यांत येतात, व दंतमंजनाच्या हजारों बाटल्या फस्त होतात; पण म्हातारा कनवाळूपणामुळें गोंवऱ्यांच्या मुळींच वाटेस जात नाहीं. हें ऋण गोंवऱ्याही शेवटीं फेडतातच. दुसरा फायदा असा कीं, म्हातारपणीं दाढा मुळींच दुखत नाहींत, व दांतांतूनही रक्त येत नाहीं; व यामुळें औषधाप्रीत्यर्थ होणारा खर्च वांचतो. एखादे वेळीं ठेंच लागून पडल्यास म्हाताऱ्यास दांत पडण्याची भीति मुळींच नसते. शिवाय म्हाताऱ्यावर 'दांत कोरून पोट भरण्याचा' कोणी आरोप ठेवीत नाहीं; किंवा त्याच्यापाशीं "दांतावर मारण्यास एक पैसाही नाहीं" असा दारिद्र्याचाही आळ त्याजवर येत नाहीं. त्यानें कोणाची कितीही आगळिक केली, तरी त्याला कोणाकडून "बत्तिशी रंगविण्याची" धमकी मिळत नाहीं. त्यानें कोणाचा कितीही उपहास केला, तरी त्याला "दांत काय विचकतोस ?" असें म्हणण्याची त्याची छाती होत नाहीं. तसेंच त्यानें सांगितलेली गप्प केवळ "दंतकथा" असें कोणास त्याच्या तोंडावर सांगतां येत नाहीं; व त्याचे गाल बसलेले असल्यामुळें ती "कपोलकल्पित" आहे असेंही म्हणवत नाहीं.

म्हातारपणाचा आणखी एक फायदा असा आहे कीं, ठेंगण्या दारांतून जातांना म्हाताऱ्याच्या कपाळास कधींही टेंगूळ येत नाहीं. व जमि-

नीवरचा पदार्थ उचलतांना मुद्दाम वांकावें लागत नाहीं. तसेंच कधीं राग आल्यास मुद्दाम कपाळाला आंठ्या आणावयास नकोत; व कोणाची वाहवा करतांना मुद्दाम मान हालविण्याची तसदी घ्यावयास नको. डोक्यास टक्कल पडल्यामुळें हजामतीचा खर्च वांचतो, तो निराळाच !

म्हाताऱ्याचे सांधे धरल्यामुळें त्याला घरांतून बाहेर पडतां येत नाहीं, यामुळें रस्त्यानें जाणाऱ्या गाड्यांखालीं चेंगरून जाण्याची भीति नसते. त्याला धड झोंप येत नाहीं, यामुळें तो चोरीबद्दल निर्धास्त असतो. अंगांत रक्त नसल्यामुळें ढेंकूण त्याच्या वाटेस जात नाहींत; व बाहेर निघालेल्या नाकाच्या व हनुवटीच्या बुजगावण्याला भिऊन चिलटेंही त्याच्या तोंडाभोंवतीं घिरट्या घालीत नाहींत.

एका एकडोळ्या मनुष्यानें एका दोन डोळ्यांच्या माणसास म्हटलें कीं "तुला फक्त माझा एकच डोळा दिसतो; पण मला तुझे दोन डोळे दिसतात; अर्थात् तुझ्यापेक्षां मीच अधिक डोळस आहें." याच न्यायानें म्हाताऱ्यासही तरुणास अनेक प्रकारें हिणवितां येईल, कीं, "बाबारे ! तुला तुझ्यासमोर फक्त हाडांचा सांपळा व तोंडाचें बोळकें दिसत आहे; पण मला बांधेसूद व मांसल शरीर आणि सुंदर व तेजस्वी चेहरा पाहण्यास मिळत आहे. तेव्हां तुझ्यापेक्षां मीच दैववान् नाहीं काय ?"

डोळ्यांस अंधत्व व कानांस बधिरत्व आल्यामुळें, व त्यांत विस्मृतीची भर पडल्यामुळें म्हाताऱ्याला किती तरी फायदे होतात. म्हातारा निर्धन असल्यास त्याला त्याचा धनको, व तो सधन असल्यास त्याचा गरीब नातलग वाटेंत भेटल्यास त्याला त्यानें ओळखिलें, किंवा त्याची मागणी त्याला ऐकूं आली, असें क्वचितच घडतें. ऋणको, किंवा श्रीमंत नातेवाईकासंबंधानें मात्र हा नियम खात्रीनें लागू पडेल, असें नाहीं !

म्हातारपणच्या विस्मृतीमुळें पुष्कळदां आधले दिवशीं वाचलेली गोष्ट म्हाताऱ्याच्या दुसरे दिवशीं लक्षांत रहात नाहीं. यामुळें तच तें पुस्तक

त्याला दरखेपेस तितकेंच मनोरंजक वाटूं लागतें, व नवीं पुस्तकें घेण्याचा उपद्व्याप व खर्च वांचतो. पुष्कळ वेळां म्हातारे आपलें प्रतिवर्षी तेंच तेंच वय सांगतांना दृष्टीस पडतात, याचें कारणही मधील लोटलेल्या काळाची त्यांना विस्मृति पडते हेंच असावें. अशा वृद्धाचें प्रत्यक्ष कालास जसें विस्मरण पडतें, तसें कालाचें त्यांना पडल्यास नवल कोणतें?

म्हाताऱ्याच्या अंगीं ताठा असलेला किंवा काठीचा उपयोग त्यानें दुसऱ्याला मारण्याच्या कामीं केलेला अजून माझ्या ऐकिवांत नाहीं. आपलें उरलेलें आयुष्य देशसेवेंत घालविण्याचा निर्धार करणें त्याला मुळींच जड वाटत नाहीं. एका ऐशीं वर्षांच्या म्हाताऱ्यानें असा संकल्प करून तो मरेपर्यंत (म्हणजे सबंध दोन महिने!) पार पाडल्याचें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे!

**श्री. कृ. कोल्हटकर** यांच्या ‘सुदाम्याचे पोहे’ या पुस्तकावरून थोडा फेरफार करून.

---

## धडा ६१

## शकुन

शकुन म्हणजे पुढें घडणाऱ्या शुभाशुभ गोष्टींचें सूचक. यावरून शकुन अर्थात् दोन प्रकारचे झाले. एक शुभ व दुसरा अशुभ. या दोहोंविषयीं निश्चित प्रमाण म्हणून कांहींच नसल्यामुळें अर्थात्‌च असें होत असेल कीं, जें एका देशांत शुभ, त्यासच दुसऱ्या देशांत अशुभ मानीत असतील, व अशुभास शुभ.* शकुन पुष्कळ गोष्टींवरून मानतात; पक्ष्यांच्या शब्दांवरून व गतीवरून; पोरांच्या साहजिक बोलण्यावरून, नेत्रादि स्फुरण पावल्यावरून, वगैरे; तसेंच मांजर, चासपक्षी,

---

* उदाहरणार्थ आपल्या इकडे ज्या घुबडास फार अशुभ समजतात, त्यास ग्रीक लोक पूज्य व शुभ मानीत असत.

कावळा, घुबड इत्यादि प्राणीही शुभाशुभसूचक मानले आहेत. ग्रहांचे योग तर चोहोंकडे शुभावह व अशुभावह मानलेले असून, आमच्या देशांत तर सैंपाकघरांत चुली घालण्यापासून तों मोठ्या मोहिमेस बाहेर पडेपर्यंत ग्रहांचें आनुकूल्य अगोदर करून घ्यावें लागतें.

असो; आपल्या लोकांत शकुनाचे निरनिराळे जे प्रकार आहेत ते पाहूं. पहिला सर्वांत मोठा अपशकुन मांजराचा होय. कोणीं कांहीं कार्यानिमित्त बाहेर पडला, आणि वाटेनें मांजर आडवें गेलें, कीं गेली मसलत ! बिचाऱ्या मांजराच्या ध्यानीं मनींही नसतें कीं, आपल्या साहजिक जाण्यानें या गृहस्थास आपण अपशकुन करीत आहों. त्याचप्रमाणें विधवेचें दर्शन, प्रेत सामोरें येणें वगैरेही अशुभसूचक होत.

आतां कांहीं शुभ शकुन सांगतों. सकाळचे प्रहरीं कोल्ह्याचें तोंड दृष्टीस पडणें, डावा डोळा लवणें, उजवा बाहू स्फुरण पावणें इत्यादि. तसेंच घराच्या बाहेर पडतांच सवाष्ण बायका कडेवर पाण्यानें भरलेल्या घागरी घेऊन सामोऱ्या येणें. हा शेवटला शकुन फार उत्कृष्ट समजतात; व कांहीं श्रीमंत लोकांची चाल अशीही सांगतात कीं, ते कांहीं एखाद्या मोठ्या कार्यास बाहेर पडले असतां, दहापांच बायका वर सांगितल्याप्रमाणें तयारी करून, स्वारी घराबाहेर पडते आहे तोंच त्यांस सामोऱ्या याव्या, अशी आधींच तजवीज करून ठेवावयाची ! हें वाचून सर्व सुविचारी मनुष्यांस हसूं आल्याखेरीज राहणार नाहीं. एक तर शकुन अपशकुन म्हणजे सारी निवळ भ्रांति. त्यांतून त्यांस यदृच्छेनें घडूं न देतां अपशकुनांस पिटाळून लावून शुभ शकुनांस मुद्दाम कैद करून आणून पुढें उभें करणें, व तसल्या मारून मुटकून आणलेल्या शकुनांचें शुभत्व मानणें, म्हणजे मूर्खत्वाची अगदीं सीमा झाली !

कोणतीही गोष्ट खरी मानण्यास अनुभवसिद्ध प्रमाण पाहिजे. तें या शकुनांस बिलकुल मिळत नाहीं. वर सांगितलेलें मांजराचेंच उदाहरण

ध्या. कांहीं कामास गेलें असतां मांजर आडवें गेलें, आणि तें काम हटकून झालें नाहीं असें कोणाच्या तरी अनुभवास आजपर्यंत आलें असेल काय? कार्याचें स्वरूप, कर्त्याचें शहाणपण व हिंमत, साधनांचा योग्यायोग्यपणा इत्यादिकांवर हातीं घेतलेल्या कामांत यश अगर अपयश येणें हें सदासर्वदा अवलंबून असतें. त्यांत बिचाऱ्या मांजराच्या जाण्याचा कांहींच संबंध नसतो. दुसरे जसे लक्षावधि व्यापार त्या वेळीं सृष्टींत चाललेले असतात, त्याचप्रमाणें मांजरानें रस्ता ओलांडून जाणें हा एक होय. मग होणाऱ्या कार्याची असिद्धि ही त्या बिचाऱ्या एकट्यावरच कां लोटावी? समजा कीं पुणें मुक्कामीं कोणी गोमाजी तिमाजीस भेटावयास गेले, आणि तिमाजी भेटले नाहींत; तर तें अपेश सोम्या नांवाच्या मांजरावरच कां? गोमाजींनीं त्या वेळेस पांढरें पागोटें घातलें होतें, किंवा आदल्या रात्रीं ते जेवले नव्हते, हेंच भेट न होण्याचें कारण कशावरून नसेल? अथवा हेंचसें काय, त्याच क्षणीं लंडन शहरांत अमुक ठिकाणीं अमुक मनुष्यास अमुक झालें तें आमच्या शकुनभोळ्या गृहस्थास कशावरून बाधक झालें नसेल? असो, तर असे विचित्र संबंध जोडीत बसणें हा निवळ वेडेपणा आहे.

पण यावर कोणी अशी शंका घेतील कीं, आजपर्यंत हा विश्वास साऱ्या देशांतील लोकांचा पूर्ण होता, व अजूनही लक्षावधि लोकांचा आहे, तर हे सर्व लोक कांहींच प्रमाण पाहिल्याशिवाय विश्वास धरीत असतील काय? परंतु अशा कामीं बहुमत कांहीं उपयोगी नाहीं. एकंदर जगाचा कल लक्षांत आणून कोणीं तत्वज्ञानें म्हटलें आहे; "एकानें केलें म्हणून दुसऱ्यानें करावें, हाच प्रकार या जनाचा आहे. परमार्थ म्हणजे खरें तत्व जाणणारा थोडा!" तसेंच **कालिदासाचें** वचन आहे:—

"जे ज्ञाते आहेत ते दोन्ही पक्ष पाहून चांगलें आहे तें पसंत करितात; पण मूर्खांचा प्रकार वेगळा. त्यांचा अभिप्राय नेहमीं दुसऱ्यांवर टेंकलेला असतो."

असो; तर याप्रमाणें जगाची राहटी आहे. जें एकदा मत पडून गेलें, त्यासच सारे अनुसरतात; मग तें खरें असो, कीं खोटें असो! त्याच्या स्वरूपाविषयीं बारीक विचार करण्याचें कोणाच्या मनांतही येत नाहीं, व तसें करण्याची योग्यताही थोड्याच लोकांची असते. बरें; पण शकुनादिकांवर ज्याचा पूर्ण भरंवसा आहे त्याला जर कोणीं विचारलें कीं, तूं याचा दाखला कोणचा पाहिला आहेस? तर तो उगीच बसावयाचा नाहीं. तसा ठोका आल्याचीं पांचसात उदाहरणें सांगेल. पण हीच अशा लोकांची मोठी चूक असते. **जेवढीं आपल्या तर्फेचीं—म्हणजे शकुन पटल्याचीं—उदाहरणें असतात-तेवढींच ते घेतात; त्याच्या उलटचीं मात्र बिलकुल घेत नाहींत.** याविषयीं **बेकननें** एक मजेदार गोष्ट दिली आहे. प्राचीनकाळीं ग्रीस देशांत आपल्याप्रमाणेंच मूर्तिपूजेचा प्रचार असे. एकदा असें झालें कीं नवसांच्या प्रतीती बद्दल वाद चालला असतां, तो वाद करणारानें आपल्या प्रतिपक्ष्यास त्याची खात्री करण्याकरितां नेपच्यूनच्या देवळांत नेलें. (नेपच्यून हा हिंदुलोकांच्या वरुणाप्रमाणें समुद्राचें दैवत होतें.) तेथें त्यानें त्या नास्तिकास देवास नवस करून वाहिलेला पुष्कळ सरंजाम दाखविला; व शेवटीं तो म्हणाला, “पहा किती लोकांस हा देव पावला तो!” त्याच्या प्रतिपक्ष्यानें उत्तर केलें “म्हणतोस तें खरें; पण असें न होऊन ज्यांचीं जहाजें बुडालीं असतील, त्यांची खूण येथें कोठें आहे? त्या खुणा जर असल्या, तर मीही तुला दाखविल्या असत्या!” असो; तर शकुनांच्या खरेपणाविषयींचीं हजारों प्रमाणें लोक जीं सांगतात, तीं सर्व अशा प्रकारचीं असतात. कोणी बहाद्दर कांहीं कामाला निघाले, आणि तोंडांत मारल्यासारखे माघारीं आले, कीं तें सारें अपेश सामोरें आलेल्या मांजरावर! आणि असें एकदां दोनदां झालें, कीं झाला तो ठोका! पण ज्या कामाला हात घातला तेंच जर होण्यासारखें नसलें, किंवा या राजश्रींच्या अंगचें

कर्तृत्वच तितपत असलें, तर त्या बिचाऱ्या मांजराकडे काय बोल ? पण त कांहीं नाहीं ! अपेशास मूळ कारण तें मांजरच ! एरव्हीं यांच्या हातून फत्ते झाल्याखेरीज राहावयाचीच नाहीं !

पण वरील प्रकार नुसता मूर्खपणाचाच झाला ! याहूनही उद्वेग-कारक जे शकुनांचे आणखी परिणाम घडून येतात, ते सांगावयाचे आहेत. जोंपर्यंत शकुन हे पशुपक्ष्यादिकांवरच असतात तोंवर मोठीशी वाईट गोष्ट झाली असें म्हणतां येत नाहीं; म्हणजे त्यायोगानें त्यांस मनुष्यां-पासून उपद्रव पोंचतो, किंवा त्यांची मानहानि होते असा कांहींच प्रकार घडत नाहीं. पण प्रत्यक्ष मनुष्यांकडेच जेव्हां हें शुभाशुभत्व येतें, तेव्हां बरीक मूर्खत्वाचा व उद्धटपणाचा कळस होतो !

असल्या प्रकारचा पहिला मोठा अपशकुन म्हणजे विधवा स्त्रियांचा. स्त्रियांचें जिणेंच मुळीं पराधीन; त्यांतूनही वैधव्याच्या योगानें त्यांचा सगळाच आधार जेव्हां एकदम तुटतो, तेव्हां तर त्यांच्या विपत्तीची सीमाच होते. त्यांतही आमच्या देशांत जी त्यांची स्थिति दृष्टीस पडते, तीहून दुःखास्पद अशी स्थिति थोडीच ! इतरांस दुःखाची स्थिति प्राप्त झाली असतां ते लागलेच सर्वांच्या दयेस व प्रीतीस पात्र होतात. पण तेंच सगळें वरील अनाथ प्राण्यांच्या ठायीं विपरीत होतें. ज्या बिचाऱ्या स्त्रियांनीं सुष्ट दुष्ट कसाही नवरा असला तरीही आपल्या पातिव्रत्यधर्मास जागून आमरण त्याच्याकरितां केवळ तपस्व्याच्या वृत्तीनें राहावें, त्याच महादुःखाबद्दल त्यांचा कळवळा कोणास येत नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यांच्याच प्रारब्ध-दशेचें तें फळ, असें म्हणून त्यांचा उलटा छळच होण्यास आरंभ होतो ! हा प्रकार आमच्या देशास लांच्छनरूप होय यांत संशय नाहीं. विधवां-चा अपशकुन मानणें म्हणजे या विपद्ग्रस्त मानवी प्राण्यांचा उपमर्द करणेंच होय. केवळ दैवयोगानें प्राप्त झालेल्या स्थितीवरून मनुष्यांस मंगळ किंवा अमंगळ मानावें हा केवढा अन्याय आहे ! स्त्रियांचें वैधव्य

हे जर त्यांच्या अशुभत्वास कारण, तर बाप, भाऊ, बहीण, वगैरे कोणी मेल्यानें त्यांच्या नातेवाइकांचें तरी तोंड कां पहावें ? पण मुळींच हा केवढा मूर्खत्वाचा प्रकार आहे ? जी अत्यंत सदाचरणानें आपलें आयुष्य क्रमून आपल्या कुलास तर काय, पण सगळ्या मनुष्यजातीस भूषण आणीत आहे, त्याच साध्वीचें दर्शन, पुरतें तेरा दिवसही जाऊं न देतां जो निर्लज्ज पुनः नवरा मुलगा होऊन उभाच, अशा पुरुषानें अशुभ मानावें, हा केवढा उलटा न्याय ? आणि अशा निष्पाप स्त्रीचें दर्शन जर शुभ नव्हे, तर सगळ्या कपाळभर जिनें कुंकवाचा पट्टा ओढला आहे, आणि स्त्रियांचें सहजभूषण जी लज्जा, ती समूळ टाकून देऊन जिनें उभयकुलांस आणि अवघ्या मनुष्यजातीस काळोखी आणली, अशा एखाद्या बाजारवसवीचें दर्शन, केवळ तिच्या बाह्य-वेषावरून शुभ झालें काय ? असो; तर सुविचारानें दिसणारा मार्ग व जगाचा धोपट मार्ग, यांत अनेक वेळां इतकें अंतर असतें.

याचप्रमाणें मुळावर आल्याचेंही एक मोठें बंड आहे. एखादें मूल जन्मतांच आई किंवा बाप यांतून कोणी मेलें, कीं आलें तें अपेश बिचाऱ्या पोराच्या माथीं ! मग एखाद्या वैऱ्याशीं जसें वागावें, त्याप्रमाणें त्या पोराचे सारखे हाल चालावयाचे ! याहूनही भयंकर प्रकार सुनेचा. ती घरांत आली, व सासू, सासरा, नवरा वगैरे सारीं जर बरींच वर्षें पुढें निभावलीं, तर ठीक गोष्ट. मध्येंच जर कांहीं विपरीत झालें, तर त्या बिचाऱ्या पोरीचें नशीब उसकटलें ! कारण हें सारें सूनबाईच्या पायगुणाचें फल ! हा केवढा घोर अन्याय आहे, हें एखाद्या शुद्ध टोणप्या खेरीज हवें त्यास सहज समजणारें आहे !

एकंदरीनें शकुनादिकांचा ठोका जो मिळतो तो काकतालीय न्याया-नेंच मिळतो. त्यांवर भरंवसा ठेवून भिणें हें शाहण्याचें काम नव्हे. तुकोबा सांगतातः—

अवघा तो शकुन । हृदयीं देवाचे चरण ॥
येथें नसतां वियोग । लाभा उणें काय मग ॥
संग हरीच्या नामाचा । शुचिर्भूत सदा वाचा ॥
तुका म्हणे हरीच्या दासा । शुभ काल दाही दिशा ॥ ३ ॥

**विष्णुशास्त्री चिपळूणकर** यांच्या निबंधमालेंतील
'लोकभ्रम' या निबंधावरून

---

## धडा ६२

# मंत्ररामायणाचा उपसंहार

श्रीमंत्ररामायण-रत्नमाला, समर्पिली श्रीरघुसत्तमाला;
प्रसाद कंठीं प्रभुसेवकांहीं घ्यावा, नसे भूषण अन्य कांहीं. १
वाल्मीकि-विप्रोत्तम-काव्य-पद्म, श्रीरामलीला-मकरंदसद्म;
तेथें मयूरेश्वर भृंग झाला, सेवावया नित्य सुखें रसाला. २
रामाचें रचिलें चरित्र मुनिनें वाल्मीकिनें संस्कृतीं,
नाहीं हानि कदापि अन्य कविंहीं तें वर्णितां प्राकृतीं;
मुक्तांचा रचिलाच हार वहिला जो रेशिमाच्या गुणें,
तो कार्पासगुणेंकरूनि करितां काय प्रभेला उणें ? ३
केलें पात्र सुवर्णाचें, कीं विरूपशि खापरी;
लावितां तेथ संहारी तम दीपशिखा परी ! ४
खळ निंदिति म्हणुनि बुधें टाकावी काय हरिगुणासक्ती ?
दीर-नणंदाजाचें साध्वी न त्यागिती सुपतिभक्ती. ५
श्रीवाल्मीकि-प्रभृति-मुनिंहीं वर्णिली रामलीला,
मादृक्षाहीं मुदितहृदयें काय गावें न तीला ?
श्रीकंठेंद्राद्यमरपरिषत्सेव्य गंगा-प्रवाहीं
संध्यास्नानादिक न करणें काय या मानवांहीं ? ६

अलंकारें युक्ता रघुपतिकथा शोभत असे,
अलंकारें हीना जरि म्हणति कोणी न विलसे;
कृताभ्यंगस्नाना कनकमणिभूषाविरहिता,
विराजे सिंदूरें धवल वसनें भूपवनिता. ७
विशुद्धस्वांताला रुचति गुण पीयूष-सम जे,
परी त्यातें दुष्ट स्वमनिं विष ऐसेंचि समजे;
घृतें क्षीरें होती प्रमुदित मखीं निर्जर खरें,
परी तेही तापप्रद रस जयाला ज्वर भरे. ८
झाले जे तृप्त भास्वत्कुलतिलक-रघूत्तंस-लीलारसानें,
सारासारज्ञ साधु स्वमनिं अमृतही मानिती फार सानें;
पीयूषें सोदरेंदुक्षयहि न हरिला, त्यागिलेंही पित्याला,
राहूचा घात केला, विष-सहजनिला कोण सेवील त्याला? ९
गीर्वाणें राघवाचें यश रसिकजना लागतें फार मिष्ट;
तैसें न प्राकृतानें, अचतुर म्हणती, मानिती तें न शिष्ट;
पीतां गोक्षीर कार्तस्वरमणिचषकें देतसे जेविं गोडी,
सारज्ञाला पलाशद्रुम-दल-पुटकें सेवितां ते न सोडी. १०
जसे होती देव प्रमुदित शचीनायकवनीं,
तसे सारज्ञाते बुधजन मयूरेशकवनीं;
महाराष्ट्रग्रंथीं रसिक कवि जे तेच रमती,
परंतु ज्ञात्याची पळहि न असावी चर मती. ११
माझी सत्कृति दूषिली जरि खळें उच्छृंखळें आग्रहें,
सेवावीच परंतु नित्य रसिकें हे सद्गुणांच्या गृहें;
चांडाल त्रिदशापगेंत वमला, कीं धेनुला स्पर्शला,
त्यांचें श्रोत्रियदेव-सेव्य पयही, त्याही सदा निर्मला! १२

**मोरोपंत**

---

## धडा ६३

# दिल्ली येथील प्रेक्षणीय स्थलें

दिल्ली हें शहर हिंदुस्थानांतच काय, पण सर्व जगामध्यें जीं इतिहास-प्रसिद्ध नगरें आहेत, त्यांतील प्रमुखांपैकीं असून, राज्यवैभव, कलाकौशल्य, विद्यावृद्धि इत्यादि गोष्टींमध्यें तें एके वेळीं अग्रेसर होतें. त्याच प्रमाणें अनेक वेळां राज्यक्रांति घडून येऊन कालचक्राच्या विचित्र गतीचा प्रभाव येथें जितका दृष्टिगोचर झाला आहे, तितका अन्यत्र क्वचितच पहावयास सांपडेल. कौरव पांडव, चव्हाण, पठाण, मोंगल, मराठे आदिकरून सर्वांस सार्वभौमत्व प्राप्त करून देण्याचा मान या शहरानें आपणाकडे घेतला असून, सर्व पृथ्वीवर आपली सत्ता गाजविणारे जे आंग्लप्रभु त्यांसदेखील या नगरानें मोहून टाकिलें, व म्हणूनच हिंदुस्थानची राजधानी होण्याचा मान त्यास मिळाला आहे.

आजपर्यंत येथील सिंहासनावर ज्यांनीं ज्यांनीं राज्य केलें त्यांनीं या शहराच्या सौंदर्यांत थोडीबहुत भर टाकण्याचा प्रयत्न केला आहे. पण मोंगल बादशहांच्या वैभवशाली कारकीर्दींत या नगरीची जी भरभराट झाली ती अपूर्व होय. यापूर्वीं प्राचीन हिंदु राजांच्या कारकीर्दींत या शहराचें जें स्वरूप असेल, तें आजमितीस प्रायः नष्ट झालेलें आहे. यामुळें दिल्ली शहरांतील प्रमुख देखावे मुसलमान ( विशेषतः मोंगल ) बादशहांच्या कारकीर्दींतीलच आहेत. यांपैकीं कांहींचें वर्णन येथें देण्याचें योजिलें आहे.

दिल्लीचा किल्ला व त्यांतील राजवाडे हेच प्रथम आपलें लक्ष वेधून घेतात. हा किल्ला व राजवाडे **शहाजहान** बादशहानें बांधले. किल्ल्याचा परिघ एक मैल असून त्यांत पूर्वीं दहाबारा राजवाडे होते. पण आतां त्यांपैकीं मुख्य मुख्य तेवढे राहिले आहेत. या किल्ल्यास शहराच्या बाजूनें

दोन दरवाजे असून त्यांपैकीं एकास ‘ लाहोर दरवाजा ’ असें नांव आहे. येथील खंदकाचें काम फार प्रेक्षणीय आहे. खुद्द दरवाजा फार मजबूत व अभेद्य असून त्याच्या शिरोभागावरून फार सुंदर देखावा दृष्टीस पडतो. या दरवाजांतून आंत गेलें म्हणजे प्रथम नगारखान्याची इमारत नजरेस पडून नंतर ‘ **दिवाणी-आम** ’ व ‘ **दिवाणी-खास** ’ हे दोन मुख्य राजवाडे दृष्टीस पडतात.

दिल्ली येथें जीं अनेक प्रेक्षणीय स्थळें आहेत, त्यांत **दिवाणी-आम** व **दिवाणी-खास** हे दोन बादशाही दरबार मुख्य होत. ‘ दिवाणी-आम’ हा शहाजहान बादशहाचा प्रसिद्ध दिवाणखाना होय. ही सर्व इमारत बाहेरून तांबूस वर्णाची, खुली, पण अत्यंत भव्य व नेत्राकर्षक दिसते. ही सोनेरी रंगाच्या वेलपत्तीनें सुशोभित केली असून पूर्वी येथें फार वैभव वास करीत होतें. या दिवाणखान्यास जें छत होतें तें सर्व रुप्याचें असून त्यावर कलाकुसरीचें सुंदर काम केलें होतें. येथील प्रत्येक खांबास अस्मानी रंगाचा चकचकीत मुलामा केला असून त्यामधून सुंदर पुष्पें कोरलीं होतीं. सर्व दिवाणखानाभर सुंदर नक्षीकाम अप्रतिम केलें असून त्यामधून कित्येक इतिहासप्रसिद्ध वृत्तांचीं मार्मिक चित्रें काढिलीं होतीं. ह्या महालाच्या मध्यभागीं दहा फूट उंचीचा एक संगमरवरी दगडाचा चौथरा असून त्यावर मेघडंबरी थाटाचा एक शिखराकार शिरोभाग केला आहे. तो स्फटिकवत् शुभ्र असून त्यांत कारागिराच्या कौशल्याची परमावधीच झाली आहे, असें म्हटलें तरी चालेल. या सुंदर स्थलाच्या मध्यभागीं दिल्लीपतीचें प्रसिद्ध तख्त ऊर्फ रत्नजडित **मयूरासन** ठेवीत असत. ह्याचें मुसलमानी इतिहासांत ‘ तख्त-इ-तौस ’ असें नांव आहे.

या तख्ताचें वर्णन करावें तितकें थोडेंच आहे. दिल्लीच्या अनेक बादशहांनीं अनेक सिंहासनें केलीं असतील, पण असें अद्वितीय मयूरासन कोणींच केलें नव्हतें. हें सिंहासन दीर्घवर्तुलाकार असून त्याची लांबी

सहाफूट व रुंदी चार फूट होती. त्याचा वरील सर्व भाग हिर, माणकें, पाच, इत्यादि अमूल्य रत्नांचा असून खालील भाग सुवर्णाचा होता, व त्याच्या दर्शनी बाजूस हिरे बसविले होते. यास लावलेलीं नुसतीं माणकेंच १०८ होतीं. शिवाय जागोजाग नीलमणि व पाचा यांचाही उपयोग केला होता. या सिंहासनावर सुवर्णवृक्ष करून त्यावर रत्नजडित मयूर बसविला होता; आणि त्याचा रत्नखचित पिसारा सिंहासनाधीशावर अनायासें उडत रहावा अशी योजना केली होती. मयूरपिसाऱ्याचें काम अगदीं अप्रतिम केलें असून त्यावरील विविध रंग खुलविण्याकरितां तऱ्हेतऱ्हेचीं रत्नें त्यांत जडलीं होतीं. बादशहाच्या शिरोभागावरील छत्रही हिऱ्यामोत्यांचें असून त्याला बकुळाएवढ्या मोठ्या मोत्यांची झालर लावलेली होती. या सिंहासनाचे सर्व हिरे गोंवळकोंडयाच्या खाणींतील असून ते तारकापुंजाप्रमाणें चमकत असत. या मयूरासनावर सरकारस्वारी जामानिमा करून मागील द्वारानें येऊन विराजमान होत असे. या अद्वितीय सिंहासनानें ह्या दरबारमहालास अप्रतिम शोभा येत असे. ह्या सिंहासनाची किंमत टावर्नियर नामक फ्रेंच प्रवाशानें सुमारें १०$\frac{१}{२}$ कोटि केली आहे. असो. पुढें दिल्लीपतीवर कालाची वक्रदृष्टि होऊन सन १७३९ सालीं हें मयूरासन इराणचा प्रबळ बादशहा नादीरशहा याच्या हस्तगत झालें! तथापि हा दिवाणी-आम दरबार पुढें बरेच दिवस कायम होता. परंतु सन १७६० सालीं पुण्याचे पेशवे सदाशिवराव भाऊसाहेब यांनीं पानिपतच्या रणकंदनाचे समयीं हट्टास पेटून त्यावर हल्ला केला; व सुरजमल्ल जाटाचा सदुपदेश न ऐकतां, मागें मोंगलांनीं रायगडच्या नूतन संस्थापित शिवाजी महाराजांच्या तख्ताचा भंग केला होता, त्याचा सूड घेण्याच्या उद्देशानें, या सुंदर महालाचें सर्व रुप्याचें छत तोडून काढलें. व त्याचे रुपये करून सैन्याची बेगमी केली! या छताची किंमत सतरा लक्ष रुपये झाली असें एके ठिकाणीं लिहिलें आहे. या वैभवालंकृत महा-

ल्याचें प्रस्तुतचें दीनस्वरूप पाहून कोणास बरें दुःखाश्रु येणार नाहींत? सांप्रत येथें तें सुवर्णमय नक्षीकाम राहिलेलें नाहीं; अथवा पृथ्वीपतींनीं हेवा करण्यासारखें तें मयूरासनही कोठें दिसत नाहीं! ज्या संगमरवरी चबुत्र्यावर हें रत्नासन ठेवीत असत, तो मात्र कायम असून आपली विपदवस्था दाखवीत आहे. ह्या पूज्य स्थलास बहुविध प्रेक्षकांचा हस्तस्पर्श होऊं नये म्हणून त्याभोंवतीं लोखंडी गज ठोकिले आहेत. ह्या दुर्दैवग्रस्त दिवाणी-आमचें दर्शन घेतलें म्हणजे वैभवाच्या क्षणभंगुरतेविषयीं विचार मनांत येऊन मन फार अस्वस्थ होतें.

---

## धडा ६४

# दिल्ली येथील प्रेक्षणीय स्थलें

### भाग २ रा

दिवाणी-आमच्या प्रस्तुतच्या हीन स्थितीनें मन उदास होतें न होतें तों लगेच "दिवाणी-खास" ही स्फटिकतुल्य शुभ्र व मनोरम इमारत दिसूं लागते. ह्या प्रसिद्ध महालांत जाण्याकरितां प्रेक्षकांस एका सुंदर पुष्पवाटिकेमधून जावें लागतें. तेथें जाऊन सन्मुख उभें राहिलें म्हणजे आपणापुढें अत्यंत धवल व तेजःपुंज अशी कांहीं तरी अपूर्व वस्तु आहे असा भास होतो. या खास महालाचें सर्व काम अति शुद्ध व अत्युत्तम संगमरवरी दगडाचें असून, त्यामध्यें बहुविध रंगांचीं रत्नें बसवून व जागोजागीं सुवर्णाचें काम करून त्यास अद्वितीय शोभा आणिली आहे. या महालाच्या एका बाजूस यमुना नदीचा सुंदर देखावा दृष्टीस पडतो. एकीकडे उद्यानाची शोभा दिसत असते. एकीकडे सुवर्णांकित न्यायतुलेचें चित्र काढलेलें शुभ्र प्रवेशद्वार चमकत असतें. या महालावर सायंकाळीं जेव्हां कोमल पण आरक्त सूर्यकिरणांच्या प्रकाशलहरी परावर्तन पावून चमकूं लागतात, त्या वेळीं येथें

जो तेजोमय देखावा दिसूं लागतो, तो अगदीं अवर्णनीय असतो. खरोखर ज्या वेळीं येथें खरीं रत्नें विराजत असतील, त्या वेळीं येथें केवढी अप्रतिम शोभा दिसत असेल बरें ? या महालाच्या पूर्वाभिमुख द्वाराच्या शिरोभागावर पर्शियन भाषेंत असें लिहिलें आहे कीं—

**"पृथ्वीवर जर प्रत्यक्ष इंद्रभुवन कोठें असेल, तर तें या ठिकाणीं असलें पाहिजे, या ठिकाणीं असलें पाहिजे, याच ठिकाणीं असलें पाहिजे !"**

व ही स्तुति या महालाला अक्षरशः योग्य आहे.

या सौंदर्यमंदिरामध्यें कित्येक महत्वाच्या गोष्टी घडून आल्या आहेत; त्यांवरून त्यास राजकीय उलाढाली पाहण्याकरितांच निर्माण केलें आहे कीं काय, असा भास होतो. याच महालामध्यें शहाजहान बादशहानें मोठ्या थाटानें सिंहासनाधिष्ठित होऊन दिल्लीचा राज्यकारभार चालविला. याच महालांतून ईस्ट इंडिया कंपनीच्या हॅमिल्टन् नामक साहेबास शंहाजहान बादशहाची प्रकृति बरी केल्याबद्दल सदतीस गांवें इनाम देण्याचा, व कंपनीच्या मालावरील जकात माफ करण्याचा हुकूम सुटला. याच महालांत बसून औरंगजेबानें आपल्या दारा व मुराद या बंधुद्वयाचा वध केला. याच ठिकाणीं नादीरशहानें दिल्लीपति महंमदशहा यास गोगलगाय करून आपल्यापुढें नाकदुऱ्या काढावयास लाविलें. याच महालांत गुलाम कादरानें दुर्दैवी शहाआलम् बादशहाचे डोळे काढून त्याच्या मुलाचा वध केला. व येथेंच पुढें महादजी शिंद्यांनीं त्या नराधम गुलाम कादरास पिंजऱ्यांत घालून बादशहापुढें उभें केलें, व आपल्या बहादुरीबद्दल वकील मुतालिकीची सनद व नालकी पालखी मिळविली. बंगाल, बहार, ओरिसा प्रांताच्या दिवाणीची सनद ईस्ट इंडिया कंपनीस येथूनच मिळाली. व हाय, हाय ! ज्या स्थलीं अनेक बादशहांचा राज्याभिषेक व्हावा, त्याच स्थलीं

त्यांची पदच्युतता नेमलेली असावी, ही सर्वांत खेदकारक गोष्ट होय ! शेवटीं इंग्रजसरकारनें कृपाळू होऊन जी नेमणूक करून दिली ती खात बसलेल्या वृद्ध बहादूरशहावर ( दिल्लीच्या शेवटच्या बादशहावर सन १८५७ च्या बंडांत सामील झाल्याचा आरोप येऊन, त्याची चौकशी करण्याकरितां जें कमिशन् बसलें तेंही याच महालामध्यें ! असें हें स्थळ पाहून कोणाचें अंत:करण शोकानें व्याप्त होणार नाहीं बरें ?

दिवाणी-खासच्या एका बाजूस सुवर्णांकित न्यायतुलेचें एक चित्र काढिलें आहे. या चित्राचा इतिहास फार मौजेचा आहे. शहाजहान बादशहाची स्वारी या महालांत बसून इन्साफ करीत असे. तो इन्साफ ताजव्यांत वजन केल्याप्रमाणें अगदीं बिनचूक असावयाचा हें दाखविण्याकरितां, ही न्यायतुला तयार केली होती. या न्यायतुलेजवळ एक घंटा असे. ती घंटा वाजवून प्रजाजनांनीं बादशहाजवळ अर्ज करावा अशी येथें पद्धति होती. ही पद्धति शहाजहानानें आपल्या वडिलांपासून घेतली होती असें म्हणतात. जहांगीर बादशहा न्यायीपणाबद्दल फार प्रख्यात होता. त्याच्या कडक न्यायप्रियतेबद्दल बऱ्याच आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं एक येथें देतों.

नूरजहान राणीवर जहांगीरचें प्रेम किती होतें हें सर्वश्रुत आहे. तिला शिकारीचा नाद फार असे. ती फावल्या वेळीं निशाण मारण्याची कसरत करी. एके दिवशीं नदीच्या पैलतीरीं चांद लावून ती निशाण मारीत असतां निशाण चुकून गोळी एका धोब्यास लागली, व तो तत्काळ गतप्राण होऊन पडला. धोबीण आक्रोश करीत किल्ल्याचे दरवाज्यापाशीं आली, व तिनें दोरी ओढून घंटा वाजविली. त्याबरोबर पहारेवाल्यानें बादशहापुढें तिला नेऊन उभें केलें. तिनें हात बांधून अर्ज केला कीं “ आपल्या जनानखान्यांतून गोळी येऊन, माझ्या नवऱ्याला

लागली व तो मेला." चौकशी करतां नूरजहानच्या हातून धोबी मेला असें समजलें. तें ऐकतांच बादशहा फिका पडला. दरबारचे लोक बादशहा आतां काय इन्साफ देतो हें पाहण्यास उत्सुक झाले. बादशहानें शांतपणें एक बंदूक, दारू, गोळी व तोडा शिलगावलेला मागविला. आणि धोबिणीच्या समोर बंदूक भरून गोळी घालून तोडा चढवून, तिच्या पुढें केली; व बादशहा म्हणाला, "मुसलमानी कायद्याप्रमाणें तुला खुनाच्या बदला खून मिळाला पाहिजे. नूरजहाननें तुझ्या नवऱ्यास मारून तुला विधवा केलें आहे. त्याचेबद्दल तूं तिचा नवरा मारून तिला विधवा कर. ही बंदूक भरून तयार आहे; व तिचा नवराही मी तुझ्यापुढें उभा आहें. चलाव बंदूक !"

हें भाषण ऐकतांच दरबारचे सर्व लोक चकित झाले. धोबिणीनें हात जोडून विनंति केली कीं "मी खून माफ केला;" बादशहानें नूरजहानच्या नेमणुकींतून धोबिणीस गांव इनाम दिले. ते गांव अद्यापि तिजकडे चालत आहेत. या आख्यायिकेवरून या न्यायतुलेचा उद्देश व तेथील कामाचा मासला समजून येण्यासारखा आहे.

**रा. ब. द. ब. पारसनीसकृत** 'दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ' या पुस्तकावरून

---

धडा ६५

## दिलीप राजाची गोष्ट

प्राचीन काळीं आर्यावर्तात जीं विख्यात राजकुलें होऊन गेलीं त्यांत रघुवंशाची कीर्ति सर्वांत श्रेष्ठ आहे. याच कुलांत परमपूज्य श्रीरामचंद्राचा जन्म झाला. रामचंद्राच्या उज्ज्वल कीर्तीमुळें त्याच्यापूर्वीचे राजे जणुं कांहीं लोपून गेले. पण ते राजेही शौर्यानें, बलानें व प्रजाहितदक्षतेनें रामचंद्रापेक्षां फारसे कमी नव्हते. कविश्रेष्ठ **कालिदासानें** आपल्या **'रघुवंश'**

नामक महाकाव्यांत त्यांच्या पराक्रमाचें फार सुरस वर्णन केलें आहे. यांपैकीं **दिलीप** राजाची गोष्ट थोडक्यांत आम्ही येथें देणार आहों.

दिलीपाचा जन्म सूर्यवंशांतील मनूच्या कुळांत झाला होता. त्याची रुंद छाती, भरलेले खांदे, दीर्घ बाहु व तालवृक्षासारखा उंच देह हीं पाहिलीं, म्हणजे हा मूर्तिमंत क्षात्रधर्मच अवतरला आहे कीं काय असें वाटे. बलानें व तेजानें त्याची कोणीच बरोबरी करूं शकत नसे. त्याची बुद्धीही त्याच्या विशाल देहास साजेशीच होती; व त्याचें वर्तन या दोहोंस अनुरूप असेंच होतें. शत्रूंना जरी तो भयप्रद होता, तरी मित्रांस तो अत्यंत प्रेमळ व सुखद असाच वाटे. **मनूनें** घालून दिलेल्या कायद्यांचें अतिक्रमण करण्याची त्याच्या राज्यांत कोणाचींच छाती नव्हती. सूर्य जसा पुनः परत करण्यासाठीं पृथ्वीवरील जलाचें शोषण करतो, तद्वत् दिलीप राजा प्रजांच्या हितार्थ खर्च करण्याकरितांच त्यांच्यापासून करभार घेत असे. स्वतःच्या सुखोपभोगासाठीं द्रव्याचा उपयोग करण्याचा विचार त्याच्या मनास कधींही शिवला नाहीं. प्रजांचें पोषण करणें, त्यांना शिक्षण देऊन सुविनीत करणें, व संकटांपासून त्यांचें रक्षण करणें हीं सर्व कामें तो करीत असल्यामुळें त्यांचा खरा पिता तोच होता; व त्यांचे जन्मदाते पिते केवळ नांवाचे पिते झाले होते. त्याच्या राज्यांत चोरी, चहाडी वगैरे अपराध प्रत्यक्ष कधींच घडत नसल्यामुळें हें शब्द केवळ लोकांना ऐकून माहीत होते. आपल्या बाहुबलानें तो एकटा समुद्रवलयांकित पृथ्वीचें शासन करूं शके. यामुळें त्याची चतुरंग सेना ही एक केवळ शोभेची वस्तु होऊन बसली होती.

दिलीप राजाची पत्नी **सुदक्षिणा** हीही अशा पराक्रमी व न्यायनिष्ठ राजाला योग्य अशीच होती. तिच्या पवित्र व सुखकारक समागमांत त्यानें बराच काळ घालविला, तथापि त्याला अद्यापि संतति मात्र झाली नव्हती. त्यामुळें सर्व सुखांची समृद्धि असूनही त्याचें मन उदास असे.

शेवटीं या बाबतींत कांहीं दैवी उपाय करून पहावा असा विचार मनांत आणून, त्यानें आपला कुलगुरु जे **वसिष्ठ** मुनि यांना सल्ला विचारला. तेव्हां वसिष्ठ मुनींनीं समाधि लावून बराच वेळ विचार केला. नंतर ते म्हणाले: राजा, तुला संतति न होण्याचें कारण मला कळलें आहे. पूर्वी एकदां इंद्राला मदत करण्याकरितां स्वर्गलोकीं जाऊन तूं परत येत असतां वाटेंत कल्पतरूच्या सावलीखालीं कामधेनू उभी होती. बहुत काळ लोटल्यामुळें पत्नीच्या समागमाविषयीं उत्सुक होऊन घाईघाईनें येतांना तूं त्या पूज्य कामधेनूस नमस्कार व प्रदक्षिणा करण्यास विसरलास. त्यामुळें तिला कोप आला, व 'माझा असा अनादर ज्या अर्थी तूं केलास, त्या अर्थी माझ्या संततीची सेवा केल्या-शिवाय तुला संततीच होणार नाहीं,' असा तिनें तुला शाप दिला. हा शाप त्या वेळीं तुला किंवा तुझ्या सारथ्याला कोणालाच ऐकूं आला नाहीं; कारण त्या वेळीं आकाशगंगेच्या धो धो वाहणाऱ्या प्रवाहांत उन्मत्त दिग्गजांचा कोलाहल चालला होता. हा शाप आतां तुला संतति होऊं देत नाहीं. ती कामधेनु तर सध्यां पाताळलोकीं चाललेल्या एका यज्ञांत गुंतलेली आहे. आतां तूं तिची मुलगी जी **नंदिनी** नांवाची धेनु माझ्या आश्रमांत आहे, तिलाच त्या कामधेनूची प्रतिनिधी कल्पून जर तिची आराधना करशील, व तिला प्रसन्न करशील तर तुझी इष्ट कामना खास सिद्ध होईल.

वसिष्ठाचें हें भाषण पुरें होत आहे तोंच त्याची नंदिनी नांवाची होमधेनु वनांतून परत आली. ती पिंगट रंगाची असून तिच्या कपा-ळावर एक किंचित् वांकडी अशी शुभ्र रेषा होती. त्यामुळें ती बाल-चंद्राच्या कोरेनें शोभणाऱ्या संध्येप्रमाणें शोभत होती. वत्साला पाहिल्या-बरोबर तिची कास दुग्धानें भरून आलेली होती. अशा त्या धेनूला पाहून वसिष्ठ फिरून म्हणाला, "राजा, तुझे हेतु लवकरच पुरणार

यांत शंका नाहीं. कारण ही पहा, आठवण काढतांच ही धेनू येऊन हजर झाली ! आतां उद्यांपासून तूं इची मनोभावें सेवा कर. एखाद्या गुराख्याची वृत्ति धारण करून तूं इच्या पाठीमागून रोज वनांत जात जा. ती चालली कीं तिच्यामागून चालावें; ती उभी राहिली कीं उभें राहावें, ती बसली कीं बसावें, व ती पाणी प्याली कीं आपण पाणी प्यावें, तिला जी लागेल ती वस्तु पुरवावी, इत्यादि प्रकारांनीं तूं तिला प्रसन्न करून घे. तुझ्या पत्नीनें ही धेनू आश्रमांत आल्यापासून पुनः दुसरे दिवशीं वनाकडे जाईपर्यंत इची सर्व प्रकारें चाकरी करावी. असा क्रम तिचा प्रसाद मिळेपर्यंत अव्याहत चालू ठेवला पाहिजे."

वसिष्ठाच्या आज्ञेप्रमाणें त्या धर्मनिष्ठ राजानें व त्याच्या पतिव्रता पत्नीनें दुसऱ्याच दिवसापासून त्या धेनूची सेवा करण्यास सुरवात केली. सुदक्षिणेनें सकाळीं लवकर उठून स्नान वगैरे करून त्या धेनूची पूजा करावी, व तिच्या वत्सानें दुग्धप्राशन केल्यानंतर त्याला बांधून नंदिनीला वनांत जाण्याकरितां सोडावें, व कांहीं पावलें त्या धेनूबरोबर गेल्यावर मग मागें परतावें, असा नियम ठेवला. नंतर राजानें त्या धेनूच्या मागोमाग जाऊन तिचें सर्व प्रकारें रक्षण करावें. हें व्रत आचरतांना राजा आपल्या नोकरचाकरांपैकीं कोणासही आपल्याबरोबर येऊं देत नसे. कारण आपलें स्वतःचें किंवा त्या धेनूचें रक्षण करण्यास तो एकटाच समर्थ होता. सुवासिक अशा कोंवळ्या तृणाचे घास देऊन, तिचें अंग खाजवून व साफ करून, तिच्या अंगावर बसणाऱ्या माशा वारून, व ती जिकडे जाईल तिकडे स्वैरपणें तिला जाऊं देऊन, राजा त्या नंदिनीची सारखी सेवा करीत असे. आपली सावली जशी आपण जाऊं तिकडे आपल्याबरोबर येते, तसा राजा ती जाईल तिकडे जात असे, व तिला जें पाहिजे असेल तें करीत असे.

---

## धडा ६६

# दिलीप राजाची गोष्ट

### भाग २ रा

एके दिवशीं ती धेनु नेहमींप्रमाणें स्वच्छंदपणें चरत चरत हिमालय पर्वताच्या एका दरींत गेली. त्या ठिकाणानजीक गंगानदीचा एक धबधबा होता, व त्याच्या जवळचा प्रदेश कोंवळ्या व हिरव्यागार तृणानें फार सुशोभित झाला होता. त्या वनप्रदेशाचें सौंदर्य पाहण्यांत राजा एक क्षणभर गुंग होऊन गेला. पण लगेच एक आर्त स्वर कानीं पडल्यामुळें राजाची दृष्टि पुनः धेनूकडे वळली; व पाहतो तों एका प्रचंड सिंहानें तिच्यावर झांप टाकून तिला पकडलें होतें, व ती मोठमोठ्यानें हंबरडे फोडीत होती. राजानें लागलीच धनुष्याला बाण जोडून त्या सिंहाला मारण्याकरितां आपला हात भात्याकडे नेला. पण काय चमत्कार! त्याचा हात तेथून हालेचना. राजानें खूब धडपड केली, पण कांहीं उपाय चालेना; तेव्हां एखाद्या मांत्रिकानें भारून टाकलेल्या सर्पाप्रमाणें तो हतबुद्ध झाला. इतक्यांत मनुष्यवाणीनें तो सिंह दिलीपाला म्हणाला, "राजा, तुझी धडपड व्यर्थ आहे; शिवाय तूं एखादें अस्त्र जरी माझ्यावर सोडलेंस तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. कारण, मी प्रत्यक्ष **शंकराचा 'कुंभोदर'** नांवाचा दास आहें. हा समोरचा देवदार वृक्ष पाहिलास ना? हा भगवान् महादेवांचा इतका लाडका आहे कीं, ते त्याला आपला पुत्रच मानतात. वनांतल्या हत्तींनीं या वृक्षाला आपली मान घासून त्याची साल काढूं नये, म्हणून याचें रक्षण करण्याकरितां शंकरांनीं सिंहाचें रूप देऊन मला या ठिकाणीं ठेवलें आहे. या ठिकाणीं अनेक दिवसपर्यंत मला कांहीं भक्ष्य न मिळाल्यामुळें, परमेश्वरानें कृपाळु होऊनच आज ही धेनु येथें पाठविली आहे असें मला वाटतें. आतां हिला खाऊन मी आपल्या उपोषणाचें

पारणें सोडणार. तर तूं आतां मुकाट्यानें परत जा. शस्त्रास्त्रांनीं जेवढें या धेनूचें रक्षण करणें शक्य होतें, तेवढें तूं केलें आहेस; व याप्रमाणें तूं आपल्या गुरूवरची निष्ठाही व्यक्त केली आहेस. तर आतां तुला लज्जा वाटण्याचें कांहीं कारण नाहीं."

हें भाषण ऐकून राजाला प्रथम आपल्या दुर्बलत्वाविषयीं जो खेद झाला होता तो नाहींसा झाला. मग तो त्या सिंहास म्हणतो, "हे मृगेंद्रा, आपण माझी हालचाल बंद केलीच आहे. तथापि माझ्या मनांतले विचार सर्व आपण जाणतच असाल, म्हणून मी दोन शब्द बोलतों. सर्व जगाचा शास्ता जो भगवान् महादेव तो मला मान्यच आहे. पण माझ्या डोळ्यांदेखत माझ्या गुरुजींच्या होमधेनूचा नाश होत असतां मी स्वस्थ बसावें, हेंही अनुचित आहे! तर आपण कृपा करून माझ्या देहानें आपल्या क्षुधेचें निवारण करावें, व ह्या धेनूला आपल्या वत्साच्या भेटीकरितां परत पाठवावी, एवढीच माझी विनंति आहे!"

यावर थोडेंसें स्मित करून सिंह म्हणतो "राजा, तूं वेडा तर नाहींस? सर्व पृथ्वीचें एकछत्री राज्य, तरुण वय, सुंदर शरीर, व नानाप्रकारचे सुखोपभोग, या सर्वांचा या एका गाईकरितां त्याग करावयास तूं सज्ज होतोस त्या तुला काय म्हणावें? भूतदयेनें तूं असें करण्यास उद्युक्त झालास असें म्हणावें, तर त्यांतही कांहीं अर्थ दिसत नाहीं. कारण तूं जर इजसाठीं आपला देह अर्पण केलास, तर फार तर ही एकटी जगेल; पण जर तूं जगलास तर लक्षावधि प्रजाजन तुझ्या कृपाछत्राखालीं आनंदानें जगतील. बरें, तुझा गुरु तुझ्यावर रागावेल ही भीतिही व्यर्थ आहे. कारण असल्या कोट्यवधि गाई देऊन तूं आपल्या गुरूचा कोप शांत करूं शकशील! यास्तव हा नाद तूं सोड. अरे, अनेक सुखोपभोगाचें साधन असें हें शरीर, व इहलोकींचें प्रत्यक्ष इंद्रपद असें तुझें राज्य, यांचा तूं विनाकारण त्याग करूं नको.

इतकें बोलून सिंह थांबला. भोंवतालच्या गिरिकंदरांतून येणाऱ्या प्रतिध्वनींनेंही राजाला जणूं कांहीं तोच मजकूर पुनः सांगितला. पण आपणाकडे भयभीत दृष्टीनें पाहणाऱ्या त्या धेनूकडे पहात पहात राजा पुनः म्हणालाः “ **आश्रिताचें रक्षण करणें हाच क्षत्रियांचा खरा धर्म आहे.** त्याच्या उलट स्वतःचें रक्षण करण्याकरितां आश्रितांचा नाश होऊं दिला तर तें मला शोभेल काय ? असल्या निंद्य प्राणाला घेऊन मला काय करावयाचें आहे ! शिवाय दुसऱ्या अनेक गाई देऊनही या गाईची भरपाई करणें मला शक्य नाहीं. ही प्रत्यक्ष कामधेनूची कन्या आहे, व शंकराचे गण असल्यामुळेंच आपण इला पकडूं शकलां. इतरांची तसें करण्याची प्राज्ञा नव्हती. तर आपण कृपाळु होऊन या धेनूला सोडा, व माझ्या शरीरावर आपलें पारणें करा. असें केल्यानें आपली क्षुधाही भागेल, व मुनींची यज्ञक्रियाही अबाधित चालेल. सेवाधर्म किती कठिण आहे, याची जाणीव आपणासही आहेच. या देवदार वृक्षाचें संरक्षण करतांना आपला प्राण देण्यास सुद्धां आपण तयार व्हालच कीं नाहीं ? आपण माझ्या जड शरीरावर दया करून माझे प्राण वांचवूं पाहतां; पण याहूनही अत्यंत महत्वाचें असें जें माझें कीर्तिरूपी शरीर त्यावर आपण दया करावी. मला माझ्या प्राणापेक्षांही कीर्ति अधिक प्रिय आहे. तर एवढी विनंति आपण मान्य करावीच. ”

सिंह म्हणाला, “ ठीक आहे. हो तर तयार मरणाला.” लगेच दिलीपाचा हात भात्यापासून सुटला. दिलीपानें खरोखरच आपलीं शस्त्रास्त्रें बाजूला ठेविलीं, व वचनाप्रमाणें आपला देह त्या सिंहास अर्पण केला. खालीं मान घालून, आतां आपल्या मानेवर सिंहाची झडप पडणार म्हणून जों तो वाट पाहतो आहे, तों त्याच्या अंगावर सिंहाच्या झडपेऐवजीं देवगंधर्वांनीं केलेली पुष्पवृष्टि पडली ! व “ वत्सा, ऊठ ” असे शब्द कांनीं पडण्याबरोबर त्यानें वर दृष्टि करून पाहिलें, तों सिंह वगैरे कांहीं

नसून प्रसन्न वदन करून तेथें उभी असलेली नंदिनी मात्र त्याला दिसली ! त्याला फार चमत्कार वाटला; पण इतक्यांत ती धेनु म्हणाली, " वत्सा, स्वस्थ हो. तुझी निष्ठा कसाला लावण्याकरितां मी मायेनेंच तो सिंह निर्माण केला होता. एरव्हीं ऋषींच्या प्रभावानें प्रत्यक्ष यमसुद्धां मला अपाय करूं शकत नाहीं. तुझी गुरुभक्ति व माझ्यावरील प्रेम पाहून मी संतुष्ट झालें आहें. तर तुला इष्ट असेल तो वर माग !"

दिलीपाचा आनंद गगनांत मावेना. नम्र भावानें तिला नमस्कार करून दिलीप म्हणाला " माते, सुदक्षिणेच्या पोटीं कुलदीपक पुत्र उत्पन्न व्हावा एवढेंच माझें मागणें आहे !" नंदिनी म्हणाली " तथास्तु. आज संध्याकाळीं माझें वत्स दुग्ध प्यालें, व होमाकरितां लागणारें दूध काढून घेतलें, म्हणजे जो दुधाचा अवशेष राहील, त्याचें तूं आपल्या स्त्रीसह प्राशन कर, म्हणजे तुझा मनोरथ सिद्धीस जाईल."

त्याप्रमाणें त्या राजानें केलें; व नंतर वसिष्ठ मुनींचा निरोप घेऊन तो परत आपल्या राजधानीस गेला. थोड्याच दिवसांनीं सुदक्षिणा गर्भवती झाली, व महापराक्रमी रघुराजाचा जन्म तिच्या पोटीं झाला.

---

धडा ६७

## अश्वत्थामा व कर्ण यांचा कलह.

[ खालील उतारा **वेणीसंहार** नाटकांतील आहे, भारतीय युद्धांत द्रोणाचार्य यांचा वध झाल्यानंतर त्याविषयीं दुर्योधन व कर्ण बोलत असतां पितृशोकानें विव्हल झालेल्या अश्वत्थाम्यास घेऊन कृपाचार्य प्रवेश करितो. ]

**दुर्योधन**—( त्यांजकडे पाहून ) कोण? कृपाचार्य! अश्वत्थामाही! गुरो! मी अभिवंदन करितों. आचार्यपुत्रा! येरे बाबा, मला भेटूं दे.( अश्वत्थाम्यास आलिंगून जवळ बसवितो ).

**अश्व०**—( डोळ्यावांटे अश्रु काढून ) राजा, माझा तात कोठें आहे ? हे ताता !

**दुर्योधन**—हे आचार्यपुत्रा, ह्या संकटाचे प्रसंगीं तुझ्या आणि माझ्या दुःखांत कांहीं अंतर नाहीं. पहा,

( आर्या ) त्वत्तात मज्जनकसख, विद्यागुरुही तुला तसा मातें;
तन्निधनदुःख अन्या, किति सांगूं ? तूंचि जाणसी त्यातें ॥ १ ॥

**अश्व०**—राजा, तूं अशी मजवर कृपा करितोस त्या अर्थीं मीं शोकभार हलका करावा हें योग्य आहे. परंतु मला इतकेंच वाईट वाटतें कीं,

( आर्या ) मी असतां कां माझ्या तातें केशग्रहासि पावावें ? ।
मग कैसें बापांनीं पुत्रांपासूनि भव्य इच्छावें ? ॥ २ ॥

**कर्ण**—द्रोणपुत्रा, येथें दुसऱ्यांनीं काय करावें ? ज्यावर दुसऱ्यांचा भरवसा त्यानेंच हातचें शस्त्र टाकलें, व आपली अशी अवस्था करून घेतली !

**अश्व०**—अंगराज, आपण काय बोललां ? दुसऱ्यानें काय करावें ? ऐका काय करावें तेंः—

( श्लोक ) जो जो या धर्मसैन्यीं स्वभुजबळमदें पाळितो आयुधासी
जो जो पांचाळवंशीं शिशु, जरठ, युवा, कीं असे गर्भवासी, ।
जो जो तत्कर्मसाक्षी मम रिपु हृदयीं वागवी जो अहंता,
त्याचा त्याचाचि नोहे, मज समज रणीं मृत्युचाही निहंता ! ॥ ३ ॥

**दुर्योधन**—आचार्यपुत्रा, तूं वीरनायक आहेस. तुझ्या शौर्याची बरोबरी कोण करणार आहे ?

**कृपाचार्य**—राजा, द्रोणाच्या पश्चात् त्याचा हा पुत्र ह्या महासंग्रामाचा भार आपल्या मस्तकीं घेण्यास योग्य आहे. ह्मणून याला सैनापत्याचा अभिषेक करावा.

**दुर्योधन**—गुरो, ही आपली योजना फार चांगली आहे, पण या गोष्टीविषयीं पूर्वींच माझें कर्णाशीं वचन गेलें आहे.

**अश्व०**—राजा कौरवेश्वरा, अरे, तूं या समयीं मजवर भार टाकून स्वस्थ बैस; पहा,

( ओव्या ) राजा आजच अकेशव । त्रिभुवन करीन अपांडव ।
सोमकपांचाळांचें नांव । मात्र शेष राहील ! ॥ ४ ॥
दावूनियां शौर्य धाटी । महावीरांचिया थाटीं ।
संपवीन संग्रामगोष्टी । आजि सर्वां समक्ष ॥ ५ ॥

**कर्ण**—बोलणें सोपें, पण करणें फार कठिण ! असें कर्म करण्याजोगे पुरुष ह्या कौरवसैन्यांत पुष्कळ निघतील !

**अश्व०**—होय अंगराजा, कौरवसैन्यांत असें कर्म करण्याजोगे पुरुष आहेत. पण मी जें बोललों तें दुःखाच्या भरांत बोललों; केवळ गर्वानें वीरपुरुषांचा धिक्कार करावा या बुद्धीनें बोललों नाहीं.

**कर्ण**—मूर्खा, जो दुःखित झाला त्यानें रडत बसावें; जो वीर कुपित झाला असेल, त्यानें शस्त्रें घेऊन समरांगणीं जावें हेंच योग्य. निष्कारण बडबड काय कामाची ?

**अश्व०**—( संतापून ) अरे राधागर्भभारभूता, नीचा सूतपुत्रा ! तूं माझी निंदा करितोस काय ?

**कर्ण**—हें तूं मला लावून बोलतोस काय ? पण

( श्लोक ) सूत किंवा सूतपुत्र कोणी तरि असेन मी; ।
**दैवाधीन कुलीं जन्म, मदधीनचि पौरुष !** ॥ ६ ॥

**अश्व०**—तूं मघाशीं काय बोललास ? बोल पुनः ! अरे मला अश्वत्थाम्याला रडून दुःखाचा प्रतिकार करावयास शिकवितोस काय ? शस्त्रानें नको ? पण लक्षांत ठेव—

( श्लोक ) माझें शस्त्र तुझ्यापरी न गुरुच्या शापें जळालें असे;
कीं सोडोनि रणा पलायन न मीं, त्वां आजि केलें तसें; ।
नाहीं सारथिच्या कुळीं जनि मला, कीं निंद्य नाहीं जिणें,
दुःखाचा प्रतिकार कां करिन मी अस्त्रेंचि शस्त्राविणें ! ॥७॥

**कर्ण**—( सक्रोध होऊन ) अरे वाचाला, अरे वृथा शस्त्र धारण करणाऱ्या ब्राह्मणाच्या पोरा ! ऐकिलेंस ?

( श्लोक ) सवीर्य किंवा निर्वीर्य म्यां आयुध न टाकिलें, ।
जसें पांचाळभीतीनें त्वत्पित्यानें महाबळें ! ॥ ८ ॥

**अश्व०**—( संतापानें वेडा होऊन ) अरे रथकारकुलकलंका, अरे अस्त्रविद्याऽनभिज्ञा, माझ्या तातांची देखील निंदा करितोस काय ? परंतु,—

( श्लोक ) तो शूर कीं भीरु असोचि तात,
प्रख्यात कीर्ती भुवनत्रयांत; ।
जें कर्म केलें समरीं पित्यानें,
तें जाणिलें नित्य वसुंधरेनें. ॥ ९ ॥
कां टाकिलें शस्त्र रणांत तेणें
साक्षी पृथासूनुचि एक जाणे ।
हें कर्म झालें समरांत जेव्हां,
होतासि कोठें रणभीरु तेव्हां ? ॥ १० ॥

**कर्ण**—( किंचित् हंसून ) हो हो, मी भित्रा खरा. तूं मात्र मोठा पराक्रमी, धैर्याचा आहेस नव्हे ? तुझ्या पित्याची आठवण होऊन मला संशय उत्पन्न झाला ! मूर्खा, मी तुला आणखी असें विचारतों,—

( श्लोक ) जरी टाकिलें हातिचें शस्त्र वीरें,
निवारूं नये शत्रुला काय धीरें ?।
गळा कापितां शत्रु सर्वां समक्ष,
उदासीन कां बैसला युद्धदक्ष ? ॥ ११ ॥

**अश्व०**—( रागानें दांत ओंठ चावून ) हा दुष्टा सूताधमा, तूं राजाचा आवडता झालास म्हणून मोठी प्रौढी दाखवून भलभलती बडबड करितोस काय ?

( श्लोक ) समज तरि कसेंही दुःखितें कीं भयानें
द्रुपदजकर नाहीं वारिला मत्पित्यानें।
परि भुजबळदर्पें निंदिसी काय त्यातें ?
तव शिरिं पद डावा ठेवितों काढ यातें ! ॥ १२ ॥

( तसें करावयास उठतो. )

**कर्ण**—( तरवार उपसून ) अरे दुष्टा ब्राह्मणाधमा, तूं कशाला इतकी आत्मश्लाघा करितोस ?

( आर्या ) जात्या अवध्य असती, परि जो त्वां पाय उंच हा केला।
तो मत्खड्गें तुटला हें पाहुनि मारिशील हाकेला.॥१३॥

**अश्व०**—अरे मूर्खा, मी जातीमुळें अवध्य झालों काय ? तर ही मी जात टाकिली पहा ! ( यज्ञोपवीत तोडतो ) कांहीं सामर्थ्य असेल तर ये, माझा वध कर ! नाहीं तर—

( आर्या ) मिथ्याप्रतिज्ञ करितों त्वद्धातें विजय भीड सोडोनी.।
घे शस्त्रातें किंवा टाकुनी ये शरण हात जोडोनी ॥१४॥

( दोघेही हातांत शस्त्र घेऊन एकमेकांवर प्रहार करावयास उठतात; कृप व दुर्योधन त्यांचें निवारण करून त्यांस शस्त्रें ठेवण्यास सांगतात. )

**अश्व०**—मामा, कां निवारण करितोस ? हा दांडगा सूताधम माझ्या ताताची निंदा करितो त्याला शिक्षा भोगूं दे.

**कर्ण**—राजा, या वेळीं तूं माझ्या आड येऊं नकोस. कारण,—

( आर्या ) क्रोधांध धीरपुरुषें शासन न करुनि उपेक्षिला नीच;
करितो बडबड फारचि तो, यास्तव त्यास योग्य हानीच ॥ १५ ॥

**अश्व०**—राजा, सोड सोड त्याला, माझ्या बाहूंनीं त्याला चिरडून टाकतों! कदाचित् तूं स्नेहास्तव किंवा कार्यसिद्धीस्तव ह्या गुरुनिंदक दुष्टाला मजपासून राखावयास इच्छीत असशील, तर हीं दोन्ही व्यर्थ आहेत; कां कीं,

( आर्या ) अतिनीच पापकर्मा हीन कुलोत्पन्न सूतज सहाय; ।
शशिवंशभूषणाला तुज गुणवंतास योग्य हा काय ? ॥ १६ ॥
मारीन अर्जुनातें मी, राजा, काळजी नको वाहूं ! ।
क्रोधें अकर्णविजया पृथ्वी करितोंचि बोल, बापा हूं. ॥ १७ ॥

**कर्ण**—( खड्ग उचलून ) अरे बडबड्या, ब्राह्मणाधमा, होतास कीं नव्हतास असा करून टाकतों पहा! राजा सोड सोड मला! या समयीं तूं माझें निवारण करूं नये. ( अश्वत्थाम्यास मारावयास पाहतो; कृप व दुर्योधन त्याचें निवारण करितात. )

**दुर्यो०**—अरे कर्णा, अरे गुरुपुत्रा, काय हा तुमचा वेडेपणा!

**कृपाचार्य**—वत्सा अश्वत्थाम्या, शत्रूचा नाश करणें एकीकडेच राहून तुह्मी आपसांत भांडतां हें काय ?

**अश्व०**—मामा, ह्या कटु भाषण करणाऱ्या सूताच्या कारट्याची एकदां मला चांगली खोड मोडावयाची आहे, पण काय करूं? तो सांपडतच नाहीं!

**कृपाचार्य**—वत्सा, आपल्याच पक्षांतील पुढाऱ्याशीं विरोध करण्याची ही वेळ नव्हे, बाबा!

**अश्व०**—मामा, असें जर आहे तर—

( श्लोक ) जों हा पाप न पाविजेल निधना युद्धीं अरीच्या शरीं,
तों माझें प्रिय शस्त्र म्यां त्यजियलें, नेघेंचि यातें करीं; ।
हा सेनापति होउ निर्भयपणें; भीमार्जुनांच्या भयें
वेडावेल, तयीं कसा प्रियसखा जाणेल राजा स्वयें ! ॥१८॥

( असें ह्मणून हातचें शस्त्र खालीं टाकतो. )

**कर्ण**—तुह्मासारख्यांनीं शस्त्र न टाकितां हातीं जरी ठेविलें, तरी तें टाकिल्यासारखेंच आहे; पण,—

( श्लोक ) माझ्या करीं जों वरि धन्वबाण,
अन्यायुधें निष्फळ सर्व जाण ! ।
माझ्या शरें होय न कार्यभाग,
अन्यें कसा तो करिजेल सांग ! ॥ १९ ॥

( इतक्यांत पडद्यापलीकडे शब्द होतो )

" अरे दुष्टा, द्रौपदीसारख्या सतीचे केशाकर्षण करण्याचें महापातक करणाऱ्या दु:शासना, फारा दिवसांनीं माझ्यापुढें आला आहेस. अरे क्षुद्रपशो, आतां कोठें जाशील? ऐका, ऐका! दुर्योधन, कर्ण, शकुनि प्रभृति सर्व पांडवद्वेष्ट्यांनो ! ऐका !

( श्लोक ) जेणें राजसभेंत तैं द्रुपदजाकेशांसि आकर्षिलें,
जेणें त्या गुरुच्या समक्ष सतिच्या वस्त्रांसही ओढिलें. ।
ज्याचें फोडुनि वक्ष रक्त पिउं म्यां केली प्रतिज्ञा अहो,
तो हा मद्भुजपंजरीं गवसला, राखा तुह्मी यास हो ॥२०॥"

( सर्व कान देऊन ऐकतात. )

**अश्व०**—अहो अंगराज, अहो कौरवसेनापते, अहो जामदग्न्यशिष्य, अहो द्रोणाचार्यनिंदक ! आपल्या भुजबलानें सर्व लोकांचें रक्षण करणारे व " माझ्या करीं जोंवरी धन्वबाण, अन्यायुधें निष्फळ सर्व जाण " अशी घमंड मारणारे तुह्मीच ना? आतां प्रसंग जवळच आला

आहे ! आतां पुढें व्हा, व कांहीं सामर्थ्य असेल, तर भीमसेनापासून त्या दुःशासनाला सोडवा.

**कर्ण**—अंः, जारे ! मी जिवंत असतां आमच्या युवराजाच्या छायेलाही स्पर्श करण्याची त्या भीमाची काय प्राज्ञा आहे ? युवराजा, दुःशासना, भिऊं नको, हा मी आलों पहा ! (असें बोलून निघून जातो.)

**अश्व०**—राजा, कर्णाच्यानें भीमार्जुनांचें निवारण होणार नाहीं, यास्तव आपण स्वतः भावाला सोडविण्यास जावें हें चांगलें.

**दुर्यो०**—कोण आहेरे ! माझा रथ आणा लौकर ( असें बोलून निघून जातो . )

**अश्व०**—मामा आपणही त्यांच्या मदतीस जावें हें बरें. अरेरे रागाच्या भरांत मीं शस्त्रत्याग केला ही किती वाईट गोष्ट झाली !

( दोघेही निघून जातात. )

**प. ब. गोडबोले** कृत वेणीसंहार नाटकावरून थोडा फेरफार करून.

---

## धडा ६८

## मंगलाष्टक

ज्यानें सिंधुसरित्, रविद्युति, शशिज्योत्स्ना, अशा युग्मकां,
निर्मोनी पुरुषांसमान जगतीं उंचाविल्या बायका;
आत्मा आणि कुडी मिळून अवघा संसार संपादिला,
साधो **प्रेम** अगाध नित्य तुमच्या तें निर्मला मंगला. १

ज्यानें माधव, इंदु, चंदन, उषा, सायंतना निर्मिलें,
ज्यानें गायन कोकिलां पढविलें, नृत्यीं शिखी मंत्रिले;
ज्यानें भृंग, सरोजिनी, तरु, लता, पर्णें, फुलें निर्मिलीं,
तें **माधुर्य** करो चरित्र तुमचें संपन्न सन्मंगलीं. २

नक्षत्रें गगना, फुलें उपवना, रम्यें मुलें केतना, *
 दे वातावरणा सुरम्य शकुनां, रत्ना नदींच्या इना, †
देई सत्वगुणा सुधींस, कविंना देई नव्या कल्पना,
 साधो ती तुमच्या सदा **रसिकता** सन्मंगलांच्या गणा. ३
ज्यानें रंगविलें नभा, सजविलें तारागणांहीं तया,
 नानाच्छायवनस्पतींत भरलें वर्णांप्रती लीलया,
पुष्पीं मार्दव रम्य हास्य निरवी, पक्ष्यांत रम्याकृती,
 तें **सौंदर्य** तुम्हां सदैव पुरवो सन्मंगलाची रती. ४
व्योमीं रंग कसे तरी, तरुवरीं कैशा तरी वल्लरी,
 जाती निर्झर हे कसे तरि, वनें विस्तीर्ण कैशीं तरी,
साधें विश्व दिसे, परंतु रचि जें साधेपणीं चारुता,
 तें **साधेपण** मंगलप्रद तुम्हां होवो पुढें वा अतां. ५
सूर्या शांतपणें हळूच उदयीं आणोनियां सोडिती,
 गाणें गात निरध्वनी रजनिला भेटूं जगा धाडिती,
व्योमीं स्तब्धपणें ग्रहां फिरविती, विश्वास सांभाळिती,
 ती **शांती** तुमच्या सदैव विलसो सन्मंगला साधिती. ६
हा येथें गज तृप्त होउन डुले, धाली पिपीली इथें;
 हा येथें द्विज गोड खाऊन फळें स्वच्छंद गानीं रते;
क्षेत्रीं क्षेत्रिं करी चरास्तव मुदा जें अन्नपूर्णा उभी,
 तें **वात्सल्य** तुम्हांस मंगलद हो सानंद लोकीं उभीं. ७
'हो' ऐसें म्हणतांच विश्व अवघें झालें, उभें राहिलें,
 'हा घे नेम तुला' असें परिसतां नेमास त्या वाहिलें;
विश्वें हीं शतकोटि एक बदराऐशीं अनंता जया,
 तें **सामर्थ्य** सदैव मंगल करो, देवो तुम्हांला जया. ८

ना. वा. टिळक

---

* गृहाला.

† इन=स्वामी, प्रभु.